स्वतंत्र सामाजिक कादंबरी,—

# आघाडीवर

लेखक :—

व्यं. रा. खंडाळीकर

डिसेंबर १९४१ ]

[ किंमत १-१२-०

प्रकाशक:—

गो. वा. कुलकर्णी,
महाराष्ट्र ग्रंथ भांडार,
कोल्हापूर.







मुद्रक:—

बा. ना. ठकार,
श्रीसिद्धेश्वर प्रिंटिंग प्रे
कोल्हापूर.

श्रीयुत

वामनराव देशपांडे,

बुधगांव.

यांना

आदरपूर्वक अर्पण.

# आठवण

—माझ्या " आघाडीवर " या कादंबरीचे प्रकाशक श्रीयुत गो. वा. कुलकर्णी—यांनीं या युद्धमान महर्गतेच्या कालांत माझ्यासारख्या नवख्या लेखकाचें हें प्रकाशन स्वीकारून मला ऋणी करून ठेवलें आहे. श्रीयुत कुलकर्णी हे ध्येयवादी आहेत. बहुजन समाजाच्या उन्नतीला परि-पोषक असें साहित्य प्रकाशन करावें अशी त्यांची उत्कट मनीषा आहे. केवळ धंदा हें त्यांचं ध्येय नाहीं. तसं असतं तर माझ्यासारख्या नवख्या लेखकाला अशावेळीं प्रोत्साहन देण्याचं धाडस त्यांनीं केलंच नसतं. पुस्तक प्रकाशनाच्या आनंदापेक्षांहि असा ध्येयवादी प्रकाशक गांठ पडला याचा मला विशेष आनंद वाटतो. ध्येयवादी साहित्यनिर्मिती करूनच त्यांचे खरे आभार मानल्यासारखें होईल.

कोल्हापूर येथील श्रीयुत अनंत गणेश जोशी यांनीं माझा नी माझ्या या कादंबरीचे प्रकाशक श्री. कुलकर्णी यांचा एकमेकांना परिचय करून देऊन मला कादंबरी लिहिण्यास प्रवृत्त केलें आणि म्हणूनच ही कादंबरी माझ्याहातून लिहून झाली. श्री. जोशी यांनीं दाखवलेल्या या सौजन्याबद्दल त्यांचे आभार मानणें मी माझें कर्तव्य समजतों.

माझ्याहातून आजवर जी साहित्यनिर्मिती झाली त्याचं बरेंचसं श्रेय माझे स्नेही श्रीयुत पां. वा. नरगुंदे ( सोलापूर ), श्री. श्री. शं. पोतनीस ( अलाहाबाद ), श्री. शामराव डोळे ( पंढरपूर ), श्री. वि. ग. कवठेकर ( गदग ), श्री. द. के. बर्वे ( वेंगुर्लें ), श्री. बा. सा. वाघमारे ( माढे ), श्री. बापूचंद गुजर ( खंडाळी ), श्री. च. क. एरंडोले ( बुधगांव ) यांना नी माझ्याशीं अत्यंत प्रेमानं वागणाऱ्या

माझ्या बुधगांव, माधवनगर नी सांगली येथील ‘ समता ’ मंडळांतील बाल नी प्रौढ सदस्यांना आहे.

बुधगांव येथील श्रीयुत वामनराव देशपांडे यांच्या माझ्यावरील निर्हेतुक प्रेमामुळंच मी आजवर येथें राहूं शकलों. नुसते औपचारिक आभार मानून त्यांच्या प्रेमाची फेड होणार नाहीं.

त्याचप्रमाणें श्रीमंत युवराज बाळासाहेब महाराज ( मिरज ज्यूनिअर ), रावसाहेब हसबनीस. ( मुनसफ, बुधगांव ) नी रावसाहेब देशपांडे ( स्टेट ओव्हरशिअर ) यांना माझ्याविषयीं वाटत असलेल्या सहानुभूतीचा मी कृतज्ञतापूर्वक उल्लेख करतों.

कुमारी कमल धडफळे ( हेड मिस्ट्रेस, बुधगांव ) यांनीं कादंबरीचें हस्तलिखित काळजीपूर्वक वाचून मला कांहीं योग्य सूचना केल्या त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

बुधगांव,
११।११।१९४१

— व्यं. रा. खंडाळीकर.

# आमचें प्रकाशन

## —बाल वाङ्मय—

१ **बालसुहृद**—( आवृत्ति दुसरी ) ०-१२-०
लेः—गो. रा. चोळकर, B. A., B. T.

२ **पहिलें पाऊल**— ०-४-०

३ **राजर्षि शाहूमहाराज यांचें चरित्र** ०-४-०

## —ललित वाङ्मय—

१ **जांवई**—विनोदी कथा व निबंध १-४-०
लेः—गं. ल. देवधर, B. A., LL. B.

२ **मातृमंदिर**— कादंबरी २-०-०
लेः— सौ. मालतीबाई दांडेकर

३ **धर्मवीर संभाजी**—( नाटक ) १-०-०

४ **प्रतिमा**—लघुकथासंग्रह १-८-०
लेः—सौ. मालतीबाई दांडेकर

५ **आघाडीवर**—कादंबरी १-१२-०
लेः—व्यं. रा. खंडाळीकर

## —टीकात्मक—

१ **पद्यमीमांसा**—छंदशास्त्रावरील टीकात्मक ग्रंथ
लेः—वि. ज. सहस्रबुद्धे ( कवि )
प्रो. बनहट्टी यांची विस्तृत विवेचनात्मक प्रस्तावना

## श्रीयुत खंडाळीकर यांचीं
## आगामी पुस्तकें



१ चांदण्या—लघुकथासंग्रह

२ तिरंगी झेंडा—शालेयजीवनावरील अभिनव कादंबरी

३ अहिंसक कसाई—कादंबरी

४ लग्नाची मुलगी—कादंबरी

५ उसळत्या लाटा—विनोदी लख नी कथासंग्रह.

# आघाडीवर

## प्रकरण १ लें



" बंधूनो !— "

—आकाशनें धुळीनें मलीन नी श्रमानें मलुल झालेला आपला चेहरा आपल्या हातरुमालानें पुसून बोलायला सुरवात केली,—

" व्यापारीमंडळींचा निर्णय तुम्हांला कळवितांना मला अत्यंत खेद वाटतो आहे. त्यांनीं आपल्या मागण्या फेटाळल्या आहेत. यांत अनपेक्षित असं कांहींच घडलेलं नाहीं. उलट मी म्हणतों,–त्यांनीं या आपल्या कृतीनं आपल्या संघटनेचा प्रभाव त्यांच्या प्रत्ययास आणून देण्याची संधीच आपल्याला दिलेली आहे. यावेळीं आपण सगळयांनीं एक होऊन, हमाली आणि गाडीभाडं कमींत कमी दीडपट करण्याचं आश्वासन मिळेपर्यंत, संप पुकारून तो टिकवला पाहिजे. [ ' संपावरच गेलं पाहिजे !– ' असं एकजण मध्येंच उठून ओरडतो. ] मला ठाऊक आहे, आपल्याला हा संप जास्त दिवस टिकवावा लागला तर आपले अत्यंत

झाल होतील; पण कांहींहि झालं तरी आपली ही न्याय्य मागणी मान्य होईतोपर्यंत आपल्यापैकीं कोणीहि कामावर जातां कामा नये. आज पर्यंत आपण लक्षावधि मजूर-कामगारांनीं मरमरेतों काबाडकष्ट करून काय केलं—? अन्याय सहन करून या भांडवलदारांना आपण आपल्या कष्टाचा फुकटचा फायदा दिला. त्यांच्याकरितां बंगले उभारले. त्यांना मोटारी मिळवून दिल्या. त्याच्या बँका भरल्या. आपल्या कष्टाचं रक्त प्यायला त्यांच्या भांडवलशाही जिभा चटावून ठेवल्या. हें आपलं रक्तशोषण-पिळवणूक आपण थांबवली पाहिजे, नाहींतर याहिपेक्षा वाईट दिवस आपल्या वाट्याला येतील. त्याकरितां आधीं आपण एक झालं पाहिजे; नी न्यायाकरितां, आपल्या हक्काच्या भाकरीकरितां, झगडलं पाहिजे. अन्याय सहन करणं हा अधर्म, पाप आहे. आपली मागणी पूर्ण न्यायाची आहे. म्हणून ती मान्य होईतोपर्यंत आपण संप पुकारून तो टिकवला पाहिजे. सगळयांच्या घरोघर जाऊन त्यांना संपांत सामील होण्याबद्दल विनंती करून, आपण त्यांना सांगितलं पाहिजे,—

"—संपावर चला. आम्हांला मदत करा.—"

—एवढं बोलून आपल्या हातांतील हातरुमालानें तोंड पुसत आकाश खालीं बसला.

इतक्यांत एक गाडीवान-यशवंता-तिथं येऊन त्याला म्हणाला,—

'दादा, मला एक चार शब्द सांगायचं हायतं.'

'जरूर. बोलाना.'

—आकाशनं त्याला आदरानं संमति दिली. यशवंता बोलूं लागला,—

'आकाश हे देवमाणूस आपनास्नी गांठ पडल्यात. आत्तां त्येनीं आपणासनीं सांगितल्यापरमाण आपण समद्यांनीं संप केला पायजे. आपल्या सगळ्यापाय आजपत्तोर त्येनीं किती कस्ता खाल्ल्यात्या तें तुमास्नी ठावं हायच्. त्येंच्या म्हणण्यापरमाण आपण समद्यांनीं वागाय होवं. आकाश आपलं न्यानोबा-तुकाराम हायत्. गरिबी आपल्या समद्यांसनींच जाळतीया. तिची आग इजाय होवोसी वाटत असल, तर आपणच एक होऊ-

नंशान् ती इजवाय होवी. रातन्–दिस ऊर फुटस्तवर कष्ट करूनशान्बी नुसतं आपलं प्वाट बी नीट भरत न्हाय. रोजचा रुपाया दीड रुपाया आपणास्नी पडतो. त्यांत बैलाची वैरण, आपलं प्वाट, कपडालत्ता,–समदा परपंच भागवावा लागतो. म्हागाई ही असली जळतीया. त्याल हाय तर मीट न्हाई, मीट हाय तर चटणी न्हाय, अशी सदा रड चाललेली असतीय. अन् ते बी मरस्तोर कष्ट करूनशान्. आजच्यालाच आता जंदळं न्हायतं घरात. आज चार महिनं झालं बायकूला लुगड घ्यावं म्हणतुय, पण पैसा काय नजरं पडत न्हाय. चिंद्या झाल्यात्या तिच्या लुगड्याच्या. आमचा थोरला पोरगा सिद्या सा वर्पाचा हाय. त्येच्या जल्मापसनं त्येला मुंडासं कीं टोपी घालाय् मिळली न्हाय. आमास्नी हे भाडं जवर् असं मिळतंया, तवर असंच चालायचं हें. भाडं वाडवा म्हटलं तर यापारी माणसं म्हणत्यात, आमास्नी कमी भाड्यानं गाडीवान मिळत्यात. पोटाची गार भरायपाय आपण आपल्याआपल्यात तूं–मी करत बसतों, अन् मग आयतंच ह्या येपारी लोकाचं सादतं. आजपत्तोर मी नशिब आपलं–असं म्हणुनशान, आपल्या कपाळाला हात लावत हुतो. पण कुटलं नशिब अन् काय आलंया ? आपणास्नी कमींत कमी भाडं देऊनशान् हे येपारी लोक आपला फायदा वाडवाय बगत्यात. अन् त्येच्यामुळंच आम्हास्नी हें असं मरावं लागतंया. देवाची सेवा करूनशान् त्येला काय दया आली तर बगावी म्हणूनशान् शनवारचा उपास धरला. दिस उगवायच्या आंत मारुतीला पाणी घालायचा नेम केला. पण त्येला बी काय पाझर फुटला न्हाय. अन् त्यो फुटायचा तरी कसा ? दगडच बोलूनचालून.–अन् असा देवाला पाणी घालूनशान् पैसा मिळाला असता, तर समदी दुनया पाणीच घालत बसली असती देवाला पैशापाय मग. तवा तें काय नव्ह बगा. आपणच आपला मारग काडाय व्होवा. त्येच्याशिवाय आपल्या पोटाची दाद लागायची न्हाय. या यापारी लोकास्नी किती जरी फायदा झाला तरी गाडीवानास्नी एक चार आणं जास्ती द्यावंत–असं काय ह्येच्या बापजल्मीं त्यासनीं कदीं वाटायचं न्हाय. त्यासनीं फायदा हो, नाहींतर तोटा हो, आमास्नी आमचं भाडं दिडीनं मिळाय होवं. तें तसं द्यायची कबुली

मिळस्तवर आपण सगळ्यांनीं एक होऊनशान् संपावर गेलं पाहिजे. आकाशदादांच्या म्हणण्यापरमाण समद्यांनीं वागलं पायजे !'

यशवंताचं तें बोलणं संपल्यावर एक हमाल... बोलण्याकरतां म्हणून सभेंत मध्येंच उठून उभा राहिला. तो शरिरानं लुकडा मात्र उंचापुरा होता. त्याचा चेहरा आकर्षक होता; नाक सरळ होतं; डोळे गरगरीत, पाणीदार नी मोठे होते. दृष्टी करारी होती. त्याच्या अंगांत एकच कुडतं होतं. त्याच्यावर सर्वभर हळदीचे–तेलाचे डाग, नी खांद्यावर नी पाठीवर भोकसे पडलेले होते. त्याचं धोतरहि तसलंच मळकं अन् फाटकं होतं. त्याला जागोजाग दंड घातलेले नी गांठी मारलेल्या दिसत होत्या. .. तो बोलूं लागला,—

" मी हातनंच बोलतों. इळाचीळ गुरावाणी काम करूनशान् आमच्या हातांत सा न्हाईतर आट आनं पडत्यात. यवढ्या पैशांत परपंच चालवायचा म्हन्जी नाकीं नव येत्यात. मनांत असूनशान् पोराबालास्नी कदिं खायाय–पेयाय द्याय येत न्हाय, कीं त्यासनीं लेयायनेसाय कदिं घड कापड–धडुतं मिळत न्हाय. आपणास्नी ही असली मळकीन् फाटकी धडुती घालूनशान् मालाचीं पोतीं पाटीवरनं व्हावीं लागत्यात. त्येच्यापायीं जीवाला केवडी यातायात पडत असल ती आपली आपल्याला ठावं. काम करतांना समदं आंग घामानं भिजूनशान् जातं. सांजपारीं हातपाय गळल्यासारकं हुत्यात.— कामाचा ह्यो असा तान् पडतो. पोटांत भुकची आग भडकती. ती चटनीन् भाकर असलं आन खावूनशान् निववावी लागती. आपण गप बसूनशान् गुमान मिळल ती हमाली घेत न्हायलों, तर ह्येच्यापरास बी वंगाळ दिस आपणास्नी येत्याल. कुणालाबी आपली दया यायची न्हाय कीं, 'कसं चाललं तुमचं'— म्हणूनशान् कुणी यापारी आपली चौकशी करायचा न्हाय. आपणच एक होऊनशान् आपली हक्काची भाकर मिळवाय होवी. यशवंता मगा म्हणाला तें अगदीं खरं हाय. आकाश आपणास्नी देव माणूस भेटल्यात. ते मगासी काय म्हणत हुतं ! आपली मजुरी वाढली पायजे. आपण संप केला पायजे.— तुमची मजुरी–भाडं–हमाली वाढली पाहिजे. तुमी संप

केला पायजे — असं ते म्हणलं न्हाईंत ह्यच्यावरनं त्येंच्या दिलाची परीक्षा करा. खेड्यापाड्यांतनं हिंडून, गोरगरिब लोकाशाय फुकट शाबूनशान आजपत्तोर त्येनीं कित्ती लोकांचा दुवा घेतलाय. आईबाप हायतं ते आपलं. आपण त्येंच्या म्हणण्यापरमाण वागाय होवं!"

एवढं बोलून तो हमाल खालीं बसला.

सारंगपूर येथील व्यापारी पेठेंतील एका प्रशस्त चौकांत ती सभा भरली होती. सभेस चार–पांचशेंच्यावर समुदाय हजर होता. तिथल जवळ जवळ सगळे गाडीवान नी हमाल त्या सभेला आले होते. सारंगपूर हें मध्यम वस्तीचं गांव होतं. मात्र तिथं व्यापार फार मोठ्या प्रमाणावर चालत होता. आसपासच्या सर्व खेड्यांतला माल विक्रीकरितां तिथं येत असे. आकाशनें तिथल्या हमाल–गाडीवानांची संघटना करून त्यांना त्यांच्या हक्काची जाणीव करून दिली होती. लढाईमुळं महागाई भलतीच वाढत होती. धान्याचे भाव सारखे कडाडत होते. त्यांत पावसाच्या अभावामुळं आणि भर पडत होती. शेतकरी, मजूर, कामगार ... नी इतर गोरगरिब यांचे अत्यंत हाल चालले होते. धंदाच आधीं मिळत नव्हता. आणि मजुरीचं प्रमाण दिवसें दिवस कमी कमी होत चाललं होतं. आकाशच्या प्रयत्नांना थोड्याच दिवसांत चांगलं यश आलं. याला परिस्थिति हें कारण असलं तरीहि त्याला–आकाशला त्या लोकाविषयीं वाटत असलेला आपलेपणा–जिव्हाळाहि तितकाच कारणीभूत होता. आकाशच्या सांगाव्याप्रमाणं ते वागत होते. त्यांची संघटना चांगली होतांच एक दिवस सभा भरवून, हमाली नी गाडीभाडं दीडपट करण्यांत यावं, अशी व्यापाऱ्याकडं मागणी करायची, अन् ती मान्य झाली नाहीं तर संप पुकारायचा, असा आकाशनं त्यांना सल्ला दिला होता. त्याप्रमाणं मागणी करण्यांत आली होती. त्यांची ती मागणी व्यापाऱ्यांनीं फेटाळली होती. आणि म्हणून संप पुकारायचं ठरविण्याकरितां त्या दिवशींची ती सभा भरली होती.

सभेंत संपावर जायचं एकमतानं ठरलं.

सभेचं काम संपतांच हमाल नी गाडीवान मिळून बरेचजण सभें-

तून उठून आकाशच्याभोवतीं गोळा झाले, नी त्यांनीं मिरवणूक काढावी अशी त्याला विनंती केली. आकाशनें ती मान्य करून त्यांना तयारी करायला सांगितलं.

—त्याच वेळीं त्या गर्दीतून वाट काढत एक एकोणीस–वीस वर्षांची तरुणी सायकल हातांत धरून घंटा वाजवत घाईघाईनं आकाश-कड येत होती. तिच्या कपाळावरून घामाच्या धारा ओघळत होत्या. वाऱ्यामुळं विस्कटलेले तिचे केस सारखे कपाळावर येत होते. ते ती वरचे-वर डाव्या हातानं दूर करीत होती. ती दृष्टीस पडतांच आकाशनें उठून मंदस्मित करीत तिचं स्वागत केलं. तिची चर्या खिन्न दिसत होती. ती जवळ येतांच आकाशनं तिला आस्थेनं विचारिलं,—

" कां आलांत—?"

" आईना जास्त झालंय—! डॉक्टर म्हणत होते–त्या फार तर चार दोन तासाच्या..."

" —असं—? पण मला आतां कसं येतां येईल! आत्ताच संप पुकारायचं ठरवलंय आम्ही. माझ्याकरितां आईची काळजी घ्यायचे तुम्ही थोडे त्रास घ्याल, तर इतक्या लोकांचं कल्याण केल्याचं श्रेय तुम्हाला मिळेल. मी अशा वेळीं इथून गेलों, तर व्यापारी लोक नाहीं नाहीं त्या कारवाया करून संप मोडण्याचा प्रयत्न करतील; अन् तसं झालं तर त्यामुळं इतक्या या बिचाऱ्या मजूर लोकांचं अकल्याण होईल.—"

"—आईना तुम्ही अशा वेळींसुद्धां भेटायला हवत, असं मला वाटतं. निदान एवढं शेवटच्या भेटीचं तरी सुख तुम्ही त्यांना......"

" मला सुद्धां तसंच वाटतंय् पण तितकंच हेहि काम महत्त्वाचं आहे......"

" मी पाहातें हें काम. तुम्ही आईना भेटायला जावा."

त्यांचं तें संभाषण ऐकून आकाशच्या भोवतीं गोळा झालेले ते हमाल नी गाडीवानहि आकाशला आग्रह करूं लागले,—

" दादा, तुम्ही आईना भेटायला जावा. इथली मुळींच काळजी करूं नका. आम्ही संप मुळींच मोडूं देत नाहीं. टिकवतों.—"

"मग तुम्ही राहतां इथं?"

—आकाशनं त्या तरुणीला-वनितेला-उद्देशून विचारलं.

"हो—"

"पण हें तुमच्या घरीं समजलं तर?"

"बहुतेक समजायचं नाहीं.-मी मैत्रिणीकडं-विमलकडं चार दिवस राहाणार आहे, असं सांगून काल घराबाहेर पडलें आहे. विमलकडं गेलेंच नाहीं मी; कालपासून आईच्या जवळ बसून होते. अण्णांची परवानगी मिळाली आहे.—आणि कळलं तरी मी परिणाम भोगायला आतां तयार आहे.—"

आकाश नंतर सगळयांना उद्देशून मोठ्यानं म्हणाला,—"माझी आई अत्यवस्थ आहे. तिला मी भेटून येतों. आपण संप पुकारला आहे, तो आपल्या मागण्या मान्य होओीपर्यंत आपण टिकवला पाहिजे. आज इथं जे हजर नाहींत त्यांनाहि संपांत सामील करून घ्या. मी शक्य तितक्या लवकर परत येतों आहेच. तोंवर या वनितातार्इ तुमचं नेतृत्व पत्करतील. त्यांच्या म्हणण्याप्रमाणं वागा."

नंतर त्या सभेची नी संपाची सगळी हकिगत आकाशनं वनितेला थोडक्यांत सांगितली नी मग तिच्या हातांतील सायकल घेत त्यानं अशा कांहीं स्नेहार्द्र नी कृतज्ञ दृष्टींनं तिच्याकडं पाहिलं कीं जणुं काय त्याला म्हणायचं होतं,

'मी तुमचा आभारी आहे!—

—तुमचे हे उपकार कसे फिटतील?' त्यावर वनितेनंहि त्याच्याकडं स्नेहपूर्णतेनं पाहिलं. त्यावेळीं तिच्या त्या दृष्टींतून जो भाव व्यक्त झाला, त्याचा स्पष्ट अर्थ असा होता,—

'आभार कसले मानायचे आहेत त्यांत? गरिबांच्याकरतां तुम्ही किती जिव्हाळयानं हीं असलीं कामं करतां, त्या मानानं मी तुमच्या हे उपयोगी पडते आहे तें कांहींच नव्हे.'—

सभेच्या बाहेर पडतांच सायकलवर टांग टाकून आकाश वेगानं चंदापूरला जायला निघाला. चंदापूर तेथून दहा-बारा मैल होतं. मोटा-

रीनं जाण्याची सोय होती. पण 'भरती' झाल्याशिवाय मोटार सुटत नसे. तोंपर्यंत उगीच तिष्ठत बसायला नको म्हणून त्यानं सायकलवरूनच जायचं ठरविलं होतं.

आकाश जोरानं पॅडल मारत निघाला होता. रस्त्याकडेचीं झाडें एकामागून एक मागें पडत होतीं. आणि समोरचे क्षितिज गोलाकार फिरत असल्यासारखं दिसत होतं. थोड्याच वेळांत सभेचा नी तिथल्या त्या कामाचा त्याला विसर पडला, नी आईला भेटायची तीव्र उत्सुकता त्याला लागून राहिली. अंथरुणावर खिळून पडलेला आईचा अस्थिपंजर देह त्याच्या अंतःचक्षूसमोर उभा राहिला.

आकाशची ती जन्म दिलेली आई होती. त्याचा बाप त्याच्या लहानपणींच वारला होता. तेव्हांपासून त्याचं पालनपोषण नी शिक्षण आईनीं दुसऱ्यांचे स्वयंपाक नी घरकामं करून चालवलं होतं. जमिनीचं त्यांना थोडंसं उत्पन्न होतं, पण त्याचे फार फार तर पाऊणशें नाहींतर शंभर रुपये येत. आकाशवर त्यांचं निरतिशय प्रेम होतं. त्यानं खूप शिकावं नी मोठी अधिकाराची नोकरी अन् खूप पैसा मिळवून आपले पांग फेडावेत, असं त्यांना फार वाटे; पण त्यांची ती इच्छा सफल झाली नाहीं. आकाश इंटर झाल्यानंतर त्या एकाएकी आजारी पडल्या. त्यांना अंथरूण धरावं लागलं. त्यांच्याहातून कसलंच काम होईनासं झालं. शिवाय आपल्या शिक्षणाकरितां आपल्या आईनं त्रास सोसावेत हें आकाशलाहि रुचेनास झालं होतं. त्याला आपला शिक्षणक्रम थांबवावा लागला. आईना त्याचं अत्यंत वाईट वाटलं. त्यानंतर आकाशनं नोकरीकरितां आटोकाट प्रयत्न करून पाहिला, पण ती त्याला कुठं मिळाली नाहीं. शेतीच्या तुटपुंज्या उत्पन्नावर मोठ्या जिकीरीनं त्यांनीं आपला चरितार्थ चालवला होता. आईची प्रकृति दिवसेदिवस खालावत गेली. पुढं तर त्यांतच त्यांना क्षय जडला. त्यांच्या औषधोपचाराकरितां आकाशजवळ पैसा नव्हता. त्यांची तो मनापासून शूश्रूषा करी, पण नुसत्या शुश्रूषेनं रोग बरे होतात थोडेच! आपल्या शिक्षणाकरितां जिनं मानापमान गुंडाळून आपल्या हाडाचीं काडं केलीं, नी जिनं आपल्यावर जिवापलिकडं

प्रेम केलं, त्या आपल्या आईला क्षयासारख्या भयंकर रोगाशीं झुंजावं लागत असतांना पैशाच्या अभावीं त्या रोगपाशांतून तिची मुक्तता करण्याचं कर्तव्य आपल्याला बजावतां येऊं नये, याचा त्याला अत्यंत खेद वाटे.— या सर्व गोष्टींचा त्याच्या मनावर विलक्षण परिणाम झाला. मात्र त्या परिस्थितीच्या आगींत त्याचं मन दग्ध झालं नाहीं. उलट त्यामुळंच त्याला दिव्य ज्ञानदृष्टी लाभून शेतकरी, मजूर, कामगार वर्गांच्या कल्याणाचं कार्य त्याच्या हातून घडूं लागलं होतं. याचं कारण तो विचारी होता नी त्याची वृत्ति अभ्यासू होती हें होय. त्याचा स्वभाव मात्र भावनाशील होता. त्याचा वाचनाचा व्यासंग दांडगा होता. जसजसा तो आपल्या परिस्थितिसंबंधीं विचार करूं लागला तसतसं आपल्या दारिद्र्याचीं मुळं सामाजिक, आर्थिक विषमतेच्या भूमींत कशी दूरवर नी दृढ रुजलीं गेलीं आहेत, हें त्याच्या प्रत्ययाला येत गेलं. अन् मग वरचेवर त्याच्या मनांत विचार घोळं लागले—'— आपल्यासारखेच लक्षावधि गोरगरिबांचे असेच हाल होत असतील त्या सगळ्यांनाच कसं सुखी होतां येईल ? समाजांत आवतीभोवतीं सगळीकडं दारिद्र्याचा हा सर्वभक्षक वणवा भडकलेला असतांना त्यापासून कोण कसा अलिप्त राहूं शकेल ? आज नाहीं आणि कांहीं कालानें या वणव्याच्या झळा त्याला अगर त्याच्या पुढच्या पिढ्यांना ग्रासल्याशिवाय राहाणार नाहींत. दारिद्र्याचा हा भस्मासूर कायमचा गाडला गेल्याशिवाय गरिबांच-बहुजनसमाजाचं— जीवन सुखी होणार नाहीं. पण तो गाडायचा कसा ?

त्यानं समाजसत्तावादाचा अभ्यास केल्यावर त्याला तो मार्ग सांपडला. अन् मग समाजवादी तत्त्वावर त्याचं प्रेम जडत गेलं तें इतकं कीं स्वतःचं,—आईचं,—आपलं कौटुंबिक जीवन कसं सुखी होईल, याचा त्याला लागून राहिलेला ध्यास नाहींसा होत जाऊन आपला बहुजनसमाज आपल्याला कसा सुखी करितां येईल अशी त्याला तळमळ लागून राहिली. पण प्रत्यक्ष कार्याला कुठं नी कशी सुरवात करावी हें कितीतरी दिवस त्याला निश्चित ठरवतां आलं नाहीं. 'शहरांतून गिरण्या, कारखानेयांतील मजूर, कामगार वर्गांची संघटना करून त्यांना त्यांच्या हक्कांची

जाणीव करून देऊन या तत्त्वाच्या प्रचाराचं कार्य चाललेलं आहे, त्या कार्याला आपणहि वाहून घ्यावं, अगर हें कार्य करतां येण्याजोगीं यापेक्षां अधिक वाव असलेलीं इतर क्षेत्रं आहेत?–'–या संबंधीं त्यानं खू विचार केला. तेव्हां–'शहरांतून चालू असलेल्या या चळवळीचं लो प्रत्येक खेड्यापर्यंत पोचायला हवं. या कार्याला खेड्यांत अधिक वा आहे'–अशी त्याची खात्री पटली आणि मग आसपासच्या खेड्यापाड्यां जाऊन तशा तऱ्हेचं कार्य करायचं त्यानं ठरविलं. आणि तशी सुरवात केली. तो एकटाच निरनिराळया खेडयाना जाई. तिथं गेल्यावर शेतकरी मजूर, मजुरी करणाऱ्या बायका यांना जमवून तो त्यांना त्यांच्या हक्काचं जाणीव करून देऊन संघटनेचं महत्व पटवून देई. त्यांच्या संस्था स्थाप करी. तें त्याचं कार्य वाढत गेलं. चार चार दिवस त्याला घराकडं ये होईनासं झालं. आईची प्रकृति खालावत चालली होती. शेजापाजारी वनिता, नी त्याची मित्रमंडळी त्यांची काळजी घेत. आकाश घरीं असल म्हणजे त्यांची जीवाभावापासून शुश्रूषा करी.

शेतकऱ्यांची गाऱ्हाणीं हळूहळू दूर होऊं लागलीं. मजुरांना मजु अधिक मिळूं लागली. संघटनेचा प्रभाव त्यांच्या प्रत्ययाला येऊं लागला

खेडयांतले लोक आकाशला देव मानूं लागले.

× × ×

चंदापूर जसजसं जवळ येऊं लागलं तसतशी आकाशची आपल्य आईला भेटायची उत्सुकता वाढूं लागली, आणि का कीं आपण घर पोहोचेपर्यंत आपल्या आईचं कांहीं बरं-वाईट तर झालेलं असणा नाहींना,–अशी एक शंका वरचेवर त्याच्या मनांत येऊं लागली. नी त त्याचं हृदय विदीर्ण करूं लागली. मध्येंच एकदां तर आपली आई आप ल्याला अत्यंत क्षीण स्वरांत हाक मारत आहे असा त्याला भास झाला नी त्यानं मग–'आलोंच... बघ आई' असें आपल्याशीं पुटपुटत अधिक वेगानं पॅडलस् मारायला सुरवात केली.

चंदापूर तीन मैल राहिलं होतं. इतक्यांत समोरून एक टुरिंग भर धाव आली. आकाशहि वेगानं निघाला होता. त्याचं तितकसं लक्ष नव्हतं

त्या दोघांचं क्रॉसिंग झालं त्या वेळीं—' आकाश,-आकाऽश-थांब-. ' असं कोणीतरी म्हटलेलं त्याला ऐकायला आलं. म्हणून सायकलचा वेग कमी करत त्यानं मागं पाहिलं. तो ती मोटार मागं थोडया अंतरावर उभी राहिलेली त्याला दिसली. त्यानं ब्रेक लावून सायकल उभी केली. तो खालीं उतरला. थोडयाच वेळांत ती मोटार मागे वळवली गेली नी मग लागलीच ती त्याच्याजवळ आणून उभी करण्यांत आली.

चंचला ती मोटार घेऊन आली होती.

मोटारींत ती एकटीच होती.

मोटार उभी केल्यावर तींतून खालीं उतरून ती आकाशला म्हणाली, —

" चल ना गाडींतून, मी तुझ्याकरतां मुद्दाम गाडी घेऊन आलें आहे. डॉक्टर म्हणत होते म्हणे, आई आतां फारच थोड्या वेळाच्या सोबती आहेत-—! चल ना. "

" नको ! "—आकाश मान हालवीत नी सायकलवर पुन्हां आरूढ होण्याच्या तयारीकरतां डावा पाय पॅडलवर ठेवीत म्हणाला.

त्यावर पुढें होऊन त्याच्या सायकलचे हँडल दोन्ही हातानें धरीत चंचला थोड्या घुस्स्यानें म्हणाली,—

" कां नको?—मी मुद्दाम मोटार घेऊन आलें आहे, तें मूर्ख म्हणून वाटतं?—तें कांहीं मी ऐकणार नाहीं. तूं आतां माझ्या मोटारींतूनच आलं पाहिजेस. "

" हुज्जत घालत बसण्याची ही वेळ नव्हे. मला शक्य तितक्या लवकर घरीं जायला हवं. तुमच्या मोटारींतून मी आलों तर तुम्हाला त्रास होईल. तुमच्या वडिलाना तें कळलं तर ... ...! "

" तर काय होईल —?— अन् त्याकरितां तुला भ्यायचं कारण काय—?— अन् तूं मला ' तुम्ही ' असं बहुमानार्थी कां संबोधतोस? ' तूं ' असं एकेरी नांवानं कां संबोधत नाहींस? कितीतरी वेळां तुला मी तसं विनवलंय्! हं, चल वेळ घालवूं नकोस उगीच—घरीं आई-कडं लवकर जायला हवं. चल ना—! "

" शक्य नाहीं! "

" शक्य नाहीं ?—कां ? "

—चंचला संतापून म्हणाली.

" तो अविचार होईल. "

" पण मला समाधान वाटेल. आनंद होईल. "

" पण ह्याच आनंद तुमच्या दुःखाला कारणीभूत होईल. मी समाजसत्तावादाचा पुरस्कर्ता म्हणून ओळखला जातों आहे. तुम्ही जिल्हाधिकाऱ्याच्या कन्या आहां. "

" तुम्हाला त्यांची कन्या चल म्हणते आहे. नेणार आहे. ती जिल्हाधिकारी नाहींना ? "

" कांहीं असो. मला तें शक्य नाहीं. माफ करा. अन् मला जाऊं द्या कसं! "

" जाऊं द्या—?–पुन्हां मुद्दाम तूं मला वरचेवर बहुमानार्थी संबोधतोयस्. कसला सूड उगवतोयस हा ? आणि नेहमीं हट्टाला पेटून माझ्याशीं असं तिरस्कारानं वागतोस. तूं आज माझ्या मोटारींतूनच आलं पाहिजे. "

—चंचला चेवून म्हणाली. त्यावेळीं तिचे डोळे अश्रूंनीं डबडबले होते.

त्यानंतर अधिक हट्ट धरण्यांत अर्थ नाहीं, असं आकाशला वाटलं. त्यानं आपली संमति दिली. नंतर त्यांनीं त्याची ती सायकल नीट मागं ठेवली नी मग ती दोघं मोटारींत चढलीं.

. मोटार सुरू करतांना चंचला आकाशकडं लटक्या तिरस्कारानं पाहात म्हणाली,

" तूं फारच खट्याळ आहेस! "

थोड्याच वेळांत ते चंदापूरला पोचले. आकाशचं घर आडबाजूला एका बोळांत होतं. चंचलेनं तिथं मोटार नेऊन उभी केली. मोटारींतून उतरून धडधडत्या अंतःकरणानं आकशनं घरांत पाऊल टाकलं. त्याच्या मागोमाग चंचलाहि आंत गेली. त्याची आई डोळे मिटून अंथरुणावर निपचीत पडली होती. शेजारची एक म्हातारी तिच्या उशालगत

बसली होती. दुसरी एक कोणतरी बाई तिथंच एका कोपऱ्यांत बसली होती. आकाशनें आईजवळ जाऊन कापऱ्या स्वरांत तिला प्रेमभरानं हाक मारली,—

'आई ऽऽ—'

आईनीं हलकेच डोळे उघडले. त्यावेळीं त्यांच्या डोळयांत साऱ्या विश्वाचं मांगल्य, प्रेम नी पावित्र्य सामावलेलं असल्यासारखं आकाशला दिसलं. त्यांच्याजवळ बसून त्यांच्या कपाळावर आपला डावा गाल टेकीत पुन्हां त्यानं त्यांना प्रेमभरानं हाक मारली,—

'आई ऽऽ—'

आई बोलल्या नाहींत. त्यांच्या अंगीं तेवढी सुद्धां शक्ति उरली नव्हती. त्यांच्या डोळयांत अश्रू मात्र उभे राहिले होते. ते आनंदाश्रू होते. आपल्या इच्छेप्रमाणं आपल्या मुलाची शेवटीं गांठ पडली, याचाच त्यांना आनंद वाटला असावा.

'बरं झालं बाबा आलास. ध्यास लागला होता नुसता तुझा तिला.'

—जवळ बसलेली ती म्हातारी आकाशला म्हणाली.

बोलण्याची सुद्धां शक्ती आपल्या आईच्या अंगी उरलेली नाहीं—याचा आकाशला खेद वाटला.

चंचला तिथं जवळच उभा होती. तिला उद्देशून नंतर तो म्हणाला,—'जावा तुम्ही. तुम्हाला वेळ होईल. अत्यंत आभारी आहे हं मी तुमचा.' त्यावर—'बरं आहे जातें मी. उद्यां येईन हं पुन्हां सकाळीं'—असं सांगून चंचला किंचित् जोरानं पाय आपटत तेथून निघून गेली. तशा प्रसंगींहि आपल्या त्या वागण्यानं तिला आकाशला सुचवायचं होतं,—"तूं मला पुन्हां 'तुम्ही' म्हणालास हं!"

चंचला गेल्यावर आकाश तिथं असलेल्या त्या दोन्ही स्त्रियांना उद्देशन म्हणाला,

'तुम्हांलाहि जायचं असलं तर जावा. मी पाहतों आतां.'

आईच्या उशालगत बसलेली ती म्हातारी उठून निघून गेली. ती दुसरी बाई मात्र गेली नाहीं. ती आकाशला म्हणाली,—

'वनितातांई मला सांगूनशान् गेल्यात्या—मी येस्तवर जेवाध-पुरतं तेवडं घरला जात जा; नाहींतर इळाचीळ हातं आईजवळ बसून-शान् न्हात जा–म्हणूनशान्. आन् जातांना खर्चाय पैसं बी देऊन गेल्या त्या.'

'—असं. ?'—आदर व्यक्त करीत आकाश उद्गारला.

'विराग येऊन गेला का आज ?'—आकाशनं तिला विचारलं.

'इराग कोण मला वळकीचं न्हायत. आपल्या सीनचं पांच-साजण बापई दोपारीं येऊनशान् आईजवळ वाइूळ बसूनशान् गेलं. तवा आई बोलत हुत्या उली उली.'

—ती बाई म्हणाली.

रात्रीं नऊ वाजल्यानंतर आकाशची बरीचशी स्नेही मंडळी त्याच्याकडं येऊन बराच वेळ बसून गेली. विराग आला नव्हता. तो कां आला नाहीं म्हणून आकाशनं त्यांच्याजवळ चौकशी केली. तो दुपार-पासून बाहेर कुठं दिसला नाहीं असं त्या सगळ्यांनींच त्याला सांगितलं.

अकरा वाजण्याच्या सुमारास आईनीं थोडी हालचाल करून आपल्याला पाणी हवं आहे असा भाव व्यक्त केला. आकाशनें लागलीच चार चमचे पाणी त्यांच्या तोंडात घातलं. त्यामुळं त्यांना थोडी हुशारी आली. त्यांनीं खुणेनं आकाशला आपल्याजवळ बसायला सांगितलं. तो जवळ बसल्यावर त्याचा हात हलकेच आपल्या हातांत घेऊन त्याचं चुंबन घेत अत्यंत क्षीण स्वरांत त्या त्याला म्हणाल्या,

'आकाश,–मी वेडी ..मू-र्ख—होते...

अधि–का–र—श्री–मं–ती—या मो–हा–ला ब–ळी—प–डू न–को–स—ज–गां–त–ल्या—दा–रि–द्र्या–ची राख–रांगोळी हो–ई–ल असंच कांहीं–त–री का–र्य कर...'

आईनीं पुन्हां पाणी मागितलं. आकाशनं ते घातलं.

त्यानंतर आईनीं डोळे मिटले ते कायमचेच. त्यांचे हातपाय थंड पडत गेले. मध्यरात्रींच्या सुमारास त्यांनीं एक उचकी दिली नी प्राण सोडला.

आकाशला आपल्यावर आकाश कोसळल्यासारखं वाटलं. कुठं तरी

…ल अंधाऱ्या दरींत आपण पडलों आहोंत असा त्याला भास झाला.—

'आ–ईऽऽऽ' असा मोठमोठ्यानं हंबरडा फोडून त्यानं आक्रोश केला. शेजारचे लोक जमा झाले. त्यांनीं त्याची समजूत घातली. थोड्याच वेळांत आकाशनेंहि आपल्या दुःखाचा आवेग आवरला.

खोलींत सर्वभर भेसूरतेचं वातावरण पसरलं होतं. रातकिडयांची कर्णकटु किट्‌किट्‌ चालू होती. कंदिलाची ज्योत काजळली होती. तिचा प्रकाश मंद मंद होत चालला होता.

त्यांतलं तेलच संपलं होतं.

# प्रकरण २ रें



'आई, देना ग एक पैसा.'

'असा काय सारखा पिच्छा पुरवायचा रे सुहास. कुठनं आणायचा बरं पैसा रोज उठून ! झाडाला का लागतात पैसे!'

'रोज रोज देते म्हणतेस, अम् देत नाहींस अन् कांहीं ऽऽऽ नाहींस.' —सुहास रडकुंडीला येऊन म्हणाला.

त्यावर शांताबाई त्याची समजूत घालण्याकरतां म्हणाल्या,—

'खायला हवं का तुला!'

'नको मला. मला चक्कर आणायचंय शशासारखं. होय आइऽ, देऽ नाग.'

—असें म्हणत सुहासनें पाय खोडून रडायला सुरवात केली.

'चक्कर दादा आल्यावर करून देईल हं राजाला.'

'नको मला दादाचं. मला पैसा पाहिजे.'

'मार देईन हं मी अशानं. कशालारे पाहिजे तुला पैसा!—चक्कर आणून मातेरं करायला होय!—अन् तुला दिला म्हणजे मग सरळेला नको का द्यायला! चावट कुठला.'

आई रागावलेली पाहून सुहासनें गळा काढला.

त्यामुळें शांताबाई जास्तच चिडून म्हणाल्या,—' भोकाड पसरायला काय झालं एवढं? मंदे, उचल ग त्याला. बाहेर घेऊन जा; आणि रडायचा थांबला नाहीं तर गुंडूबुवाच्या स्वाधीन कर. ऐकायला आलं का मंदे?—मी भिंतीला सांगत नाहीं. '

मंदा आपला खेळ बरोबर घेऊन खेळायला जाण्याकरतां बाहेर पडायच्या घांदलींत होती. आई रागावलेली नसती तर ती—' मी नाहीं जा ', असं फणकाऱ्यानं म्हणून केव्हांच बाहेर पळाली असती. तिनं खेळ जिथल्या तिथं टाकला नी जवळजवळ रडकुंडीला येऊन सुहासला उचलून कडेवर घेतलं.

सुहास अंग झाडून मोठमोठ्यानें रडत होता. त्याला तसाच उचलून ती बाहेर घेऊन गेली. शांताबाई स्वैपाकघराच्या दाराशीं तांदूळ निवडत बसल्या होत्या. त्या त्रासिकपणें आपल्याशीं म्हणाल्या,—'कोण मेले नाही ते येतात, चक्रन् फिक्र घेऊन पोरं रडवायला! सुहासला आतां पैसा द्यावा, तर लागलीच सरलेला दिला पाहिजे, नाहींतर ती हट्ट धरून बसेल. बरं दोघांना दोन द्यावेत तर दोन्हीहि फुकट जायचे. तेच उद्यां भाजीला उपयोगी पडतील. आणि आणायचे तरी कुठनं पैसे असे वाटेल तसे नासायला? नशीब तरी कुठं घड हाका मारतंय! '

पण त्यानंतर मात्र—' पोर एवढा हट्ट धरून बसलं तरी एक पैसा देणं झालं नाहीं आपल्याला. '–अशी त्यांना चुटपुट लागून राहिली.

नंतर थोड्याच वेळांत विराग–त्याचा थोरला मुलगा—बाहेरून आला. त्याला त्या म्हणाल्या,—

" विराग, त्या सुहासला समजाव पाहूं या! —बराच वेळ रडतोय बघ तो. चक्कर हवं आहे म्हणे त्याला. तूं करून दे त्याला एक. "

" कुठं आहे तो?"

" मंदेनं बाहेर नेलाय बघ. "

" बरं पण आई, पैसे आहेत का तुझ्याकडं थोडे? क्लासची फी द्यायला हवीय उद्यां."

" म्हणजे? परवां तर दिली ना? "

‘ परवां म्हणजे महिना झाला. ’

“ बरा लवकर लवकर होतोरे तुझा महिना ! माझ्याजवळ नाहीं बाई पैसा आतां. आणि कशाला लागला आहेस बरं आतां पैसे नासायला क्लास नी फ्लीस करून ? काय दिवे लागणार आहेत ते दिसतातच आहेत. तो शाम नाहीं का तुझ्यासारखाच ईंटर पास झालेला आहे नी तुझ्या त्या वकिलीच्या परीक्षाहि पास झालाय दोन्ही. काय मिळतंय त्याला पाहातोयस ना ? ’

‘ आतां झालेल्या महिन्याची तरी तेवढी दे. मी क्लासलाच जायचं बंद करतों उद्यांपासून. घरांत अभ्यास करीन. ’

‘ तसंच कर. काय करायचं तर मग ? आपल्या घरांत एक माणूस मिळवतं. मिळकतहि बेताचीच. तूंच सांग मग असा पैसा खर्च करून कसं चालेल बरं ? आणि पैसा, तरी आणायचा कुठनं ?— बरं आज खर्च करून त्याचा मोबदला मिळणार असता, तर गोष्ट वेगळी होती. स्वस्थ बसण्यापेक्षां कांहीं तरी करावं म्हणून असा पैसा खर्च करणं कांहीं बरं नव्हे. किती महाग होऊन बसलाय पैसा, पाहातोयस ना ? मिळकतींत भर घालतां आली नाहीं तरी पुरवलं, पण वावगा खर्च करून भागणार नाहीं अशा दिवसांत. बरं, तशी आपल्या घरची परिस्थिति असती तर एक हरकत नव्हती.– ’

शांताबाईच्या त्या बोलण्याचा विरागच्या मनावर बराच परिणाम झाला. तो खिन्न झालेला पाहून त्या बोलतां बोलतां मध्येंच थांबल्या. ‘ आपण उगीच बोललों ’—असं त्याना वाटलं नी मग त्या लागलीच समजुतीच्या स्वरांत म्हणाल्या,—‘ किती पांचच द्यायचेत ना ? उद्यां देऊं म्हंणे. जा बघ जा सुहासला. मंदा बाहेर घेऊन गेली आहे त्याला. चक्कर आणायला पैसा दे म्हणून तो रडत होता. त्याला बाहेर नेऊन त्याची समजूत घालायला सांगितलंय् तिला मी. जा, बघ जा. ’

सुहासला घेऊन येण्याकरतां विराग तसाच मागें वळून बाहेर पडला. त्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहात एक दीर्घ श्वास सोडून

" काय करायचं आम्ही तरी; बरोबरचीं पोरं शिकताहेत अजून त्याच्या. वाईट वाटतंय आम्हांलाहि. पण पैसा आणावयाचा कुठनं ? चांगलं मामा खर्च करतो म्हणत होता शिक्षणाचा. पण पोरहि कांहीं कमी हट्टी नाहीं. नशिबीं नको का ?— "

—आणि त्यानंतर मान खालीं घालून त्या पुन्हा तांदूळ निवडूं लागल्या.

थोड्याच वेळांत विराग सुहासला खांद्यावर टाकून त्याचे डोळे आपल्या हातरुमालानें पुशीत त्याला घेऊन आला.

सुहास अद्यापिहि स्फुंदत होताच.

" काहीं केल्या रहात नाहीं. सारखा रडतोय बघ आई. "

—मंदा केविलवाणें तोंड करून विरागला बिलगत म्हणाली.

" आण इकडं त्याला. मार देते चांगला. "— शांताबाई रागानें म्हणाल्या. मात्र त्याच वेळीं त्यांच्या हृदयांत निराळ्याच संवेदनांनीं काहूर माजवलं होतं.

" देईनास कां ग आई एक पैसा. "— विराग मध्येंच म्हणाला.

" कुठला आणायचा ?— तुला काय ओझं पडतंय देईनास कां ग म्हणायला. "— असं चिडून म्हणत शांताबाई उठल्या नी फळीवरील मोहर्‍याच्या डबीतील एक पैसा काढून तो विरागपुढें फेकीत म्हणाल्या,— " घे म्हणावं डोंबलावर घालून !—जगांत नसेल इतकं हट्टी पोर कुठं ! " पायाजवळचा पैसा उचलून विरागनें सुहासच्या हातांत दिला.

सुहास रडायचा थांबला, मात्र बराच वेळ रडल्यामुळं तो मधून मधून स्फुंदत होता.

" तुला पाहिजे असेल आतां ? "— शांताबाईनीं सरलेकडं डोळे वटारून पाहात तिला विचारलं.

सरला थोड्या रागानं गाल फुगवून—खालीं पहात उभी होती.

विराग तिच्याजवळ जाऊन तिच्या पाठीवरून हात फिरवीत तिला प्रेमानें म्हणाला, " छले, तुला मी देतों हं ! शहाणी आहे छली आमची. सुहास खुळा आहे. "

" मला चक्कर करून दे मग. "

— सरला त्याला बिलगत लाडिकपणें म्हणाली.

त्यावर— ' बराय हं '— असं म्हणून जवळच उभा असलेल्या मंदेला उद्देशून विराग म्हणाला,—

" मंदे, छलीला चक्कर करून दे बाळा आपल्या ! "

" चल छले, मी देते तुला चक्कर करून "— असें म्हणत मंदा सरलेला तेथून घेऊन गेली.

पैसा मागायची इच्छा असतांहि ती एवढ्या लहान वयांत आवरून सरलेनं दाखविलेल्या त्या समजूतदारपणाचा विरागच्या मनावर विलक्षण परिणाम झाला. पैशाच्या टंचाईमुळं लहान मुलाची एवढी साधी इच्छा आपल्या घरांत पुरवली जाऊं नये, याचा त्याला खेद वाटला.

स्वयंपाकघरांत कसलासा आवाज झालेला ऐकून—' दमवलं मेलं या मांजरांनीं तर '—असें म्हणत शांताबाई मध्येंच उठून आंत गेल्या.

मंदा आणि सरला चक्कर करीत बसणार ही कल्पना सुहासच्या बालमनाला सहन झाली नाहीं. तो आपल्या हातांतला पैसा भिरकावून देवून विरागच्या कडेवरून निसटून—' मंदा माला चक्कर'-- असें म्हणत लुटलुटत त्यांच्याकडे पळाला.

सुहासनें फेकून दिलेला पैसा विराग हुडकूं लागला.

इतक्यांत स्वैपाकघराच्या दारांतून डोकावून पाहात शांताबाईनीं त्याला विचारलं,—

" हें काय हें–?–हुडकतोयस् काय ? "

" पैसा फेकलान् सुहासन आपल्या हातांतला. "

" म्हणजे ! "

" मी मंदाला सरलेला चक्कर करून दे म्हणून सांगितल्यावर ती तिला घेऊन गेली. नी मग हाहि आपल्या हातांतला पैसा टाकून तिकडं पळाला."

शांताबाईहि इकडं–तिकडं हुडकूं लागल्या.

तोंच माधवराव बाहेरून आले नी त्यानीं त्या दोघाना उद्देशून विचारलं —

" काय पाहतां आहां ? "

" पैसा टाकलाय सुहासनं आत्तां इथं. "—विराग म्हणाला.

" कशाला दिला होतात त्याच्या हातांत ? असा वाटेल तसा पैसा नासूं नकारे. नुसता पाहायलाहि मिळायचा नाहीं आतां तो स्वप्नांतसुद्धां. आटोपला कारभार आज आमच्या नोकरीचा ! "

" म्हणजे ! "

—शांताबाई केविलवाणें तोंड करून सखेदयुक्त आश्चर्यानें उद्गारल्या.

" म्हणजे काय ! पंचावन वर्षं पुरीं झालीं ना माझ्या वयाला आतां ? नियम आहे पंचावन वर्षांपेक्षां जास्त वयाचीं माणसं नोकरीवर ठेवायचीं नाहींत,— असा. "

" बरं पेन्शन–बिन्शन तरी कांहीं देणार आहेत का ? "

" ती कशी मिळेल ? दहा वर्षं तर सारी नोकरी झालीय इथं माझी. पहिल्यापासून इथंच नोकरी केली असती तर मिळाली असती. "

" मग पैशाशिवाय प्रपंच कसा चालायचा आतां आपला ?–दर-महा चाळीस–पंचेचाळीस रुपये मिळत होते तरीसुद्धां महिन्याची महि-न्याला तोंडमिळवणी व्हायला किती ओढाताण होत होती आपली. अन् आतां तर एक पैहि मिळणार नाहीं. "

" तें सगळं खरं पण करायचं काय आतां ? देवाची इच्छा म्हणा-यचं झालं ! "

" कसला देव आलाय.–नशीब आपलं, दुसरं काय ! "–शांताबाई खिन्नतेनं म्हणाल्या.

त्यानंतर थोडा वेळ कोणीच कांहीं बोललं नाहीं.

विराग विषण्ण मनानं तिथं उभा होता. त्याचं डोकं–सुन्न झालं होतं.

' आतां कांहींहि करून आपण पैसा मिळवला पाहिजे '–हा एकच विचार त्याच्या मस्तकावर घणाचे घाव घालत होता.

× × ×

विरागला त्या दिवशीं रात्रीं किती तरी वेळ झोप लागली नाहीं. दिवा बारीक करून तो आपल्या अंथरुणावर पडला होता. आतां कांहींहि

करून आपण पैसा मिळवला पाहिजे, पण तो मिळवायचा कसा ?— या संबंधीचे विचार राहून राहून त्याच्या मनांत सारखे घोळत होते. बारा वाजून गेले तरी त्याचे ते विचार चाललेच होते. शेवटीं तो त्रासला. ते विचार थांबून झोप लागावी म्हणून त्यानं खूप प्रयत्न करून पाहिले.— हातरुमालाची घडी पाण्यांत भिजवून ती कपाळावर ठेवली. समोरच्या-खिडकींतून रस्त्यावरच्या दिव्याचा खोलींत पडलेला प्रकाश बंद करण्या-करतां खिडकीचीं दारं लावलीं. घड्याळाची किटकिट ऐकूं येऊं नये म्हणून तें कपाटांत उचलून ठेवून कपाट लावून टाकलं.— पण कांहीं केल्या त्याचे ते विचार थांबले नाहींत, नी त्याला झोप आली नाहीं. कसलाच विचार मनांत येऊं द्यायचा नाहीं,—असा तो सारखा निश्चय करी पण विचारच थांबत नव्हते. थांबलेच तर ते तात्पुरते थांबत. अन् अशा वेळीं मग पालीचें कुचकुचणं, रातकिड्यांची किरकिर नी कपाटांतून घड्याळाची अैकायला येणारी मंद किट्किट्,—इकडं त्याचं लक्ष वेधलं जाई. शेवटीं झोप येत नाहींसें पाहून तो उठला. त्यानं खिडकी उघडली नी टेबलावरचा दिवा मोठा करून तो खुर्चीवर बसला. त्याचीं कायद्याच्या अभ्यासाचीं पुस्तकं टेबलावर अस्ताव्यस्त पडलीं होतीं. तीं उचलून नीट शिस्तीनं ठेवायला त्यानं सुरवात केली. मध्येंच एखादं पुस्तक उघडून उगीचच त्याचीं पानं चाळून तें तो पुन्हा मिटून ठेवत होता. तीं पुस्तकं तशीं लावत असतांना त्याच्या मनांत एक विचार आला,—

'सामाजिक सुव्यवस्था, न्याय, शांतता नी सुख—यासाठीं इतकें हे निरनिराळे कायदे तयार करण्यांत आले आहेत; पण दारिद्र्याच्या किडीनं बुजबुजल्यामुळं आमच्या सामाजिक जीवनाची सर्व बाजूंनीं खुंटलेली प्रगति विकसित करण्याचं कार्य यापैकीं एकतरी कायदा करूं शकेल काय ? —नसेल तर मग हे सगळे कायदे कुचकामाचेच नाहींत काय ?—हीं नुसतीं कायद्याचीं ढोंगं नव्हेत ? '

मात्र तीं पुस्तकें लावून झाल्यावर आपल्या जीवाभावाच्या स्नेह्याशीं माणूस हितगुज करतो त्या स्वरांत विराग त्या पुस्तकांना उद्देशून आप-ल्याशीं पुटपुटला,—

' आतां अगोदर मला पैसा मिळवायला लागलं पाहिजे; त्याकरतां लवकरच्च नाखुषीनं मला तुमची रजा घ्यावी लागेल. '

त्यानंतर टेबलासमोरच्या भिंतीवर लटकवलेल्या जगाच्या नकाशा-कडं त्याची सहज दृष्टी गेली नी ती तशीच तिथं खिळून राहिली.—त्याचं लक्ष तिकडं वेधलं गेलं. कितीतरी वेळ तो तिकडं अनिमिषतेनं पाहात होता, अन् त्यावेळीं त्याच्या मनांत विचार घोळत होते;—

' आमच्या देशाचा हा रंग—आमच्या देशाचं पारतंत्र्यच—आमच्या सगळ्या दुःखाचं कारण आहे. देश स्वतंत्र झाल्याशिवाय आमचं सामा-जिक जीवन सुखी होणार नाहीं, म्हणून देश स्वतंत्र होण्यास मदत होईल अशा तऱ्हेच्या कार्यास वाहून घेणं, हें आमचं पहिलं कर्तव्य ठरेल. पण नुसता देश स्वतंत्र झाल्यानं आमचा बहुजनसमाज सर्वस्वी सुखी होईल ? —मुळींच नाहीं ! —तसं असतं तर इतर स्वतंत्र देशांतील बहुजन समा-जाच्या जीविताला कसल्याच दुःखाचा स्पर्श झाला नसता.—पण तसं कुठं आहे ?—आज तर युद्धामुळं उत्पन्न झालेल्या निरनिराळ्या भयंकर दुःखां-नीं या स्वतंत्र देशांतील लोकांचंहि जीवित किती विलक्षण पिडलं गेलं आहे !—खरंच मानवजातीला भोगावीं लागणारीं हीं दुःख कधींच कायमचीं गाडलीं जाणार नाहींत ?—तीं तशी गाडलीं जायला काय व्हायला हवं ? सगळे देश तर अगोदर स्वतंत्र व्हायला—असायला—हवे-तच, शिवाय त्याचबरोबर व्यक्ति, कुटुंब, समाज नी राष्ट्र यांना प्रत्येकीं आपआपला विकास करतां येऊन परस्पराच्या विकासाला साहाय्य होईल, अशा समतेच्या तत्त्वावर उभारलेल्या नव्या विश्वव्यापी धर्मसंस्थापनेची आत्यंतिक आवश्यकता आहे. म्हणजेच समता, स्वातंत्र्य नी विश्वबंधुत्व या त्रयींचं अधिराज्य जगभर स्थापन झाल्याशिवाय मानवजात सुखी होणार नाहीं. पण तें तरी कसं स्थापन होईल ? त्या करतां काय करायला हवं ? '

एकचा ठोका पडलेला ऐकल्यानंतर मात्र तो आपले ते विचार थांबवून तेथून उठला आणि दिवा बारीक करून जांभई देत आपल्या अंथरुणाकडे वळला. इतक्यांत दारावर कोणतरी ठोकत असलेलं त्याला ऐकायला आलं. म्हणून दाराकडं वळत त्यानं विचारलं,—

" कोण आहे ?— "

" मी आकाश ! "

" कोण— आकाश ?— या वेळचा आलास रे— ? आईना कांहीं जास्ती–बिस्ती तर झालं नाहीं ना ?— अन् तूं सारंगपूरहून केव्हां आलास ? "— कडी काढत विरागनें विचारलें.

आकाश कांहींच बोलला नाहीं.

दार उघडून विरागनें दिवा मोठा केला.

आकाशनें आंत पाऊल टाकतांच विरागच्या गळ्याला कडकडून मिठी मारून ओक्साबोक्सी रडायला सुरवात केली.

' आकाश, हे रे काय ?— रडतोस कां ? मला सांगशील कीं नाहीं खुळ्या ! सांग ना ! '

— विराग त्याला कवटाळत म्हणाला.

तो दु:खाचा भर थोडा कमी झाल्यावर आकाशनं त्याला स्फुंदत सांगितलं,—

" आई गेली रे विराग. संपला खेळ बिचारीच्या आयुष्याचा एकदांचा ! "

" म्हणजे—!—केव्हां ? आज मला जायलाच झालं नाहीं. काल गेलों होतों तेव्हां साधारण बरी होती त्यांची तब्येत. "

" तास दीड तास झाला तिला जाऊन. सारंगपूरहून मी संध्याकाळीं परत आलों. तिथं वनितेनं मला येऊन सांगितलं तिला जास्त झालंय म्हणून. गेले पांच–सहा दिवस मी तिथंच होतों. तिथल्या कामाच्या व्यापामुळं मला तिच्याकडं पाहायला फुरसत झाली नाहीं.— आणि नुसतं पाहून–तिची शुश्रूषा करून तिचा रोग हटला असता थोडाच. पैसा कुठं होता माझ्याजवळ !—विराग, तिला दारिद्र्यानं मारलं रे !... बरं चल पाहूं या. तूं आतां मदत करायला हवीस मला. माझ्याजवळ तर एक पैसाहि नाहीं. सगळी व्यवस्था करायला निदान दहा—पंधरा रुपये तरी लागतील. आतां मिळूं शकतील तुला एवढे ?— कां सकाळपर्यंत थांबायला हवं ?—होय, बाकी आपल्याला आणखी इतरांची

मदत हवीच कीं!—तुझे वडील कांहीं हरकत घेणार नाहींत ना?"

"आकाश, काय बोलतोयस् तूं हें? बाबांनीं तुझ्या बाबतींत कांहीं वेळेला तिटकारा-तिरस्कार व्यक्त केला असला तरी तो तात्पुरता, आपल्या सरकारी नोकरीकरतां. तुझ्याविषयीं त्यांना प्रेम—नुसतं प्रेमच नव्हे तर आपलेपणा वाटतो. घरीं ते तुझं नेहमीं गुणवर्णन करीत असतात. आतां तर सरकारी नोकरीचीहि भीति बाळगायचं कारण नाहीं त्यांना. संपली त्यांची नोकरी आज."

"म्हणजे—! आणि दोन वर्षं त्यांची मुदत वाढविण्याबद्दल शिफारस झाली होती, म्हणत होतास ना?"

"होयना. पण कांहीं उपयोग झाला नाहीं त्याचा."

"मग आतां कसं चालायचं रे तुमचं?"

"तोच तर प्रश्न आहे!—थांब, मी आलों हं आईजवळ कांहीं पैसे आहेत का पाहतों."

असे म्हणून विराग माजघरांत आईकडे गेला.

आनंदीबाईहि अजून जाग्याच होत्या. विरागची चाहूल लागतांच त्यांनीं विचारलं,—

"कोण—विराग?"

"होय."

"काय रे?"

"आकाशची आई गेली ग."

"कोण म्हणतं?"

"आकाशच आलाय."

"अरेरे,...काय नशीब बिचारीचं!"

"पैसे आहेत का आई तुझ्याकडं कांहीं?"

"विराग, पैसे...?...आतां पैसे कुठले घेऊन बसलायस्. उद्यांपासून पैसा पैसा करावं लागणार आहे. आतां नोकरी गेलेली समजली कीं देणेकऱ्यांचे खेटे सुरू होतील...."

"मग काय करायचं ग आई? त्याच्याजवळहि पैसा नाहीं?—

असले तर दे कीं. निदान एक दहा रुपये तरी दे. उद्यां माझं मेडल विकून मी तुझे पैसे परत देईन."

"—पण एवढे नसतील रे माझ्याजवळ, आठ रुपये असतील बघ.– देऊं?"

"दे असतील तेवढे मग काय करायचं–!"

—आनंदीबाई उठून स्वैपाकघरांत गेल्या नी लागलीच पैसे घेऊन येऊन ते विरागच्या हातीं देत म्हणाल्या,–'आठच आहेत फक्त!'

ते पैसे घेऊन विराग परत आपल्या खोलींत आला. त्याच्या मागोमाग आनंदीबाईहि तिथं आल्या, त्यांना पाहातांच आकाशला भडभडून आलं. आनंदीबाइनीं त्याची समजूत घातली.

नंतर आकाशला घेऊन विराग त्याच्या घराकडं जाण्याकरतां बाहेर पडला. वाटेंत प्रभाकराची त्यांची गाठ पडली. सिनेमा पाहून तो घराकडं जायला निघाला होता. तो थट्टेच्या स्वरांत कुत्सितपणें त्यांना म्हणाला,—

"कुठं, क्रान्ति करायला निघालांत वाटतं—? शाबास–! क्रान्त्या अशाच वेळीं घडवून आणतां येतात!"

"तुला थट्टेशिवाय कांहीं सुचत नाहीं बघ कधीं. ही थट्टेची वेळ नव्हे. आपल्या आकाशची आई वारली आहे."—विराग म्हणाला.

"खरं म्हणतोस–?— वाईट झालं मग फार. माफ करा हं. आकाश, मी आपलं नेहमींसारखी थट्टा करायला गेलों.— मला कल्पना नव्हती! पैसे हवेत का मग तुम्हांला कांहीं? दहा रुपये आहेत आतां माझ्याजवळ. जास्त हवे असतील, तर मी घेऊन येतों घरांतून."

"आहेत तेवढे दे. तेवढे पुरतील आम्हांला."

"कशाला त्याला मागतोयस?"

—आकाश मध्येंच म्हणाला. कारण, प्रभाकर जो एवढा उदार झाला आहे तो आपल्याला मदत करण्यापेक्षांहि— पैशाइतका मोठेपणा दुसऱ्या कशांत नाहीं, त्याच्याइतकं आयुष्यांत दुसरं कशाला महत्त्वं नाहीं, पैसेवानापुढं—श्रीमंतापुढं गुणी माणसांनाहि लाचार व्हावं लागतं,—

शरणागति पतकरावी लागते, म्हणून जास्तींत जास्त पैसा मिळवणं हें माणसानं आपलं ध्येय ठेवलं पाहिजे. मग तो मिळविण्याचे मार्ग कोणतेहि असले तरी चालतील;—ही आपली विचारसरणी आपल्या प्रत्ययास आणून देण्याची संधि साधण्याच्या हेतूनंच होय,—असं प्रभाकरच्या त्या वेळच्या बोलण्याच्या एकंदर हावभावावरून त्याला वाटलं.

विरागनं त्याचं ऐकलं नाहीं. त्यानं प्रभाकरकडून ते दहा रुपये घेतले. ते मग तेथून लागलीच निघाले.

'मी घरीं वडिलांना सांगून येतों हं— ' असं त्यांना सांगून प्रभाकरहि घराकडं जायला निघाला. इतक्यांत त्याला एक आठवण झाली. विरागला त्यानं परत बोलावून विचारलं,--

'विराग, वनितेचा पत्ता नाहीं रे आज. मैत्रीणीच्या-विमलच्या घरीं मी चार दिवस राहाणार आहे, असं ती अण्णांना सांगून गली आहे. विमलच्या घरीं मी चौकशी केली. तिथं ती नाहीं. सायकल घेऊन गेलीय माझी जातांना. कुठं गेली आहे कळत नाहीं. आतां बाबांना हें समजलं म्हणजे भलतीच काळजी करायला लागतील ते. तुला कांहीं ठाऊक आहे का ! '

'नाहीं बुवा ! '

— विराग खरंच आपल्याला कांहीं ठाऊक नाहीं असा भाव मुद्दामच बेमालूमपणें व्यक्त करीत, मान हालवीत म्हणाला.

× × ×

पहाटे आकाशचे इतर स्नेही नी शेजारी जमल्यावर आईचं शव नदीच्या काठीं—स्मशानांत नेण्यांत आलं. तिथं त्यांची चिता रचली. तें पाहात असतांना आकाशच्या हृदयांत विलक्षण कालवाकालव होत होती. चिता पेटवतांना तर त्याला अत्यंत दुःख वाटलं. थोड्याच वेळांत चिता धडधडून पेटली. तिच्या रसरसीत ज्वाला सळसळून उफाळूं लागल्या. ज्वाला कसल्या--काळाच्या जिभा होत्या त्या ! ...... आईचा देह त्यांत भस्मसात् होत होता. आकाशच्या डोळ्यांतून अश्रू ओघळत होते. त्या वेळीं त्याच्या मनांत एक विचार येऊन गेला. — ' आपल्या

आईचा मृतदेह भस्मसात् करणाऱ्या या ज्वाला आपल्याला इतक्या भेसूर वाटतात पण तिला जिवंतपणीं जाळलेल्या दारिद्र्याच्या ज्वाला याहि-पेक्षां अधिक भेसूर नी भयंकर नव्हत्या काय.

नदीवरचं तें कार्य—और्ध्वदेहिक—आटपल्यानंतर विराग आकाशला आपल्या घरीं घेऊन आला.

त्यानंतर ते दोघं बराच वेळ विरागच्या खोलींत बोलत बसले.

आकाशच्या मनांत नैराश्य उत्पन्न झालं होतं. तो विरागला म्हणाला,—

" विराग, मी आता कुणाकरतां जगायचं ? "

" तुझ्या आईकरतां ! "

" आता कुठं आहे माझी आई—? "

" तुझ्या हृदयांत !—देहानं ती नाहींशी झाली असली तरी तिनं तुझ्यावर केलेलं उत्कट प्रेम नाहींसं होणार आहे थोडंच. नीट विचार कर. नैराश्याचे विचार मनांत येऊं देऊं नकोस. आईनीं तुझ्याकरतां घेतलेले त्रास नि तुझ्यावर केलेलं प्रेम याचा तुला कधींतरी विसर पडणं शक्य आहे का ?—नाहीं ना ?–मग तोंपर्यंत त्या जिवंत आहेत. "

" हें बुद्धीला पटतंय् पण यानं हृदयाचं—मनाचं समाधान कसं होईल ? "

" आईच्या उत्कट प्रेमाची जाणीव ठेवून ज्या दारिद्र्यामुळं त्यांना मृतवत् जीवन कंठावं लागलं नी तसं लक्षावधि लोकांना तें कंठावं लागत आहे—त्या दारिद्र्याचं निर्मूलन करण्याचं कार्य पुढंहि करीत राहिलास तर खात्रीनं तुझ्या मनालाहि समाधान वाटेल. "

" बरोबर आहे तुझं. आणि मीहि त्याच कार्याकरतां आता पूर्ण-पणें वाहून घ्यायचं ठरवलं आहे. "

—कितीतरी वेळ त्यांचं तें बोलणं चाललं होतं. दहा वाजायच्या सुमाराला पोष्टमननं एक पाकीट आणून दिल्यानंतर ते थांबले. विरागनं तें पाकीट फोडलं. आकाश मध्येंच त्याला म्हणाला,—

" कुणाचं आहे रे ? "

"लतेचं."

"वाच ना मग मोठ्यानं, कां फार खाजगी आहे?"

"खासगी कसलं आलंय. आणि असलं तरी तूं परका आहेस काय?"

—असं म्हणून विरागनें तें पत्र वाचायला सुरवात केली,—

नंदगड

ता०.........

सप्रेम नमस्कार,

विराग, आज बरेच दिवसांनीं मी तुला हें पत्र लिहितें आहे, नाहीं? घरची आठवणसुद्धां विसरलेली दिसते आहे ही, असं म्हणत असशील. पण नाहीं अं. प्रत्येक क्षणाला तुम्हा साऱ्यांची आठवण होते बरं. कां कीं माझं मनच आताशीं जाग्यावर नाहीं रे. इथं मामांनीं स्थळ काढलंयन् हुडकून एक माझ्याकरतां. लवकरच दादांना पत्र लिहिणार आहेत ते त्या बाबतींत. काय करूं सांग तूंच आतां?—मला अजून खूप खूप शिकावसं वाटतंय. माझं लग्न इतक्या लवकर जमविण्यांत मामांचा उद्देश काय आहे कोणास ठाऊक. कदाचित् माझा खर्च त्यांना डोईजड होत असेल.—तसं म्हणावं तर इथं मी फीचा, पुस्तकांचा नी इतर वरखर्च माझा मीं शिकवण्या नी स्कॉलरशिप यांवर भागवते आहे; विराग, इतक्या लवकर लग्न करून घेऊन व्यक्तित्वाबरोबरच माझी आशा, इच्छा नी महत्त्वाकांक्षा यांचा होम पेटवायचा माझ्या जीवावर आलं आहे. दादा लागलीच तयार होतील याला. हुंडा द्यायला नको. घर चांगलं. आणि मुलगा शिकलेला.–आईलाहि आनंद होईल. मला काय करावं हेंच समजेनासं झालंय विराग. खरंच, मामा माझ्या लग्नाची एवढी कां गडबड करतात कळत नाहीं? मंदार नापास झालाय, तुला कळलं असेल.—मी मंदारच्या पुढं एक वर्ष गेलें आहे ना. कुठं बोलायचं नाहीं हं हें. अगदीं आळीमिळी कानाला खडा–अं. घरचीं सगळींच माणसं हट्ट धरून बसलीं तर कॉलेज सोडून कुंजवनला महिलाश्रमांत नोकरी धरायचं ठरविलं आहे

मी. परवां सहज कुंजवनला गेलें होतें. तेव्हां तेथील चालकांना मी भेटलें होतें. त्यांनीं दरमहा तीस रुपये पगारावर शिक्षिकेची जागा द्यायचं मला अभिवचन दिलं आहे. तुझी संमति आहे ना याला?–मला जरूर पत्रानं कळव. माझी प्रकृति चांगली आहे. इथं स्त्रियांचा लाठीचा क्लास निघालाय त्याला मी जात असते. सुहास आतां चांगला बोलत असेल नाहीं? छली–आठवण काढते कां रे माझी कधीं? विभवला मी एक छान पुस्तक घेऊन ठेवलंय म्हणून सांग त्याच्याकरितां. तुझा अभ्यास कसा काय चालला आहे? परिक्षेला बसणार आहेस ना?

आकाश कधीं भेटतो का तुला? खेड्यांतील शेतकरी, मजूर, कामगारांच्या संघटणेच्या कार्याला त्यानं सर्वस्वी वाहून घेतलं आहे, असं ऐकतें. मला त्याच्या या कार्याविषयीं फार आदर वाटतो. त्याच्या आईची प्रकृति कशी काय आहे? तुझी त्याची गांठ पडली तर त्याला माझा नमस्कार कळव.

तुझी प्रेमळ ताई,
लता.

तें पत्र वाचून झाल्यावर त्याची घडी करून ती पाकिटांत घालीत विराग म्हणाला,— "पाहिलंस आकाश, दारिद्र्य माणसाची कशी कुचंबणा करतं तें."

त्यावर आकाशनं नुसता एक दीर्घ श्वास सोडला.

इतक्यांत विभवनं— विरागचा एक लहान भाऊ– तिथं येऊन सांगितलं,—"आकाशदादांच्याकडं कोण कीं आलंय बाहेर."

"आंत यायला सांग त्यांना"—आकाश म्हणाला.

सारंगपुरहून सायकलवरून एक हमाल आला होता. तो आंत आला.

"कां आलांत?"—आकाशनं त्याला विचारलं ' दादा, यापारी लोक मालाची व्हातूक कराय भाड्याच्या मोटारी आणणार हायत, अन् हमाली कराय बी खेड्यापाड्यांतनं माणसं बोलावणार हायत. तसं झालं

तर आपला संप टिकायचा न्हाय, म्हणूनशान् मी मुद्दाम आपणास्नी तें सांगाय आलोंय. वनितताई समद्यांस्नीं सांगत्यांत–तुमी धीर सोडूं नका. म्हणूनशान् अन् आपणास्नी आत्ताच काय कळवाय नको असं म्हणत हुत्या त्या, पण मलाच न्हावलं न्हाय. आपण आल्याबिगार–आपण तिथं असल्या बिगार–संपाची घडी नीट बसायची न्हाय. '

' चला मग जाऊं या लागलीच.' आकाश खुर्चीवरून उठत म्हणाला.

' आतां लगीच कशाला येतां ? मी नुसतं कळवाय आलोय आगुदर. उद्यां या व्होवं तर. आई गेल्या म्हणं आपल्या. लइ वंगाळ झालं दादा. अशा वक्ताला आपणास्नी खरं म्हणजी कांहींच कळवाय यायचं न्हाय. पण येळच तशी आली म्हणनशान् आलों. आपला संप टिकला न्हाय तर इतक्या लोकास्नी पइल्यापरीसबी फुकट मरावं लागल आणिक.

" मी येतोंच आत्ता लागलीच. "

" —पण विराग, मी काल आणलेली सायकल रे,—?—ती तशीच गेली वाटतं चंचलेच्या गाडीबरोबर ? आतां काय करायचं ? "—आकाशनं विरागला विचारलं.

" कुठली सायकल अन् चंचलची गाडी कसली ? मला कांहीं कळलं नाहीं. "

" अरे, वनिता तिथं मला काल सांगायला आली होती सायकलवरून—आईला जास्त झालंय—म्हणून. तिच्या त्या सायकलवरून मी आलों. ती तिथंच राहिलीय. वाटेंत चंचलेची गांठ पडली. ती मला आपल्या मोटारींतून चल म्हणाली. मी नको म्हटलं खूप, पण ऐकलं नाहींन् तिनं."

" चंचला कोण,—सरदेसाई का ? "

" हो. मग सायकल मागं ठेवून मोटारींतून आलों मी तिच्या. ती तशीच गेली झालं सायकल तिच्या मोटारीबरोबर. काय करायचं आतां ?—ती सायकल आतां कुणी आणि कशी आणायची तिथनं ?—"

" कुणाला तरी पाठवूं या का ? "

" कुणाला पाठवायचं ? "

त्यांचं तसं तें बोलणं चाललं होतं, इतक्यांत आकाशची चौकशी करीत एक शिपाई तिथं आला अन् अदबीनें सलाम करून आकाशच्या हातीं एक चिठ्ठी देत त्याला म्हणाला,——

" ताईसाहेबांनीं दिली या. "

" असूं दे. जा तूं. अन् हें पाहा,—सायकल तेवढी पाठवून द्या म्हणावं त्यांना माझी. मला जरूर आहे म्हणून सांग. "

——आकाश ती चिठ्ठी उघडीत म्हणाला.

—ती चिठ्ठी चंचलेनं पाठविली होती. तो शिपाई दारांत आलेला पाहातांच आकाशनं तें ताडलं होतं.

अशीं पत्रं देऊन पांच–सहा वेळां चंचलेनं त्याला आकाशकडं पाठविलं होतं.

त्या चिठ्ठींत तिनं लिहिलं होतं,——

प्रिय आकाश,

आई काल रात्रीं गेल्याचं समजलं. अत्यंत वाईट वाटलं. तुझ्या या दुःखांत मी सहभागी आहे. मी तुला भेटायला येणार होते पण सकाळपासून मला थोडं 'फेवरिश' वाटायला लागलं आहे. बरं वाटायला लागलं कीं येते.

तुझी,

चंचला.

तें पत्र वाचीत असतांना आकाश तुच्छतेनं हसत होता.

सायकलकरतां त्यांनीं बराच वेळ वाट पाहिली पण ती आली नाहीं.

शेवटीं मोटारींतून जायचं ठरवून आकाश नी तो हमाल मोटारस्टँडकडं जायला निघाले.

" खाऊन जा ना कांहीं तरी. "—विराग आकाशला म्हणाला.

त्यावर " आत्ता नको. तिथं गेल्यावर पाहीन मग. "

—असें म्हणत आकाश खोलीबाहेर पडला.

———

# प्रकरण ३ रें

‘ प्रेमची चटणी–प्रेमच भाऽऽकर–

. प्रेमच कांऽऽऽदा गूऽऽऽळ––

लुटूंऽऽया प्रेमाऽऽचा बाजाऽऽऽर...... ! ’

–– असें गुणगुणत, बंगल्यासमोरच्या बागेच्या गेटचं दार उघडत, प्रमोदनं आंत प्रवेश केला.

चंचलेनं माडीच्या गच्चीवरून तें पाहिलं. ती लागलीच आंत निघून गेली अन् घाईघाईनं रग पांघरून घेऊन कॉटवर पडली. थोड्याच वेळांत प्रमोद तिथं आला. तो येतांच चंचलेनं मुद्दामच कण्हायला सुरवात केली;–

‘ आई ग ऽ ऽ... , आई ऽ ऽ ऽ ...... अं ऽ ऽ ...... आई ऽ ऽ ऽ ...... . ’

तें ऐकून प्रमोद थिजल्यासारखा झाला. केविलवाणं तोंड करून त्यानं विचारलं,—

‘ काय होतंय आपल्याला ? ’

तिनं उत्तर दिलं नाहीं. उलट अधिक मोठ्यानं ती कण्हू लागली,––

‘ आई ऽ ऽ...... आई ग ऽ ऽ ऽ — . ’ प्रमोदनं पुन्हां विचारलं,

'—म्हणजे होतंय काय आपल्याला ?—डोकं वगैरे दुखतंय कीं—?' तरीहि तिनं उत्तर दिलं नाहीं. ती आपली कण्हत राहिली.——

त्यावर प्रमोद जवळच्याच एका वेताच्या खुर्चीवर बसत म्हणाला,—

' तरी मला वाटलंच, कांहीं तरी झालं असलं पाहिजे– म्हणून. नऊ वाजले, साडे नऊ वाजले, दहा वाजले तरी आपला तुमचा पत्ता नाहीं. मी सारखं घड्याळाकडं पाहत बसलों होतों. तुम्ही सांगितलं होतंत नऊ साडेनऊच्या दरम्यान येतें म्हणून. मोटारीचा आवाज झाला कीं मी आपला व्हरांड्यांत येत होतों पण प्रत्येक वेळेला निराश होऊन आंत जावं लागायचं. शेवटीं अशात साडेदहा वाजले. मग म्हटलं जाऊन तरी यावं एकदां.–म्हणून आलों. दहा वाजून गेल्यावर मात्र वाटलं मला– इतकी वेळपर्यंत ज्याअर्थी आल्या नाहींत त्याअर्थी तसंच कांहींतरी झालं असलं पाहिजे...... मग डॉक्टरना बोलावूं काय फोन करून ?' चंचलेला वाटलं,–आपण जर आतां असंच आणखी कण्हत राहिलों, तर हा प्राणी आपलं न ऐकतां डाक्टरना बोलावेल अन् ते आपल्या वडिलांना कळलं म्हणजे ते उगीच काळजी करायला लागतील—त्यांना उगीच त्रास होऊं नये म्हणून ती कण्हायची थांबली.

" बोलवूं डाक्टरला ? "— प्रमोदनं पुन्हां विचारलं.

" नको ! "

— चंचला हलक्या आवाजांत म्हणाली.

" काय होतंय काय आपल्याला ? "

" डोकं दुखतंय. "

" केव्हांपासून ? "

" सकाळपासून. "

" कां बरं ? "

" जाग्रण झालंय.काल रात्रीं. रात्रभर झोप आला नाहा. "

" झोला गेला होतात वाटतं ? "

" हं. "

" बहुधा भिकार देशी चित्रपट असेल कसला तरी–एखादा !-

होय ना ?...... मला हे देशी चित्रपट मुळींच आवडत नाहींत. त्यांतलं डायरेक्टिंग कधीं चांगलं असत नाहीं. फोटोग्रॅफीचीहि तीच बोंब ! बरं ॲक्टर्स म्हणावं तर नुसते नांवाचे ॲक्टर्स ! ॲक्टिंगच्या नांवानं नुसते शंख असतात ! कथानकांच्या बाबतींत तर विचारायलाच नको. एक स्टोरी कधीं अपिलिंग असेल तर शपथ !...सगळेच भिकार असतात एक जात. तेच तुम्ही फॉरिनचे पहा ! मारव्हलस् !......रेकॉर्डिंग, डायरेक्टिंग, फोटोग्रॅफी, ॲक्टिंग–साउंडिंग...एकापेक्षा एक सरस असतात. तसंच सेटिंग्ज्, सीनरीज्, गाणं, नाच—सगळच अप्रतिम !–आणि कथानकं–विशेषत: लव्ह स्टोरीज—तर कांहीं विचारूं नका. लव्ह ॲण्ड रोमान्स नुसता दुथडी भरून वाहत असतो— "

" पण कथानकंच फॉलो करतां येत नाहींत या परदेशी चित्रपटांचीं......! –अन् संभाषणंहि नीट समजत नाहींत...... "

चंचला त्याच्याकडूनच त्याच्या अकलेचं प्रदर्शन करून घेण्याकरितां मुद्दाम हलक्या आवाजांत म्हणाली.—

तिचा तो प्रयत्न पूर्णपणे यशस्वी झाला; कारण प्रमोद लागलीच म्हणाला,—

" अगदीं खरं आहे तुमचं. कथानकं मात्र मुळींच फॉलो करतां येत नाहींत. अन् संवादहि कांहीं कळत नाहींत. "

" अन् म्हणून मी परदेशी चित्रपटच पाहत नाहीं कधीं. मला आपले देशी चित्रपटच आवडतात...... "

—त्याला आणखी बनवण्याकरितां चंचला म्हणाली.

तीहि तिची मात्रा लागूं पडली. प्रमोदसाहेबानीं देशी चित्रपटांची स्तुति सुरू केली,—

" अन खरं म्हणाल, तर मलाहि आपले देशी चित्रपटच आवडतात. प्रभातचा माणूस...किती ब्यूटिफुल पिक्चर होतं–! मला नाहीं वाटत परदेशच्या एकाहि चित्रपटाला त्याची सर येईल असं ! तसाच अत्र्यांचा ब्रह्मचारी ग्रँड, वंडरफूल पिक्चर ! अन् ' न्यू थिएटर्स ' ची

पिक्चर्सहि कांहीं कमी दर्जाचीं नसतात ! मला तर असं वाटतं कीं, आणि कांहीं दिवसांनीं या परदेशच्या लोकांना बोलपटाचं शिक्षण घ्यायला आमच्या देशांत यावं लागेल. शास्त्रांत त्यांची कितीहि प्रगति झालेली असली तरी कलेच्या बाबतींत आम्हीच श्रेष्ठ आहोंत."

चंचला मनांत हसत होती. तिनें आपला तो भाव चर्येवर मात्र व्यक्त होऊं दिला नाहीं. आपण असंच जर प्रमोदशीं बोलत राहिलों अगर कांहीं न बोलतां त्याचं नुसतं ऐकत राहिलों तर हा कांहीं येथून हलणार नाहीं. असाच बडबडत राहील.—असं चंचलेला वाटलं. अन् त्यावेळीं तरी त्याचा सहवास तिला एक क्षणभरहि नको होता.—म्हणून तिनं पुन्हां हळुहळु कण्हायला सुरवात केली.

"चहा तरी घ्या मग.—रामूला सांगूं काय चहा आणायला खालून ?"—तिचं तें कण्हणं ऐकून प्रमोद आदरानं म्हणाला.

"कांहीं नको मला. झोप हवी आहे आतां चार वाजेपर्यंत. त्याशिवाय माझं डोकं राहायचं नाहीं."

—चंचला त्रासून म्हणाली.

"माझंहि असंच आहे, झोप नसली किंवा ती भरपूर मिळाली नाहीं कीं, डोकं दुखायला लागतं. अन् झोप भरपूर मिळाली कीं मग कितीहि डोकं दुखत असलं तरी तें लागलीच राहतं."

'ही ब्याद कांहीं आतां लवकर हालायची चिन्हं नाहींत, असं चंचलेला वाटलं. तिनं मग हळूच रग तोंडावर ओढून घेतला.

'तें पाहून झोप आली वाटतं' ?—असं म्हणत प्रमोद जायला उठला नी म्हणाला,—

"बरं आहे मग मी जातों. झोप झाल्यावर तरी मग याल काय आमच्याकडं चहाला ?— मी गाडी घेऊन येतों तीन साडेतीन वाजतां बोलवायला."

"नको मीच येईन."

"अगदीं नक्की ?"

"नक्की."

" किती वाजतां याल ? "

" चार साडेचार वाजतां. "

" ठीक आहे. मग मी जातों. विसरूं नका—हं. मी वाट पाहतों आहे. "

—असं म्हणत तो खोलीबाहेर पडला. जातांना तो मोठ्यानं गुणगुणत गेला,—

' जीव सारे ... खेऽळती, लपंडाव हा,—खेऽळती ... लपंडाव हा ऽऽऽ ! '

प्रमोद खोलीबाहेर पडतांच चंचलेनं " टळली एकदांची ब्याद " —असं पुटपुटत आपल्या अंगावरचा रग दूर केला अन् ती उठून पुन्हां गच्चीकडं गेली. प्रमोदचं तें मूर्खासारखं वागणं तिला मुळींच पसंत नव्हतं, म्हणून शक्यतोंवर ती त्याचा सहवास टाळायची. तो मात्र तिच्याशीं अधिकाधिक लगट करण्याचा प्रयत्न करायचा. अन् त्याची, मग तिला फार चीड यायची.

प्रमोदचे वडील-हरिभाऊ पटवर्धन एक वर्षापूर्वी डिस्ट्रिक्ट अँड सशनस् जज्जांच्या जागेवरून रिटायर होऊन तिथं-चंदापूरला राहायला आले होते. ते आणि चंचलेचे वडील अगदीं जीवस्य कंठस्य स्नेही होते.

हरिभाऊ चंदापूरला जे राहायला आले होते, ते त्यांना तें गांव आवडलं होतं म्हणून नव्हे. आपले स्नेही चिंतामणराव सरदेसाई—चंचलेचे वडील—यांच्या सहवासाकरितां!—चिंतामणरावहि लवकरच रिटायर होणार होते अन् त्यानंतर ते तिथंच राहणार होते. तसं त्यांनीं हरिभाऊंना कळवलं होतं. शिवाय—तूं जर इथं राहायला आलास तर मला फार आनंद होईल, म्हणून कांहींहि करून इथंच राहायला यायचं निश्चित ठरीव, असं त्यांची गांठ पडली कीं त्यांना ते आग्रहानं सांगायला विसरत नसत ; आणि प्रत्येक पत्रांत तसं वरचेवर आठवणीनं लिहीत. हरिभाऊंनाहि तें पूर्णपणें पसंत होतं. ते तिथं राहायला आल्यापासून त्या दोघांनाहि आपलं बाळपण परत आल्या-सारखं वाटूं लागलं होतं. प्रथम प्रथम त्यांच्या गांठीभेटी पडल्या-

वांचून त्यांचा एकहि दिवस जात नव्हता आणि प्रत्येक वेळेला एकदां तरी एकमेकांना एकेरी नांवानं हाक मारल्याशिवाय त्यांना चैन पडत नव्हतं. हरिभाऊ नोकरीवर असतांनाहि त्यांच्या गांठी-भेटी होत होत्या पण त्या फार तर वर्षांतून एकदां नाहींतर दोनदां. बहुधा प्रत्येक उन्हाळ्याच्या सुट्टींत मात्र ते एकमेकाकडं आळीपाळीनं राहायला जात येत असत. त्यामुळं प्रमोद नी चंचला यांचा पूर्वीचा चांगलाच परिचय होता; पण जसजसा तो वाढत गेला तसतसा चंचलेला प्रमोदविषयीं तिरस्कार वाटूं लागला, अन् तो वाढत गेला; याचं कारण—प्रमोद.—श्रीमंत नी बडा अधिकारी असलेल्या बापाचा तो एक मूर्ख मुलगा होता. त्याची आई त्याच्या लहानपणींच वारली होती. तेव्हांपासून हरिभाऊंनीं त्याला अत्यंत प्रेमानं वागवलं होतं. पण त्या त्यांच्या लाडामुळंच तो मूर्ख बनला. त्याला मॅट्रिकला तीन वर्षं लागलीं होतीं. कॉलेजमध्येंहि तीच रड: प्रिव्हिअस्-इंटर या प्रत्येक वर्गांत त्यानं दोन दोन वर्षं घालवलीं. अन् बी. ए. मध्ये तर कायमचाच तळ दिला. त्याला बी. ए. होतां आलं नाहीं. शेवटीं हरिभाऊंनींच कंटाळून त्याला कॉलेज सोडायला सांगितलं. प्रमोदला तेंच हवं होतं. कॉलेज सोडल्यावर —सुटलोंत एकदाचं आपण—असं त्याला वाटलं. त्यानंतर सिगरेटस्, चहा, सिनेमा, गप्पा अन् प्रेम हाच त्याचा जीवनक्रम होऊन बसला. त्याचं तें वागणं हरिभाऊंना पसंत पडेनासं झालं; पण तें बोलून दाखविण्याचा त्यांनां धीर होत नव्हता. तें कांहींच त्यांच्या हातीं राहिलेलं नव्हतं. हरीभाऊंना त्याचा अत्यंत खेद वाटे. त्यांची मोठी निराशा झाली. 'त्याला आय. सी. एस्.-ला पाठवायचं. त्याचा सगळा खर्च चिंतामणरावांच्याकडून घ्यायचा. अन् मग आय्. सी. एस. होऊन येऊन तो कलेक्टर झाल्यावर चंचलेशीं मोठ्या थाटामाटांत त्याचं लग्न करायचं.' असे बेत त्यांनीं आपल्या मनाशीं कितीतरी वेळां केले होते. पण ते सगळेच ढासळले. त्याच्या लग्नाच्या बाबतींत मात्र अजूनहि त्यांना थोडी आशा वाटत होती. ... तिथं राहायला येण्यांत स्नेह्याच्या सहवासाबरोबरच त्यांचा तोहि आणि एक हेतु असावा.— आपण तिथं राहायला गेलोंत म्हणजे प्रमोद नी चंचला

ांचा परिचय वाढत जाईल, त्यांचं प्रेम जमेल, अन् मग लग्नहि होईल, ·असं त्यांना वाटणं शक्य होतं.

चिंतामणरावांचेहि तेच बेत होते—'हरिभाऊ आपला जिवाभा· ाचा मित्र आहे. मुलगाहि कांहीं वाईट नाहीं. चांगला शिकला, आय. ी. एस्. वगैरे झाला, तर चंचलेकरितां स्थळ शोधीत बसायचं कारण ाडणार नाहीं आपल्याला.'–पण त्यांचीहि निराशा झाली. मात्र तरीहि ंचलेचं प्रमोदशीं लग्न व्हावं, ही त्यांची इच्छा सर्वस्वी लोप पावली न्हती. राहूनराहून त्यांना वाटत होतं,–

हल्लींच्या या दिवसांत शिक्षणाला किंवा मोठ्या अधिकाराच्या नोकरीला तरी कुठं महत्त्व आहे एवढं ? पैसा असला म्हणजे झालं.– आणि काय हवं ? मुलगाहि कांहीं तितका वाईट नाहीं. अन् पैसा'भरपूर आहे हरिभाऊंच्याकडं. योग्य वर हुडकून काढण्याकरितां घर डोक्यावर घेऊन जगभर हिंडत बसण्यापेक्षां हेंच जमून आलं तर कांहीं वाईट नाहीं.–हरिभाऊंनीं तिथं राहायला यावं म्हणून ते जे विशेष आग्रह करीत होते, त्याचं हेंहि एक कारण असण्याचा संभव होता. त्यांचीहि कल्पना होती,–'हरिभाऊ इथं राहायला आल्यानंतर प्रमोद नी चंचला यांचा परिचय वाढत जाईल. त्यामुळं त्यांना एकमेकाविषयीं आकर्षण वाटूं लागून त्यांच्यांत प्रेम उत्पन्न होईल.–अन् मग लग्न काय तेव्हांच जमेल.'

—पण झालं उलट.

ते तिथं राहायला आल्यानंतर–प्रमोद नी चंचला यांचा परिचय वाढत गेला पण त्यामुळं चंचलेला प्रमोदविषयीं प्रेम वाटण्याऐवजीं तिरस्कार वाटूं लागला. अन् तो वाढत गेला.–इतका कीं, त्याचं बोलणं, चालणं, हसणं, विनोद–प्रत्येक गोष्ट तिला तिरस्करणीय वाटूं लागली. प्रमोदला मात्र चंचलेविषयीं विलक्षण आकर्षण–प्रेम–वाटूं लागलं होतं. चंचलेशीं आपलं नक्की लग्न होणार अशा तो कल्पनेंत होता. तिच्याशीं तो मूर्खासारखा वागायचा. त्याच्या त्या वागणुकीमुळंच पुढं थोड्याच दिवसांत तो चिंतामणरावांच्या मनांतूनहि उतरत गेला. त्याच्या मूर्खपणाच्या

एक एक लीला चंचला हसत सांगूं लागली कीं मूर्ख आहे झालं,--असं म्हणून तेहि हसत, अन् मनांत म्हणत,—

'बरं झालं आपण चंचलेच्या लग्नाची घाई केली नाहीं.'

पण या साऱ्या घटनांचा परिणाम चमत्कारिक घडून आला. चिंतामणराव हरिभाऊंशीं पूर्वींइतक्या प्रेमानं वागेनासे झाले आणि हरिभाऊंच्या मनांत त्यांच्याविषयीं अढी उत्पन्न होत गेली.

त्यांच्या वागणुकींत विशेष बदल झाला नव्हता. पूर्वीं सारखंच ते एकमेकांशीं वागत होते. त्यांचीं मनं मात्र बदलत चाललीं होतीं.

मूर्ख असला तरी प्रमोद आपल्या वडिलांच्या स्नेह्याचा मुलगा आहे, याची जाणीव ठेवून चंचला त्याच्याशीं वागत होती. प्रमोदविषयीं आपल्याला वाटणारा तिरस्कार आपल्या वागणुकीवरून त्याच्या प्रत्ययास न येईल अशी ती दक्षता घेत होती. तें सगळं समजण्याइतका प्रमोद सूज्ञ नव्हता. त्यामुळं त्याच्या वागणुकींत कसलाच बदल घडून आला नाहीं. उलट तींत जास्त जास्तच भर पडत गेली.

चंचला त्याचा सहवास टाळायची, अन् प्रमोद तो जास्तींत जास्त घडवून आणण्याच्या प्रयत्नांत असायचा.—वरचेवर तो तिला चहाला आपल्या घराकडं बोलवायचा. सिनेमाला येण्याबद्दल तिला सारखा आग्रह करायचा. उगीचच कांहींतरी विषय काढून तिच्याशीं तासन् तास गप्पा मारीत बसायचा.—

त्या दिवशीं सकाळीं नऊ वाजतां आपल्याकडं चहाला येण्याबद्दल त्यानं तिला आदलेच दिवशीं आमंत्रण देऊन ठेवलं होतं. त्या वेळीं चंचला मुद्दामच म्हणाली होती,—

"चहा सोडलाय मी अलीकडं."

त्यावर तो खुळा "चहा राहिला. कॉफी घ्यायला काय हरकत आहे?" असं म्हणाला होता.

उगीच विषय वाढवायला नको म्हणून तिनं त्याचं तें आमंत्रण स्वीकारलं होतं अन् त्याचवेळीं तिनं मनाशीं ठरवलं होतं,--सकाळीं

नऊ वाजायच्या अगोदरच आकाशकडं जावं म्हणजे झालं. प्रमोदनं कां आला नाहींत म्हणून विचारलंच तर त्याला सांगावं आठवणच राहिली नाहीं म्हणून; अन् फार तर नंतर म्हणावं—' sorry हं. ' आकाशच्या आईला जास्त झालंय. अशा वेळीं आपण पुन्हां त्याच्या घरीं गेलों तर त्याच्यावर खात्रीनं परिणाम होईल. त्याला आपल्याविषयीं आपलेपणा वाटूं लागेल. '—पण सकाळीं तिला त्याची आई वारल्याचं समजलं. तेव्हांच त्याला भेटून यावं असं तिच्या मनांत आलं होतं पण पुन्हां तिला वाटलं,— एखाद्याचं अत्यंत जिव्हाळ्याचं माणूस मेलेलं असल्यावेळीं त्याला भेटायला जाण्याचा आपल्या आयुष्यांतला हा पहिलाच प्रसंग आहे. शिवाय आपल्याला आकाशविषयीं प्रेम वाटत असलं तरी त्याच्या आईविषयीं आपल्याला इतकं कुठं काय वाटत होतं? तिचा आपला तसा परिचयहि नव्हता विशेष. मग तिच्या निधनाचा आपल्या मनावर कितीसा परिणाम होऊं शकेल?—अन् तो जर झाला नाहीं तर आपल्याला कितीसं दुःख वाटेल—? अन् समजा, तें विशेष वाटलं नाहीं—अन् आकाशच्या तें निदर्शनाला आलं नि त्यानं आपल्याविषयीं कांहींतरी ग्रह करून घेतला तर—? त्यापेक्षां आठ नऊ वाजतां आपल्या शिपायाबरोबर त्याला एक दुःखप्रदर्शनपर पत्र पाठवावं अन् त्यांत लिहावं,—' मीच येणार होतें, पण आजारी असल्यामुळं येतां आलं नाहीं. '—म्हणजे तो नाखूष होणार नाहीं. शिवाय आपण आजारी आहोंत असं निमित्त सांगून प्रमोदचा चहाहि आपल्याला टाळतां येईल. तसंच करायचं तिनं ठरवलं. नऊ वाजायच्या सुमारास एक चिठ्ठी लिहून ती आपल्या शिपायाबरोबर तिनं आकाशकडं पाठविली. तो शिपाई आकाशकडून परत येऊन काय सांगतोय तें जाणण्याची तिला उत्कंठा लागून राहिली होती. त्याची वाट पाहात ती गच्चींत उभा होती अन् इतक्यांत हे प्रमोद महाशय आले होते. तिनं ठरविल्याप्रमाणं आजारी असल्याचं सोंग करून त्याला सरळ परत पाठवलं अन् पुन्हां त्या शिपायाची वाट पाहात ती गच्चींत जाऊन उभी राहिली. प्रमोद गेटचं दार उघडून बाहेर पडला होता. त्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडं पाहात चंचला स्वतःशीं म्हणाली,— ' नुसता मूर्ख आहे झालं! '

अन् मग तिच्या मनांत विचार घोळूं लागले, '--आकाशलाहि आपल्याविषयीं असंच वाटत असेल?—मग कां तो आपल्याशीं असं वागतो?—खरंच मोठा खट्याळ अन् विचित्र आहे तो ! अन् त्याच्याविषयीं मग आपल्याला इतकं कां आकर्षण वाटतं ?—तो तसाच एक आदर्श नी असामान्य तरुण आहे—म्हणून ! हसणं, बोलणं, वागणं, या त्याच्या प्रत्येक कृतींतून त्याचं असामान्य व्यक्तिमत्व प्रगट होतं. आपल्याशींच काय सगळयाच तरुणींशीं तो असं बेफिकीरपणानं वागतो नी तसंच वागत होता. त्यामुळंच त्याच्याविषयीं आपल्याला एवढं आर्कषण वाटतं. विशेषत: एखाद्याच्या बाबतींत अन्याय होतो आहे असं त्याला दिसून आलं म्हणजे त्याची त्याला मनस्वी चीड येऊन ··· लागलीच त्याची बाजू घेऊन तो त्या अन्यायाचा प्रतिकार करायला जेव्हां सिद्ध होतो, त्यावेळची त्याची वृत्ति, नी त्याच्या दृष्टींत व्यक्त होणारा करारीपणा, शत्रूवर चाल करून निघालेल्या सिंहासारखीं वाटतात.

--पण याला या मजूर, कामगार नी शेतकरी वर्गांविषयीं एवढा जिव्हाळा कां वाटावा कळत नाहीं. कुणी सांगितलंय याला या असल्या क्रान्तिकारक चळवळी करायला ? आपण नी आपल्या वडिलांची एवढी श्रीमंती याचा त्याला यत्किंचित् सुद्धां कां मोह वाटूं नये ?—मग याला हवं तरी काय ? खरंच याला कसली सहचरी हवी असेल ?–कां हा आजन्म असाच राहाणार आहे. छे पण मी नाहीं त्याला तशी राहूं देणार. अशा तरुणाला प्रेमानं वश करून घेऊन त्याच्यावर अधिकार गाजवणारी तरुणीहि आदर्श ठरेल. तशी मी होणार. आतां बाबांना कळलं तरी चालेल. ते नेहमीं म्हणत असतात, ' चंचले, आतां तूंच माझं जीवनसर्वस्व आहेस, तुझं सुख तेंच माझं सुख '—अन् तसं ते वागतातहि आपल्याशीं. त्यांना स्पष्ट सांगून टाकावं,–' आकाशवर माझं प्रेम आहे, अन् त्याच्याशीं लग्न झालं तरच मी खरी सुखी होईन. त्यांचं आपल्यावर खरोखरीच इतकं निस्सीम प्रेम असेल, तर आपल्याकरितां नोकरीला अगर पेन्शनला मुकावं लागलं, तरी त्यांनीं हरकत घेऊं नये. त्यांचं तितकं आपल्यावर निस्सीम प्रेम आहे अन् ते कसलीच हरकत घेणार नाहींत हें खास ! पण

या अकाशाला कसा वश करायचा ? खरंच याला आपल्याविषयीं कसं प्रेम वाटूं लागेल ?-कां आपल्या अगोदर वनिता त्याला वश करून घेईल ?- मला नाहीं वाटत हा असला विचित्र तरुण तिला वश करून घेतां येईल असं. आपण मात्र आतां त्याचा स्वभाव नीट जाणून घेऊन त्याच्याशीं नीट दक्षतेनं नी धोरणानं वागायला हवं. यापुढं प्रथम तो जसं आपल्याला बहुमानार्थी संबोधतो तसंच आपणहि त्याला संबोधावं अन् त्याला आपल्या इच्छेप्रमाणं वागायला लावण्याऐवजी आपण त्याच्या इच्छेप्रमाणं वागावं.- एक एक प्रयोग करून तरी पाहूं या."

इतक्यांत गेटच्या दाराचा आवाज झाला—म्हणून तिनं तिकडं पाहिलं. तो शिपाई परत आला होता. त्याला लागलीच वर बोलावून तिनं विचारलं,—

'काय झालं रे ?'

'दिऊन आलों कीं.—'

'तें झालं; पण काय म्हणाले काय ते ?'

'असूं दे म्हणाले.'

'विचारलं नाहीं का त्यांनीं तुला कुणी दिलीय म्हणून—वगैरे ?'

'त्येसनीं काय ठावं न्हाय काय मी. पांच—सा खेपा झाल्यात्या माज्या त्येंच्याकडं.'

'तें तुला कुणी विचारलंय—गाढव. फाजीलच आहेस कीं. त्यांनीं तुला कांहीं विचारलं नाहीं का म्हणून मी विचारतेय.'

'काय पुसलं नाहीं—साहेब.'

'मग एवढा वेळ कां लागला तुला परत यायला ?'

'ते घरीं नव्हतं.'

'मग ?'

'मग आपण सांगितलं हुत ततं गेलों.'

'तूं चिठ्ठी दिलीस तेव्हां कोण कोण होतं तिथं ?'

'ते अन् त्यांच्या सीनच आणि एक कोण की, दोगच हुतं. अन् एक हमालावाणी कोण कीं त्यांच्या म्होरं उबा—न्हायला हुता.'

‘ चिठ्ठी वाचतांना त्यांच्या चर्येवर कांहीं फरक झालेला दिसला का रे तुला ?—म्हणजे ते खूष झाल्यासारखे दिसले कीं नाखूष ?—’

‘ ते वाचतांना मी नव्हतो ततं. ती चिठ्ठी ठिऊन–घिऊनशान् लगीच जा म्हणूनशान् सांगितलं मला त्येनीं. ’

‘ अन् तूं लागलीच निघून आलास वाटतं मग ? ’

‘ त्येनीं सांगितलंच तसं. ’

‘ त्यांनीं तुला शेण खायला सांगितलं असतं तर खाल्लं असतंस का ? गाढव. काळजीपूर्वक काम करायची सवयच नाहींना कधीं. चिठ्ठी नेऊन दे म्हणून सांगितलं. नेली अन् दिली. आला परत. सांगकाम्या सारखी कामं करायची सगळीं. — शाहणा आहेस जा. ’

—चंचला चिडून म्हणाली.

—पण तो गेला नाहीं; कांहींतरी आठवल्यासारखं करून तो म्हणाला,—

‘ ताईसाहेब, आपणास्नी त्येनीं एक कळवाय सांगितलंया. ’

‘ काय ? ’—तिनं उत्सुकतेनं विचारलं.

‘ —सायकल तेवडी पाटवून द्यायला सांग म्हणूनशान् ; त्यासनीं जरूर हाय तिची, असं त्ये म्हणत हुतं. ’

तो निरोप ऐकल्यानंतर तिला त्या सायकलची आठवण झाली, अन् ती मग मनाशीं म्हणाली,—‘ खरंच ती सायकल तशीच विसरून आलों कीं काल. ’ नी मग आपण एक विसरलोंत, पण अद्यापपर्यंत आपल्या घरांत तिची कोणालाच कशी दाद लागली नाहीं, याचं तिला आश्चर्य वाटलं. तिला आपल्या घरच्या सगळ्या नोकरांचा राग आला. ती मग मोठ्यानं म्हणाली,—‘ सगळे एका माळेचे मणी आहेत अगदीं. एकानं सुद्धां चौकशी केली नाहीं कीं मला विचारलं नाहीं, ही सायकल कुठली ? कुणाची ? नांव नाहीं. डोकीं असतील तर ना जाग्यावर त्यांचीं. तो शंकऱ्या ड्रायव्हर तर गाढव आहे नुसता. ’—नी मग... त्याच वेळीं चिंतामणराव आपल्या दिवाणखान्यांत कोणावर तरी चिडून मोठमोठ्यानें तणतणत होते. तें ऐकून ते कोणावर नी कां संतापले आहेत तें पाहाण्याकरितां ती तेथून उठून दिवाणखान्याच्या दाराशीं गेली.

‘ गाढव आहेस. अक्कल नव्हती तुला एवढी ? कुणाची होती ती सायकल ? ’

‘ खरंच साहेब, माझा त्या सायकलशीं कांहीं संबंध नाहीं अन् ती कुणाची आहे हेंहि मला माहीत नाहीं. ताईसाहेब गाडी घेऊन परत आल्या, तेव्हां आपण फिरायला जाण्याकरतां त्यांची वाट पाहातच उभा होता. त्या आल्याबरोबर आपण निघालात. घाईमुळं माझं लक्षच गेलं नाहीं त्या सायकलकडं. ही मात्र चूक झालीय माझ्या हातून. ताईसाहेबांना मी गॅरेजमधून गाडी बाहेर काढून दिली, त्या वेळेला ती सायकल मागं नव्हती. ’

‘ मग काय आकाशांतनं येऊन ती चिकटली काय तिथं ? ’

‘ आपण ताईसाहेबांनाच एकदां विचारा, साहेब.’

‘ ताईसाहेबाना काय विचारा ? तिनं काय धंदा सुरू केलाय काय सायकली गोळा करून आणायचा ?— निर्लज्ज. मला तें कांहीं ठाऊक नाहीं. I don't want you.— ( मला तूं नको आहेस. ) हजार वेळां मी सांगून पाहिलंय तरी तुझा निष्काळजीपणा कमी होत नाहीं.—शिवाय आणि खोटं बोलतोयस् वर. तूंच ती सायकल मागं ठेवली असली पाहिजेस खास. कुणाची तरी दुरुस्तीला आणली असशील. ती परत द्यायची घाई असेल. नाहींतर आणि कांहींतरी असेल. पण तुझंच कृत्य आहे हें. You must suffer for it. तुला आतां त्याची फळं भोगलीं पाहिजेत. मूर्खा, एवढं कसं तुझ्या लक्षांत आलं नाहीं कीं— ही गाडी कुणाची आहे ?—- आपण हें करतों आहोंत काय ? त्याचा परिणाम काय होईल ? पाहातोसना तूं दररोज रस्त्यांतून माझी गाडी निघाली म्हणजे लोक कोणत्या दृष्टीनं तिच्याकडं पाहातात तें. काल ती सायकल मागं पाहून लोकांना काय वाटलं असेल ?—

—आपण फिरायला जातो त्या बाजूला तर संध्याकाळच्या वेळेला बडी बडी मंडळी फिरायला जात-येत असतात. त्यांच्यापैकीं कुणाच्या दृष्टीस जर तें पडलं असेल, तर मला ते मूर्खांत काढून हसून मनांत काय म्हणाले असतील ? आज तूं सायकल मागं ठेवलीस. उद्यां कचऱ्याची गाडी जोडशील. हो, तुला कोणी विचारणार नाहीं कांहीं. मला त्या भानगडीच

नकोत. तूं दुसरीकडं कुठंहि नोकरी पाहा. मी माझ्याकडं तुला ठेवून घेणार नाहीं यापुढं.—"

"साहेब, ही माझीच चूक आहे, असं आपल्याला वाटत असेल तर मी माफी मागतों आपली. माझ्यावर दया करा–पुन्हां मी कसलीच चूक होऊं देणार नाहीं. साहेब, पोराबाळाचा माणूस आहे मी.—"

"म्हणूनच तुझी मला कींव येत होती. पण तूं बेअकली आहेस. अब्रू घेणारा आहेस दुसऱ्याची. अशा माणसावर दया करून त्याला जवळ ठेवूं नये. तूं जा पाहूं या. माझा वेळ घेऊं नकोस उगीच."

"चुकलों साहेब मी. क्षमा करा एवढी खेप."

"क्षमा मूर्खावर करायची नसते. अन् माझं घर म्हणजे कांहीं क्षमाछत्र नव्हे."

"असं करूं नका साहेब— !"

—शंकर केविलवाणं तोंड करून म्हणाला.

चंचला तें सगळं ऐकत होती.

'मीच ती सायकल काल मागं ठेवून आणलीय–' असं चटकन् आंत जाऊन आपल्या वडिलांना सांगावं अन् त्यांचा तो गैरसमज दूर करून त्यांचा राग शांत करावा, असं तिच्या मनात येत होत; पण ती सायकल कुणाची, अन् तूं कां आणलीस, असं त्यांनीं विचारलं तर त्यांना काय सांगावं याचा ती विचार करीत होती. अशा वेळीं ती सायकल आकाशची असून ती चुकून कशी आली, हें त्यांना सांगणं वाजवी होणार नाहीं, असं तिला वाटल. शेवटीं मनाशीं एक बेत योजून ती दिवाणखान्यांत प्रवेशून आपल्या वडिलांना म्हणाली,—

'कोणती सायकल बाबा ?'

चिंतामणरावाचं तिकडं लक्षच गेलं नाहीं ते आपलं बडबडतच होते,

'—एवढा विचार नाहीं ? माणूस आहेस कां आहेस कोण ?–तूं करून नामानिराळा राहशील पण मला मात्र मूर्खपणाला धनी व्हावं लागेल. याची तुला शरम वाटायला हवी होती थोडी तरी.—लहान आहेस का आतां ?—गाढव.'

चंचला मग मोठ्यानं म्हणाली,—

‘ ती सायकल बाबा मीच आणलीय. विसरून आलीय ती. ’

चिंतामणरावांच्या रागाचा पारा एकदम खालीं आला. ते आश्चर्यानं उद्गारले,—‘ म्हणजे ! ’

त्यावर चंचला म्हणाली,—

‘ संध्याकाळीं फिरायला गेले नव्हतें का काल मी—?—’

‘ बरं मग ? ’

—भुवया चढवीत चिंतामणरावानीं विचारलं.

‘ —तेव्हां वाटेत एका मैत्रिणीची गांठ पडली....तिची सायकल झाली होती पंक्चर–म्हणून ती हातांत धरून ती चालत–रखडत निघाली होती. तिला मग मी सायकल मागं ठेवायला सांगून मी आपल्या गाडींत घेतली अन् तिला तिच्या घरीं नेऊन पोचवलं. तिनं मग मला आग्रह केला चहा ,घेऊन जा म्हणून. मी चहा घेतला अन् आपण फिरायला जाण्याकरितां वाट पाहात असाल म्हणून घाईघाईनं परत आलें. मला आठवणच राहिली नाहीं त्या सायकलची अन् ती खुळीहि विसरली. ’—असं म्हणून चंचला मोठमोठ्यानं हसूं लागली.

तिचं तें हास्य कृत्रिम होतं.

चिंतामणरावांना तें ओळखतां आलं नाहीं. तेहि मोठ्यानं हसायला लागून म्हणाले,—

‘ किती खुळी आहे ग खरंच ! ’—नी हास्याचा तो बहर ओसरल्यावर ते मग पश्चात्तापाच्या स्वरांत म्हणाले,—‘ मला वाटलं शंकरनंच केलं वाटतं हें, म्हणून मी त्याच्यावरच रागावलों. तूं सांगायचं नाहींस का तसं मला मग इतका वेळ ?

‘ आतां मी ऐकलं तुमचं हें. ’

‘ तें कां, काल फिरून आल्यापासून चाललंय कीं ! ’

‘ पण मी घरीं कुठं होते तेव्हां; सिनेमाला नव्हतें का गेलें ? रात्रीं १०॥ वाजतां परत आले मी. तेव्हां तुम्ही झोपला होतात. ’

त्यावर—' हो–खरंच ! '—असं म्हणून ते मग शंकरला उद्देशून म्हणाले,—

' अच्छा, फीर शंकर, जावो तुम अभी ! अन् हें पाहा वाईट वाटून घेऊं नकोस हं कांहीं, मी बोललों त्याचं. आणि हें कायरे हें, तुझा कोट फाटलेला दिसतोय इतक्यांत. दिपवाळीला केला होता ना रे ? बरं असूं दे. आतां जातां जातां असं कर, लल्लूभाईच्या दुकानाकडून जा. अन् जातांना दोन कोटाचं कापड घेऊन जा. माझं नांव सांग त्यांना. अन् लागलीच कोट तयार करून घे. अकरा तारखेला व्यापारीमंडळीतर्फे मानपत्रअर्पणसमारंभ होणार आहे; त्या वेळीं नवा कोट घालून आलं पाहिजेस. '

त्यावर—' ठीक आहे साहेब ! ' असं म्हणून अभिवादन करून शंकर निघून गेला नी चंचलाहि मग परत आपल्या खोलींत आली.

त्यानंतर ती सायकल कुणाबरोबर पाठवावी—यावर तिनं बराच वेळ विचार केला. शेवटीं ' चार वाजतां आपणच ती घेऊन जावी ' असं तिनं ठरविलं–कारण त्यामुळं दोन हेतु साधतां येतील, असं तिला वाटलं. एक म्हणजे प्रमोदचा चहा टाळतां येईल; शिवाय दुसरा म्हणजे आकाशला आपण भेटलों म्हणजे त्याला तेवढंच समाधान वाटेल. नी मग—' काल वनितेच्या अगोदर आकाशला त्याच्या आईला जास्त झालं असल्याचा निरोप आपल्याला पोचवतां आला असता अन् त्याला आपण लागलीच आपल्या मोटारींतून घेऊन आलों असतों तर आपल्याविषयीं खात्रीनं त्याला विशेष आपलेपणा वाटला असता—आपण थोडं लवकर जायला हवं होतं—'—अशी तिला हळहळ लागून राहिली.

आदले दिवशीं वनिता सायकलवरून आकाशला तो निरोप पोचवायला निघाली असतांना वाटेंत तिची अन् चंचलेची गांठ पडली होती. वनिता तो निरोप पोचवायला निघाली असल्याचें तिच्याकडून तिला समजतांच तिच्या अगोदर मोटारींतून जाऊन त्याला तो निरोप कळवून आपण त्याला आपल्या मोटारींतून घेऊन यावं, असं तिनं मनाशीं योजिलं होतं. लागलीच ती घराकडं आली होती. पण गॅरेजला कुलूप होतं अन्

त्याची किल्ली शंकर ड्रायव्हरजवळ होती. शंकरकडं तिनं शिपाई पाठवला. पण तो घरींच नव्हता. नंतर शंकर येऊन तिला मोटार मिळायला चांगला तास लागला होता, अन् त्यामुळं तिचा तो बेत सफल होऊं शकला नव्हता.—

चार वाजतां चंचला त्या सायकलवरून आकाशकडं जायला निघाली. प्रथम ती त्याच्या घराकडं गेली. तो घरीं नव्हता. घराला कुलूप होतं. नंतर ती विरागच्या घराकडं गेली. तिथं, तो सकाळींच सारंगपूरला गेला असल्याचं तिला समजलं. अन् मग तिला मोठ्या निराशेनं परत यावं लागलं. थोड्याच वेळांत ती आपल्या बंगल्यावर परत आली. तेव्हां प्रमोद गच्चींत उभा होता. अन् तो गुणगुणत होता,—

" प्रीतिचा भिकारी आ ऽ ला ऽऽ...
तुझ्या दर्शना ऽ ऽ ऽ ला
प्रीतिचा भिकारी ऽ ऽ ऽ "—

———

# प्रकरण ४ थें

"–मी म्हणतों तीन–! गाठीमागं तीन रुपये तरी मिळतील कीं नाहीं? कालचा आणि आजचा मिळून पंचवीसशें गाठीचा सौदा झालाय. पंचवीस त्रीक पंचाहत्तर–म्हणजे साडेसात हजार रुपये झाले. पांच हजार धरा. एवढ्याला तर मरण नाहीं ! भाव नक्की येणार कापसाला. तुम्हाला काय वाटतं ?––"—केशवराव आपल्या टक्कल पडलेल्या टाळूवरून हात फिरवत, आपल्या दिवाणखान्यांत येरझारा घालीत म्हणाले.

"येणार म्हणजे काय, आलाच पाहिजे ! वॉर टाईम आहे अन् पीक कमी आहे यंदा. महाराष्ट्रांत तर दुष्काळच आहे जवळ जवळ !" असं म्हणून दादासाहेब चारोळे यांनीं आपल्या ओठांत धरलेली सिगरेट पेटवली.

"आणि म्हणूनच छाती केली, मी एवढी; नाहींतर मूर्ख आहे काय इतका मी अशा दिवसांत असलं हें साहस करायला—?—आणि चारोळें, तुम्हाला आतां सांगायला काय हरकत आहे म्हणा, खरं म्हणजे, मी जो हा एकदम एवढा धंदा केला, तो मुंबईहून लोटावालांचं पत्र आलं म्हणून. चार दिवसापूर्वी मला त्यांचं पत्र आलं. त्यांत त्यांनीं लिहिलंय,––कापसाला यंदा तेजी नक्की होणार.–सौदा करा.–म्हणून. हा लोटवाला म्हणजे एक मोठी दांडगी असामी आहे. व्यापारांतला फार दर्दी माणूस आहे. लक्षावधी रुपये मिळवलेत त्यानं आजपर्यंत नुसत्या सट्टयावर.

एखादा सट्टा केला अन् त्यांत चट्टा लागला, असं सहसा कधीं घडलेलं नाहीं त्याच्या आयुष्यांत. त्याची आमची ओळख दोन वर्षांपूर्वी झाली. योगायोग बघा, मी नेहमीप्रमाणं आपला आमच्या आडत्याकडं उतरलों होतो. तिथं तो आपल्या कांहीं कामाकरितां आला होता. झालं. कुठले काय म्हणून चौकशी केलीन् त्यानं. अन् काय वाटलन् कुणास ठाऊक त्याला. एकदम म्हणाला,—‘ आमच्या दुकानाकडं येऊन जावा कीं मग एकदां ’—म्हणून. अन् एवढ्यावरच थांबला नाहीं. चार वाजतां मोटार पाठवलीन् त्यानं आपली.–झालं. हीच ओळख. पुढं मग आमचं जाणं-येणं वाढलं. पत्रव्यवहार सुरू झाला. अन् चांगलाच स्नेह जमला.—तर सांगायचं कारण म्हणजे,– योगायोग!– असे चमत्कारिक योगायोग एकाएकी जमून येतात बघा माणसाच्या आयुष्यांत कांहीं कांहीं वेळेला. बरं तें जाऊं द्या. तुमची खबरबात बोला.— रेस काय म्हणतीय तुमची ? ”

“ रेस काय, चालली आहे, शनिवार, बुधवार. पुढच्या शनिवारीं आतां गव्हर्नर कप आहे— ”

“ असं का— ? ”

— असें म्हणत केशवराव आपल्या येरझाऱ्या थांबवून आराम-खुर्चीवर पहुडले.

“ मागच्या खेपेला आम्हाला लागलं नाहीं कांहीं. ट्रिबलिंग खेळलों होतों. बुलबुलनं दगा दिला बघा आयत्या वेळेला; मात्र दुसरे दोन्हीहि आले. बुलबुलसुद्धां यायचा पण त्याच्यावरचा जॉकी होता नवीन. त्याला कांहीं जमलं नाहीं तें. तरी मला जॉकीची शंका आली होतीच. घोड्याचा प्रश्नच नव्हता. पळालं कीं वुइन् अगदीं ठरलेलं असायचं. पण जॉकीमुळं घात झाला; नाहींतर तुम्हाला सांगतों, अडीच ते तीन हजार रुपये मिळत होते बघा. ”

— चारोळे भुवया चढवीत म्हणाले.

“ वा चांगलाच होता कीं हो चॅन्स मग ! ”

“ तर काय!— पण हळहळून काय उपयोग आतां?— केशव-राव तुम्ही कधीं रेसकोर्सवर गेलायत् का ?

" नाहीं बुवा. मात्र जाणार आहे एकदां. फार सांगतात हो एक एक तिथलं. "

" नाहीं खरंच, बघण्यासारखं असतंय. तुम्ही खेळूं नका फार तर.— पण बघायला काय हरकत आहे ? व्यापारी कारखानदार, संस्थानिक, ऑफिसर्स— अशी बडीबडी मंडळी जमलेली असतात तिथं. कोणता घोडा बुइन येणार, प्लेस कोणता येणार,— यावर सगळीकडं चर्चा चाललेली असते. अन् एकदां रेसेस सुरू झाल्या कीं, मग तर काय बघायलाच नको. घोडे पुढंमागं होत धावत सुटले, कीं प्रेक्षकांचीं मनंहि तशींच धावूं लागतात. त्या वेळीं त्यांच्या चर्येवर व्यक्त होणारे भाव मोठे पाहाण्यासारखे असतात. आपला घोडा विजयी व्हावा असं प्रत्येकाला वाटत असतं. तसा संभव दिसला नाहीं कीं, कांहींजण ' चु–चु–चु–त्— गया ऽ– गया ऽ '— असं म्हणून हळहळूं लागतात, तर कांहींजण तो येणार अशी चिन्हं दिसलीं, कीं आनंदानं हुरळून जाऊन बेहोषपणें ओरडूं लागतात, ' आयाऽ— आयाऽ— देखो—!! ' पैशाची तर नुसती लयलूट चाललेली असते.— अन् नुसत्या नोटा !–पांच-पांचाच्या—दहा दहाच्या— शंभराच्या— ! चिल्लर बघायला मिळायची नाहीं नुसती नांवाला. संध्याकाळच्यावेळीं रेसेस संपल्यावर मात्र तिथं सर्व दिवसभर औदासिन्याचं वातावरण पसरतं. कारण बहुतेकांचे खिसे रिकामे होऊन निराशाच त्यांच्या पदरीं पडलेली असते. कांहीं कांहीं जणांच्याजवळ तर तुम्हाला सांगतों, भाड्याला पैसे उरलेले नसतात.— असे पठ्ठे असतात एक एक ! आणि आणखी एक विशेष म्हणजे--श्रीमंत, गरीब, लहान-मोठा, अधिकारी-बिनअधिकारी, असा भेदभाव अगर जातिधर्मभेद तिथं मुळींच नसतो. सगळे कसे मिळून मिसळून एकदिलानं वागत असतात. तुम्ही एकदां प्रत्यक्ष पाहाच. त्याशिवाय कल्पना येणार नाहीं तुम्हाला. "

" नाहीं खरंच, मी एकदां जाऊन पाहाणार आहे. "

"—आणि तुम्ही कांहींहि म्हणा केशवराव, पैशासारखं आयुष्यांत दुसरं कशाला महत्त्व नाहीं बघा. अन् तो एकदम खूप मिळवायचा

झाला, तर–रेस,–लॉटरी, सट्टा–असलंच कांहींतरी पाहिजे. नोकरींत कांहीं अर्थ नाहीं. व्यापार काय नुसता नांवाला उरलाय आतां. सारखीं एकेकाचीं दिवाळीं निघायला लागलीं आहेत. अन् शेती तर काय,–पाहातायच तुम्ही! शेती म्हणजे माती! दुसरं काय?—हा आमचा एकच राजमार्ग आहे बघा पैसा मिळवायचा. बनावं तर कुबेर, नाहींतर राहावं कंगाल. मधली स्थिति नसावी बघा. परवां थट्टा नाहीं केशवराव, आमच्या एका ओळखीच्या इसमाला पांच हजार रुपये लागले रेसमध्यें एका दिवसांत.–बोला आतां. तुमच्या त्या सट्टयाच्या शास्त्राप्रमाणंच आमच्या या रेसचंहि शास्त्र आहे. घोड्याचे आई–बाप, त्याची लांबी, उंची, वय, वजन; त्यानं पूर्वी कांहीं रेसेस— जिंकलेल्या असल्यास त्यांचं अंतर, त्याचप्रमाणं जॉकी, त्याचं वजन, बसण्याची पद्धत, पूर्वीचा पराक्रम, या सगळ्या गोष्टींचा अभ्यास करून गणितासारखं हें कोडं सोडवून कोणतं घोडं पहिलं येईल तें बरोबर काढतां येतं बघा. नुसतं काढतां येतं नव्हे, तर तसं काढणारीं डोकेबाज माणसं आहेत. अशा या माणसांना रेस म्हणजे कामधेनूच कीं! नुसता त्यांनीं या शास्त्राप्रमाणं थोडा विचार करायची फुरसत. बस्स. अमका घोडा पहिला येणार, हें त्यांना लागलीच कळतं. मग तो आलाच पाहिजे घोडा. ब्रह्मदेवाचा बाप आड आला तरी तो मग आल्यावांचून राहायचा नाहीं. रेसवरहि लक्षाधीश झालेले लोक आहेत केशवराव! आहात कुठं!"–विझलेली सिगारेट पुन्हां पेटवण्याकरितां टेबलावरील काड्याची पेटी घेत चारोळे म्हणाले.

"असतील कीं, खात्रीनं असतील!"–खुर्चीत चुळबुळ करीत, टाळूवरून हात फिरवीत, केशवराव उत्तरले.

"अहो, पतनपूरचे नबाब म्हणन एक मोठे संस्थानिक आहेत. पन्नास घोडीं आहेत त्यांचीं रेसचीं. तर सांगायचं कारण, एवढा मोठा माणूस आहे ना, पण स्वतः घोड्याची काळजी घेत असतो. त्याची नेहमीं पहिलीं येणारी दोन तीन घोडीं आहेत.–त्यांना पहाटे उठून तो स्वतः खरारा करीत असतो. याला म्हणावं षोक. अन् म्हणूनच खोऱ्यानं पैसा ओढतात हे लोक. माझा तरी आतां विश्वास उडाला आहे बघा बाकीच्या सगळ्या

गोष्टीवरून. एक रेसच आतां आमच्या आयुष्याचा शेवट लावला तर लावील. नाहीं ते व्याप करूनही या असल्या दिवसांत मला नाहीं वाटत माणसाला त्याच्या आयुष्याच्या शेवटीं एक चार दोन हजार रुपये तरी बघायला मिळतील असं.

"—बाकी हें मात्र खरं आहे तुमचं. कशांतच कांहीं राम उरलेला नाहीं. व्यापारांत तरी काय तसा पूर्वीसारखा फायदा होत नाहीं आम्हाला आतां मुळींच. म्हणूनच आम्हाला झालं तरी या सट्ट्याकडं शिरावं लागलं."

"बरं केलंत. हाच मार्ग मला पसंत आहे. माल खरेदी करारे,—तो पाठवारे,—अडत, हमाली, माती—मसण, सतराशें भानगडी करीत बसण्यापेक्षां; तो माल खरेदी करायला नको, पाठवायला नको,—कांहीं नको.—वायदा ठरवायचा, माल दिला नाहींतर घेतला म्हणून सौदा करायचा, अन् तो मग भाव येतांच विकून टाकायला सांगायचा; नाहीं-तर वायद्यादिवशीं तो तोडायचा कीं झालं! माल प्रत्यक्ष कोणालाच घ्यावा लागत नाहीं, अन् द्यावाहि लागत नाहीं. नुसतं आकड्यांच काम!—आकडेमोड करून फायदा तोटा ठरवून घ्यायचा.—सगळयांत उत्तम!"

"त्याशिवाय पैसा मिळवायला—मिळायला म्हणा, साधनच नाहीं हो आतां. काय करणार सांगा कीं? पैशाशिवाय तर काडी हालत नाहीं इकडची तिकडं. एक पैसा असला, कीं बस्स, कशाची जरुरी नाहीं बघा मग दुसरी! मग तुम्ही राजकारणांत पडा, समाजसुधारक व्हा, कंपन्या काढा, निवडणुकीला उभे राहा,—कांहींहि करा,—पैसा, हवा तुमच्याजवळ. तो जर नसेल तर, तुमच्या अंगांत अलौकिक गुण असूनहि जगांत तुम्हाला कोणी विचारणार नाहीं. मी आपल्या मुलांनाहि नेहमीं हेंच सांगत असतो. आमच्या मुलाला पटतं तें. पण आमची मलगी—वनिता—फार बुद्धिवान् आहे. बी. ए. ला आहे ती यंदा. तिला कांहीं पटत नाहीं बघा हें. ती भांडते माझ्याबरोबर. अन् एक एक वेळेला असले काय प्रश्न विचारते म्हणतां, कीं उत्तरंच देतां येत नाहींत त्यांचीं. परवा असंच बोलत बसलों होतों आम्ही. बोलतां बोलतां नेहमीसारखं मी आपलं सहज बोलून गेलों,—कांहींहि करून माणसानं आपल्या आयुष्यांत जास्तींत जास्त पैसा मिळवायला हवा बघा

म्हणून. त्यावर तिनं एक खवचट प्रश्न काय विचारला ठाऊक आहे का ?"

"काय ?" जांभई देत चारोळ्यांनीं विचारलं.

"ती म्हणाली,—'अण्णा, पैसा निर्माण कसा होतो हो हा ? '—मला कांहीं उत्तर देतां आलं नाहीं तिच्या त्या प्रश्नाचं. अन् तिनं मग पैसा केवळ माणसाच्या श्रमामुळंच कसा निर्माण होतो, हें मला समजावून दिलं. अन् तें पटलं बघा मला. ती म्हणाली, 'हें तुमच्या पुढचं टेबल आहे त्याचं लाकूड किती किंमतीचं असेल ?' मी म्हणालों,—'असेल फार तर चार पांच रुपयांचं.' मग ती म्हणाली—या लाकडाला ही किंमत कशामुळं आली ?' मी म्हटलं,—'कशामुळें म्हणजे तेवढी किंमत पडणारच त्याला, फुकट कसें मिळेल तें ?—' त्यावर ती हसून म्हणाली, 'तें झालं हो पण फुकट कां मिळूं नये तें ?...' मी आपलां गप्प बसलों. तीच मग म्हणाली,—तें लाकूड झाडाच्या रूपांत असतांना त्याची किंमत इतकी असणं कांहीं शक्य नाहीं, हें तरी कबूल ?—त्यानंतर ते तोडलं गेलं, कापलं गेलं, वाहून आणण्यांत आलं,—अन् म्हणून त्याला ही किंमत आली. होय कीं नाहीं ? म्हणजे ते झाडाच्या रूपांत असतांना त्याची जी किंमत होती, ती तें कारखान्यांत आल्यानंतर जी वाढली, ती—तोडणी, कापणी, वाहतुक—या माणसाच्या श्रमामुळंच. त्यानंतर त्याचं टेबल तयार झाल्यावर त्याची आणि किंमत वाढली. आतां या आपल्या टेबलाची किंमत किती असेल ?' मी म्हटलं,—'असेल कांहींतरी पंधरा—वीस रुपये.' 'मग या चार रुपयाच्या लाकडाचे जे पंधरा—वीस रुपये झाले ते कशामुळं ?'—तिनं विचारलं.

'लाकडाचं टेबल झालं म्हणून!'—मी म्हणालों. त्यावर ती म्हणाली,—'बरोबर आहे,—म्हणजेच माणसाच्या श्रमामुळं. सुतारानं श्रम घेऊन लाकडाचं टेबल तयार केलं, त्यामुळंच त्या लाकडाची चार रुपायाची किंमत तें टेबल झाल्यावर पंधरा—वीस रुपये झाली. असंच माणसाच्या जीवनाला आवश्यक असणाऱ्या सगळ्या वस्तूंना माणसाच्या कोणत्या ना कोणत्या तरी श्रमामुळं किंमती येतात.—म्हणजेच पैसा जो निर्माण होतो—तो केवळ माणसाच्या श्रमामुळंच, होय कीं नाहीं ?'

मला तें कबूल करावं लागलं. पण ती मग म्हणाली काय ठाऊक आहे का ?–"

"काय ?--" चारोळ्यांनीं उत्सुकतेनं विचारलं.

"—तेव्हां मग पैसा जर माणसाच्या श्रमामुळं निर्माण होतो, तर अजिबात श्रम न करतां पैसे मिळवायची इच्छा धरून तो तसा मिळवणं किंवा कमींत कमी श्रम करून तो जास्तींत जास्त लुबाडण्याचा प्रयत्न करणं, हें चोऱ्या करण्यासारखंच होणार नाहीं काय ?—याची गुन्ह्यांत गणना करायला नको ?

अन् मग ती पुढं म्हणाली,—म्हणून अशा तऱ्हेचे गुन्हे करायला मदत करणाऱ्या किंवा प्रोत्साहन देणाऱ्या समाजव्यवस्थाच उखडून काढल्या पाहिजेत. कारण यामुळंच समाजांत दारिद्र्य जन्माला येऊन तें वाढत जातं. अन् त्यांतून मग अनंत दुःखं निर्माण होतात. सामाजिक दारिद्र्य हा एक संसर्गजन्य रोग आहे. त्याच्यापासून अलिप्त राहाण्याचा कोणी किती जरी प्रयत्न केला तरी तो त्याला ग्रासल्याशिवाय राहाणार नाहीं.—म्हणून या रोगाचं निर्मूलन होईल अशा प्रकारची समाजव्यवस्था निर्माण करण्याकरितां झटणं, हें माणसानं आपलं ध्येय ठेवावं"—गप्प बसावं लागलं कीं हो मला हें ऐकून. काय उत्तर देणार सांगा कीं—? आमचा प्रभाकर खूप भांडतो तिच्याशीं, पण त्यालाहि ती गप्प बसवते. फारच बुद्धिवान आहे हो ती. मला फार अभिमान वाटतो तिचा. पण अलिकडं तिनं आतां चळवळींत भाग घ्यायला सुरवात केली आहे. खेड्यापाड्यांतून काय जाते, तिथं गोरगरिबांच्या वस्तींतूनच काय हिंडते, त्यांना सांगते—शिकवते काय, नाना तऱ्हा चाललेल्या असतात तिच्या. हें जर असंच वाढत गेलं तर मग मात्र कठीण आहे—"

"कठीणच नाहीं तर काय !"—चारोळे मध्येंच म्हणाले.

"तिला मग मी सांगितलं परवां, तुझं आतां लग्न करायला हवं लवकरच–या चळवळी घेऊन करायच्या आहेत काय तुला–म्हणून. पण ती काय म्हणाली ठाऊक आहे का ?"

"काय–?"—चारोळ्यांनीं विचारलं.

'—लग्न कशाकरतां करायचं ?—सुखी होण्याकरतांच ना ? अशा तऱ्हेची समाजव्यवस्था अस्तित्वांत असतांना मला नाहीं वाटत कोणालाहि सुखी होतां येईल असं. शेजारचीं घरं पेटलेलीं आहेत, त्यांच्या घरांच्या अढ्यांना आपल्या घराचीं अढीं लागलेलीं आहेत, अशा स्थितींत आपलं घर अजून पेटलेलं नाहीं म्हणून आनंदांत राहाणं जितकं शहाणपणाचं ठरेल, तितकंच तें समाजांत दारिद्र्याचा वणवा सर्वत्र भडकलेला असतांना —आपण सुखांत राहूं अशी कल्पना करणं—शहाणपणाचं ठरेल.' काय बोलायचं हो मग; असं बोलायला लागल्यावर...? तेव्हां मी आतां ठरव॰ लंय, कांहींहि झालंतरी तिचं आता लग्न उरकून टाकलं पाहिजे—म्हणून. लग्नाला ती तयार होणं थोडं कठीण आहे पण पुढं पुढं तें जास्त कठीण होत जाईल. तिचं आणि प्रभाकरचं दोघांचीहि एकदमच उरकून टाका-वींत असं म्हणतोय. दोन स्थळंहि मोठी चांगलीं आहेत बघा. पोरांचीं नशिबं चांगलीं असतील तर जमून येतील दोन्हींहि. इथले कलेक्टर राव-बहादुर सरदेसाई आमच्या प्रभाकराची चौकशी करीत होते म्हणे परवा. मलाहि त्यांनीं तसं कारण नसतांना एकदां दोनदां आपल्या बंगल्यावर बोलावून चहा वगैरे दिला आहे. मुलगी चांगली आहे त्यांची. वनितेकडं येत असते आमच्या वरचेवर. झालंच तर शिकलेली आहे. अन् एकटीच आहे बापाला; शिवाय पैसा गडगंच आहे आणि. बघूंया आतां काय काय होतंय तें. जमलंच तर नशिब म्हाणायचं झालं आमच्या प्रभाकरचं. अन् वनितेलाहि तसलंच एक स्थळ पाहून ठेवलंय. हरीभाऊ पटवर्धन म्हणून रावबहादुर सरदेसाई यांचे एक स्नेही आहेत. ते नुकतेच इथं राहायाला आले आहेत. डिस्ट्रिक्ट आणि सेशन्स् जज्ज होते ते. त्यांचा मुलगा आहे एक. तोहि एकुलता एक आहे. बी. ए. पर्यंत शिकलेला आहे.- चांगला आहे. हीं दोन्हीं स्थळं जमून एकदां लग्नं पार पडलीं, म्हणजे मग मी मुक्त झालों बघा ऋणांतनं त्यांच्या. त्यांच्याकरितां मीहि आतां जरा धोरणानं वागायचं ठरविलं आहे. इथल्या व्यापारीमंडळाचा मी प्रेसिडेन्ट आहे. तेव्हां व्यापारीमंडळातर्फे रावबहाद् दुर सरदेसाई यांना मानपत्र अर्पण करावं, असं मंडळांतील सभासदांना सुचवून येत्या अकरा तारखेला तो समारंभ

करायचं ठरवलं आहे. तो समारंभ उरकल्यावर त्यांना आपल्या घरीं बोलावून इथं या दिवाणखान्यांत त्यांना मी एक दणदणीत पार्टी देणार आहे, त्यांचं मन वळवण्याकरितां. आपल्या श्रीमंतीचं–वैभवाचं प्रदर्शन करण्याची ही संधी मी मुद्दाम साधून आणली आहे. अगदीं गार करून टाकतों बघा. हरीभाऊंनांहि आमंत्रण देणार आहे.–अहो, एका दगडांत दोन पक्षी....!"

"उत्तम. कांहीं हरकत नाहीं."

—चारोळे आपल्या हातांतील सिगरेटचं थोटूक टेबलाखालच्या कचरा–टोपलींत टाकीत म्हणाले.

"तुम्ही त्या दिवशीं यायला पाहिजे, आम्हाला मदत वगैरे करायला. आपलीं माणसं पाहिजेतच सगळीं अशा वेळीं."

"जरूर येईन—बरं आहे मग मी जाऊं का आतां?"

"जातां–?—कां?—गडबड आहे काय कसली, बसा कीं."

"गडबड कसली आली आहे म्हणा. पण मी आज आपल्याकडं आलों होतो, तें एका माझ्या खाजगी कामाकरितां."

"खाजगी कामाकरतां?—कसल्या बुवा—?

"परवा एकदां मी तुम्हाला बोललों होतों—त्याच!"

"असं–असं.—म्हणजे कशाविषयीं म्हणालांत?"

"देशपांड्यांच्या पैशाविषयीं. मुदत भरत आली आहे त्यांच्या दस्ताची कांहीतरी सोय करायला पाहिजे त्याच्या आंत. मग तुम्हाला होईल काय सवड?–"

"दस्त किती रुपायाचा आहे?"

"ऐन पांच हजाराचा आहे. व्याजासुद्धां दामदुप्पट झाली आहे."

"म्हणजे दहा हजार–?–आणखी कुणाचे बोजे आहेत काय?—"

"मग कांहीं तसे फार नाहींत कुणाचे. एकाचे कांहीतरी अडीच हजार आहेत अन् आणखी एकाचे पंधराशें अन् पांचशें मिळून दोन हजार आहेत! बस्सं खलास."

"जमिनीचं उत्पन्न किती येतं साधारणपणें?"

"कसलं उत्पन्न आलंय हो! कबजेगहाण दिल्या आहेत सगळ्या जमिनी व्याजाच्या भरतींत!"

"तूर्त तरी इतकी सवड होणं शक्य नाहीं मला मग. फार तर चार दोन हजार रुपयांची तजवीज केली असती मी. तें सुद्धां आमचा हा वायदा तुटल्यावर."

"एक आठ हजार तरी हवेत बघा मला."

"छे, मुळींच शक्य होणार नाहीं. दिवस कसले आहेत पाहाता आहांत तुम्ही. अन् आज तर कांहीच शक्य होणार नाहीं."

"छे, असं करूं नका. तुम्ही माझी एवढी नड भागवलीच पाहिजे ही."

"बरं, मग अकरा तारखेनंतर पुन्हां बोलूं आपण याबाबतींत; विचार करून सांगेन तुम्हाला मी काय तें. मला विचार करायला हवा."

"अकरा तारखेनंतर सांगा. पण नाहीं म्हणूं नका. वास्तविक पाहतां मी अशी भीड आपल्याला घालणार नाहीं. पण वेळच तशी आली आहे. नाहींतर दहा हजाराची काय कथा!—चार रेसेस् जिंकता आल्या असत्या तर फेकून टाकले असते.—"

"बरं मग मी जातों. लक्षांत असूं द्या मात्र, विसरूं नका!—" असें म्हणत चारोळे उठून जायला निघाले.

त्यावर—'छे—छे असं कुठं झालं काय!'—असं म्हणत केशवरावहि उठले आणि चारोळ्यांना पोचवण्याकरितां जिन्याच्या दारापर्यंत गेले.

त्याच वेळीं प्रभाकर जिन्यांतून वर येत होता. त्याला पाहून केशवरावानीं विचारलं,—

"कायरे, जाऊन आलास का?"

"आलों. ती नाहीं—आहे तिथं. कालहि गेलों होतों—"

"म्हणजे मग गेली कुठं?"

"तिच्या मैत्रिणींना वगैरे विचारलं मी बऱ्याच; पण त्याहि आपल्याला कांहीं ठाऊक नाहीं असं म्हणाल्या."

—प्रभाकर दिवाणखान्यांत प्रवेशत म्हणाला.

"मग कुठं गेली ही?—तो आकाश कुठं असतो, त्याचा तरी तपास करायचा होतास."

केशवरावहि त्याच्या पाठोपाठ दिवाणखान्यांत प्रवेशून म्हणाले.

" तो इथंच आहे. त्याची आई वारलीय काल. "

" आँ !—आणि—? "

" आणि तपास तरी कुठं, आणि कसा करायचा आतां मग ? "

" मग काय गप्प बसायचं ?—प्रभाकर, तुझी ती सख्खी बहीण आहे. तुला तिच्याविषयीं काळजी वाटायला हवी. "

" —सगळ खरं; पण नुसती काळजी करून काय तिचा तपास लागणार आहे ? जाऊनहि आलों कीं छप्पन ठिकाणीं; आणि कसली करायची काळजी तरी ? तिला कांही वाटायला नको होतं का,—चार दिवस विमलच्या घरीं राहायला जाते म्हणून सांगून असं परस्पर निघून जातांना. तुम्हीच करा तिची काळजी. तुमची कुठं तिला काळजी आहे ? होय बाबा, आपल्या घरीं आपले वडील आहेत, भाऊ आहे थोरला, त्यांना विचारावं, सांगावं,—मी अमुक ठिकाणीं जाणार आहे, असं असं करणार आहे—म्हणून. पण तें कसं होईल. आमच्याविषयी तिला कांही वाटत असेल तर ना ? तिला काळजी वाटते, प्रेम वाटतं, तें मजूर, कामगार, शेतकरी लोकांविषयीं. आम्ही काय,—कुठल्या झाडाचा पाला. बोलूनच दाखवते ती तसं:—नुसत्या रक्ताचीं नातीं फोल असतात; आपल्या तत्त्वाचीं माणसंच आपले खरे नातलग होत—म्हणून. कुठं तरी गेली असेल तत्त्वांचा प्रचार करायला—आपल्या. तुम्हाला एकदम काल तिची आठवण झाली, अन् तुम्ही तिला मला बोलवून आणायला सांगितलंत, म्हणून हें कळलं तरी आपल्याला.—नाहींतर ती आपल्या मैत्रिणीच्या घरीं आहे,—म्हणून आम्ही आपल्या घरीं तिच्याविषयीं निष्काळजी असायचं, अन् तिचे आपले दौरे चाललेले असायचे तत्त्वप्रचाराकरितां. "

" मग काय करायचं त्याला आतां ? मलासुद्धां खूप वाटतं, तिनं असले कांही चाळे–चळवळी करूं नयेत असं; पण उपाय काय करायचा सांग त्याला. समजा तिला आपण कांही आळा घालायचं ठरवलं पण तिला तो फास वाटायला लागला तर—? म्हणून जाणून बुजून मी तिकडं दुर्लक्ष करतों आहे. आतां एकदां लग्नच करून टाकूं या तिचं,

म्हणजे आपोआप येईल ताळ्यावर. बरं तूं आतां असं कर, दिवाणजींना तेवढं बोलावून आण. तिचा तपास केला पाहिजे आपल्याला. अरे, कांही झालं तरी ती आपली आहे. सगळींच माणसं काय सारखीं असतात— असं नाहीं. प्रत्येकाच्या आवडीनिवडी, विचारसरणी वेगवेगळी असणारच. जा, जा बोलाव पाहूंया तेवढं त्यांना."

दिवाणजींना बोलावण्याकरितां म्हणून प्रभाकर तेथून खालीं निघून गेला.

अन् केशवराव–'ती कुठं गेली असेल ?–कशाला गेली असेल ?–' असा खिन्नपणें विचार करीत आरामखुर्चावर पडले. ते जसजसा विचार करूं लागले तसतशी त्यांना तिच्याविषयीं अधिकाधिक काळजी वाटूं लागली.

नंतर दिवाणजी आल्यावर ते त्यांना म्हणाले,—

"अहो, वनिता कुठाय् ?—कालपासून पत्ता नाहीं तिचा!"

"काल त्या सारंगपूरला गेल्या आहेत म्हणे."

—दिवाणजी डाव्या हातानें चष्मा नाकावरून कपाळावर नेत म्हणाले.

"सारंगपूरला ?"

"हो. काल रामूला सकाळीं पाठवलं होतं मी सारंगपूरला, बाकी वसूल करायला. तो मोटारींतून परत येत असतांना वाटेंत त्या सायकलवरून तिकडं गेलेल्या त्यानं पाहिल्या!"

"सायकलवरून गेली आहे ?"

"हो."

"म्हणजे ?—आणि सायकल कुठली घेतलीन् मग तिनं. ?"

दिवाणजीबरोबर प्रभाकरहि तिथं आला होताच. तो म्हणाला,—

"आपली घरचीच घेऊन गेलीय्."

"पण गेली कशाला ती तिकडं ?"

"देव जाणे!"

—दिवाणजी कानावर हात ठेवीत म्हणाले.

इतक्यांत खालीं कोणतरी हाका मारीत असल्याचं त्या सगळ्यांनाच ऐकायला आलं.—

‘ केशवराव, अरे केशवराव—’

दिवाणजी खालीं गेले.

सारंगपूरचे झुंबरलाल मारवाडी केशवरावांच्याकडं आले होते.

दिवाणजी त्यांना वर घेऊन आले .

“ जयगुपाल—केशवराव, ”

—झुंबरलाल अभिवादन करीत म्हणाले.

“ नमस्ते. या. बसा कीं ! ”

—जवळच्या एका खुर्चीकडं बोट करत केशवराव म्हणाले.

“ बसतेय् कशला. डोका फुरवून टाकली तुमी आमचा. हामचा बेपार बंद पाडले शगळा तुमी. ”

“ म्हणजे काय म्हणतां आहां काय तुम्ही हें ? ”

—केशवरावनीं आश्चर्यानें विचारले.

“ कशले काय म्हणटे. तुमी हितं सोस्त बशलेत. तुमची पोरगी तिने समदा बेपार बंद पाडले आमचा ! ”

“ म्हणजे ! काय केलन् काय तिनं ? ”

“ काय केला–?—काय करायचा राकलाय–?—समदे हमाल—गाडीवानास्नी सांगूनशेन त्येसनी संप करायला लावलीय. हमाली–गाडीभाडा जादा मिलायपाय. तुमचे पोरगीनें असे करायला न्हाई पायजे व्हता. आमी बेपार करते तुमीबी बेपार करते. अशी बेपारी बेपारीचा दुष्मन झ्याली तर कशी व्हायचा–?—आन् हे हमाल–गाडीवान लोकांची फायदा करून देऊनशेन तुमचे पोरगीला काय फायदा हाय ? आमची मातर तोटा झ्याला. बेपार बंद पडलेय् कालपासून शमदा. एक आकाश म्हणून पोरगा हाय हातलाच. त्येनं हे शमदा भालगड केलाय. त्येच्यावर हामी खटला भरायचा च्यालला व्हता. तवर ते पशार झ्याला, अन् तुमची पोरगी आला कल. तुमी आपला माणूस म्हणून अमी मग गप बसला शमदा. आमाला पंचायत पडलाय काय करावा म्हणून. शाला भाड्याच्या

मोटारी करावा म्हणलं, तर ते बी पेट्रोल म्हागला म्हणून जादा पैसा मांगतंय; आन् दूशरा हामाल बी मिळत न्हाय. ते मिळवायचा खटपट च्यालल्याय आमचा. तुमी आपले पोरगीला सांगा न्हायतर हामाला मंग इलाज करावं लागल. तुमचे पोरगीला तुमी घेऊन आलित आन् मग आकाश आली तर हामी पाहील त्येचा. तुमी आपला माणूस म्हणूनशेन् आमी मुद्दाम तुमास्नी सांगाय आला."

"आम्ही येतोच आतां सारंगपूरला; अन् आमची मुलगी पुन्हां तिथं असलं कांहीं करणार नाहीं अशी व्यवस्था करतों, लागलीच तिला परत घेऊन येऊन. तुम्ही माझ्याकरतां तसदी घेऊन मुद्दाम इथपर्यंत येऊन मला हें कळवलंत त्याबद्दल मी तुमचा आभारी आहे!"

"आभार कसली आलीय त्येच्यामंदी तुमी आपला माणूस हाय म्हणून तर आमी आला. बेपार कमीटेचे तुमी हितला पेर्सिडेन्ट हाय. तुमचे पोरगीनें बेपारी लोकांइरुद्ध असला काम करायला न्हाई पायजे व्हता."

"सगळं खरं, पण झालंय त्याला आतां उपाय नाहीं. यापुढं ती निदान तिथं तरी असलं कांहीं करणार नाहीं असं मी आश्वासन देतों. चला आतां आपण जाऊंच या सारंगपूरला सगळे,"

असं म्हणत केशवराव खुर्चीवरून उठले नी त्यांनीं दिवाणजीला सांगितलं,—

—"दिवाणजी, मोटार ठरवून आणा पाहूंया भाड्याची एक चटकन्."

# प्रकरण ५ वें



सारंगपूरला त्या दिवशीं ज्यावेळीं ती हमाल-गाडीवानांची सभा चालली होती. त्याचवेळीं — झुंबरलाल मारवाड्यांच्या माडीवर तिथल्या प्रमुख व्यापाऱ्यांचीं खलबतं चाललीं होतीं. त्यांत शेवटीं—' संप पुकारला तरी हरकत नाहीं त्यांनीं. एक पै वाढवायची नाहीं. आपण भाड्याच्या मोटारी ठरवून आणून माल वाहातूक करूं, अन् खेड्यापाड्यांतून दुसरी माणसं हमाली करायला बोलवूं. त्यांची चांगली खोड मोडली पाहिजे. आपल्या मागण्या मान्य होतात,—असं एकदां का त्यांना समजून चुकलं म्हणजे पुढं आपल्याला ते फार जाचक होईल. तसं होऊं नये म्हणून आतांच आपण खबरदारी घेतली पाहिजे. कांहीं झालं तरी त्यांच्या मागण्या मान्य करायच्या नाहींत. त्यांनीं संप केलाच तर तो हाणून पाडण्याकरतां शिकस्तीचा प्रयत्न करायचा, अन् त्या आकाशवर पोलीसना सांगून खटला भरायला लावायचा.—'—असं ठरवून ते व्यापारी ... आपआपल्या घराकडं जायला निघाले. इतक्यांत हमाल गाडीवानांची एक प्रचंड मिरवणूक ... ... समोरच्या सडकेवरून येत असलेली त्यांना दिसली. ती पाहून ते थोडा वेळ मग तिथंच थांबले. ' गरिबांचा न्याय करा ! ' —' आमची मजुरी वाढवा ! ' —अशा आरोळ्या ठोकत ती मिरवणूक येत होती. वनिता तिच्या आघाडीवर होती.

तें पाहून झुंबरलाल म्हणाले,—

“ हे पोरगी कुटली आलाय आणिक शाला ! आन् ते आकाश कुटं दिसत न्हाय ! हे हमाल गाडीवान् शमदा एक ठ्याल:वाणी दिसतोय कीं शाला. शंप पुकारली काय कीं लेकाचे...”

थोड्याच वेळांत ती मिरवणूक त्या माडीखालच्या सडकेवर आली. तिथें आल्यावर त्या माडीवर बरेच व्यापारी लोक जमलेले पाहून कांहीं जणांनीं त्यांना उद्देशून मोठमोठ्यानें शिव्या द्यायला सुरवात केली. अन् त्या मिरवणुकीबरोबर असलेल्या कांहीं लहान मुलांनीं तर त्या माडीवर दगडांचा वर्षाव सुरूं केला. व्यापाऱ्यांनीं माडीच्या खिडक्यांचीं वगैरे दारं लावून घेतलीं.

तें वनितेला समजतांच लागलीच मिरवणूक थांबवून मिरवणुकीं-तल्या त्या सगळयांना उद्देशून ती मोठ्यानं म्हणाली,—

‘ असा अविचार करूं नका. शांतपणें चला. ’

शिव्या बंद झाल्या. दगडांचा वर्षाव थांबला.

मिरवणूक पुन्हां सुरू झाली. ‘गरिबांचा न्याय करा,–आमची मजुरी वाढवा ’– या आरोळ्या पुन्हां निनादूं लागल्या.

ती मिरवणूक तेथून पुढें गेल्यावर,—‘ त्या मिरवणुकीच्या आघाडी-वर असलेली ती मुलगी कोण असावी ’ याविषयीं त्या व्यापाऱ्यांत चर्चा सुरू झाली.

त्यांच्यापैकीं एकजण म्हणाला,—

‘ ही बहुतेक चंदापूरच्या केशवरावांची मुलगी असावी. ’

‘ कोण केशोवराव ?–’

—झुंबरलालनीं विचारलं.

‘ व्यापारीमंडळाचे अध्यक्ष आहेत ते. कंदील-कट्ट्याजवळ त्यांचं दुकान आहे बघा. ”

‘ अरे, आपली बेपारी केशोवरावचे हे पोरगी हाय ! काय म्हणते ? ”—

इतक्यांत त्या हमाल-गाडीवानांच्या सभेला मुद्दाम हजर राहिलेला एक व्यापारी तिथली सगळी हकिगत सांगण्याकरतां तिथं आला.

झुंबरलालनीं त्याला विचारलं,—

" काय कोठाडी—?—काय, खबरबाट काय हाय ?— "

" मघाशीं सभा झाली. त्यांत संप पुकारायचं ठरवलंय त्यांनीं. हमाली आणि गाडीभाडं दीडपट वाढविल्याशिवाय कोणीहि कामावर जाऊं नका, असा त्या आकाशनं त्यांना सल्ला दिलाय. "

" आन् त्यो आकाश कुटं गेली मग ? मगाशी काय दिशला न्हाय ते मुरवणुकींत कुटं. "

—झुंबरलालनीं उत्सुकतेनें विचारले.

" त्याची आई आजारी आहे म्हणे फार, म्हणून तो तिला भेटायला गेलाय. "

" आणि मग आता संप वगैरे चालवणार कोण ? "

—मध्येंच एकानं विचारलं.

" ती मुलगी पाहिली नाहींत का तुम्ही आता मिरवणुकीच्या पुढं होती ती ? ती पाहाणार आहे सगळं तो परत येइतोंपर्यंत. चंदापूरच्या आपल्या केशवरावांची मुलगी ही. शिकलेली आहे चांगली. "

—कोठारी म्हणाले.

" दुनिया उलटी झ्याली बगा शगळी. आता हेला काय करावा ? भावाला तेजी हाय. मालबी बझारमंदी खूप येऊन न्हायलंय. आन् अशा वक्तालाच हे शाला शंपाचा चाललंय. आन् तेबी बेपारीचे पोरगी त्येला शामील हुनशेन् !—आमच्या च्यांगलीं वळकीची हाय ही केशेवराव. आमी सकाळपारीं त्येच्याकडं जाऊनशेन् आपले पोरगीला असला काय —करू नगो म्हणूनशेन् सांगायला सांगतें त्येला ! "

" तुम्ही जाऊन तसं करा. आम्ही तवर भाड्याच्या मोटारी मिळवण्याचा प्रयत्न करतों. त्या बहुतेक मिळतील. "—एक शेटजी म्हणाले.

"आणि हमाली करायला माणसंहि मिळतील आसपासच्या खेड्यां-तून खटपट केली तर." —दुसरे एक शेठ म्हणाले.

" हो-हो; न मिळायला काय झालं? वाटेल तितकी मिळतील."

—एका लठ्ठ सावकारांनीं दुजोरा दिला.

" चांगली खोड मोडूं या लेकांची. दुप्पट खर्च आला तरी हरकत नाहीं मग. संप करतायत्–संप. कायमचंच संपावर राहावं लागेल म्हणावं अशानं. तुम्हाला संप करा म्हणून काय कुणीहि येऊन शिकवील. उद्यां पोटाला चिमटा बसायला लागला म्हणजे मात्र मग कुणी पैसे आणून द्यायचा नाहीं. आमच्याकडंच पुन्हां यावं लागेल मग झक मारत. अन् हे शिष्ट त्यांना संप करायला शिकवतात. त्यांच्या कल्याणाची फार काळजी ना यांना. स्वतःला पोट भरायची अक्कल नसायची, अन् कल्याण करायला निघालेत दुसऱ्यांचं. अन् ही भवानी आणि आली आहे आज नवीन. चोंचले सगळे, दुसरं काय. घरच्या म्हातारीचे काळ हे. परदे-शच्या व्यापारी कंपन्या खोऱ्यानं पैसा ओढताहेत. तो थांबेल असं कांहीं तरी करा कीं म्हणावं. म्हणजे मग आम्हाला कांहीं तरी वाव मिळून धडाडीनं व्यापार करतां येईल, चांगला फायदा होऊं लागेल, अन् मग आपोआप मजुरी, हमाली, गाडीभाडं, सगळं वाढत जाईल.—मग संप करायला नकोत, सभा करायला नकोत, कांहीं नको. फायदा बोंबलतोय कुठं तसा आम्हाला तरी व्यापारांत. तें कांहीं नाहीं बघा, चांगली खोड मोडली पाहिजे यांची!"

—जरीच्या काठ्याचा रुमाल बांधलेले एक एकाक्ष आपल्या उजव्या हाताच्या बोटांतील खड्याची आंगठी डाव्या हाताच्या बोटांनीं फिरवीत— म्हणाले.

" तसंच करूं या.—सकाळपर्यंत काय काय होतंय तें पाहूं या. बहुतेक त्यांच्यांत फूट पडेल. अन्न मिळायला नको का खायला? तें मिळे-नासं झालं कीं, झक्कत येतील मग. या लोकांचीं पोटं हातावरचीं असतात. रोज मिळवावं तेव्हां खायला मिळायचं. मिळकत थांबली कीं लागलीच चूल बंद पडेल त्यांची. अन् मग पोटाला चिमटा बसायला लागला कीं

आपोआप नाकं घासत येतील. बघा पाहिजे तर मी म्हणतोय तसं होतंय कीं नाहीं तें?—आतां आपण सकाळीं ठरवूं काय तें. "

—ते लठ्ठ सावकार म्हणाले. त्यानंतर ती मंडळी तेथून निघून गेली.

झुंबरलालचा गडी—मारुती तें सगळं ऐकत होता. रात्रीं घराकडं जेवायला जाण्याऐवजीं हमाल—गाडीवानांच्या वस्तींत जाऊन त्यांना तें सगळं सांगावं, असं त्यानं मनाशीं ठरवलं.

—मारुती नऊ—दहा वर्षे झुंबरलालच्या घरीं कामाला होता. सुरवातीला त्यांनीं त्याला दहा रुपायावर नेमून घेतलं होतं. अन् आतां त्याला ते आठ रुपये देत होते. सकाळीं सात वाजल्यापासून रात्रीं दहा वाजेपर्यंत त्याला तिथं काम करावं लागे. दोन वेळां घर झाडायचं. सकाळ संध्याकाळ पंचवीस—पंचवीस घागरी आडाचं पाणी ओढून तें भरायचं. ढीगभर भांडीं घासायचीं. धुणीं धुवायचीं. अंथरुणं टाकायचीं. काढायचीं. दिवाबत्ती करायची. पोरं संभाळायचीं आणि याशिवाय पडतील ती कामं करायचीं. तो तिथं कामाला लागला तेव्हां अंगापिंडानं चांगला धष्टपुष्ट होता, पण चारच वर्षांत त्या कामानं त्याचा चांगलाच पिट्टा पडला. तो खंगत चालला. पुढं पुढं तर तो जास्तच खंगत गेला. त्याचीं हाडं दिसूं लागलीं, गाल बसले, डोळे खोल खोल जात चालले. शक्ति कमी झाली. त्याच्या हातून दोन वेळचं पाणी ओढणं होईनासं झालं. झुंबरलालनीं त्याचा एक रुपाया कमी केला. पुढं आणखी एक कमी केला. सकाळीं एक तास अन् संध्याकाळीं एक तास अशी जेवायला जाऊन येण्याकरतां त्याला दोन तास सुट्टी मिळायची.—मिळायची कसली आलीय—तो घ्यायचा. म्हणजे दररोज जवळ जवळ बारा—तेरा तास त्याला तिथं राबावं लागत होतं अन् त्याचा मोबदला त्याला फक्त चार आणे मिळायचा. त्यांत त्याचं मुळींच भागत नसे. घरांत बायको आणि दोन पोरं होतीं त्याला. अगदीं जेरीला आला होता तो. अलिकडं त्याच्या मनांत विचार घोळूं लागले होते,—' असं कां होत असेल बरं हें?—इतके कष्ट करूनहि मला भरपूर पैसे कां मिळूं नयेत? अन् हा शेटजी

मात्र लोडाला टेकून शेकडों रुपये मिळवतोय रोज. कांहीं जणांना फारसे कष्ट न करतां असे वाटेल तितके पैसे मिळू शकतात म्हणूनच आमच्या-सारख्या बऱ्याचशा जणांना भरपूर कष्ट करूनहि पुरेसे पैसे मिळणं अशक्य होत असलं पाहिजे.—अन् त्याला वरचेवर वाटत होतं,—' खरंच कष्टा-प्रमाणं प्रत्येकाला पैसा मिळण्याची सोय झाली, तर किती बरं होईल. आमच्या ह्या शेटजीचं सगळं दोंद झडेल मग, अन् मी पैलवानासारखा होईन पुन्हां. पण असं कधीं होईल का? काय नि कसं करावं म्हणजे तें तसं होईल?' झुंबरलालला वरचेवर दाताच्या कण्या करून तो विनंती करायचा, ' शेटजी, पगार वाडवा कीं थोडा–'—म्हणून,

झुंबरलाल त्याला ठराविक उत्तर देत,–' अरे, काय खुला–बिला है काय अदमी तुमी? हे दिवश कशला हाय. हामाला ह्येच्यापरास बी कमी पगार घेऊन माणसा मिलते. तुमी आपला माणुस म्हणून शेन् हामी तुमाला एवडा देतें. पैशा काय झाडाला लागती काय?'

मारुतीला त्याची मनस्वी चीड यायची पण काय करील बिचारा? गप्प बसायचा झालं! आतांशा मात्र–' या लोकांची ही वृत्ति–वागणूक नाहींशी होईल–निदान बरीचशी कमी होईल, असं कांहीं तरी करावं'–असं सारखं त्याच्या मनांत येत होतं. हमाल नी गाडीवानांनीं आपली हमाली नी भाडं वाढवावं म्हणून मागणी केली असून ती मान्य झाली नाहीं तर ते संप पुकारणार आहेत, ही बातमी मारुतीला समजली होती. ती ऐकून त्याला केवढा आनंद झाला होता. त्यानंतर ती प्रचंड मिरवणूक पाहून नी त्या आरोळ्या ऐकून तर हर्षातिशयानं त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले, त्याचं हृदय भरून आलं. ' बरं झालं. असंच कांहींतरी केल्याशिवाय ही जात वठणीवर यायची नाहीं.'—असं तो मनांत म्हणाला अन् त्या मिरवणुकींत सामील होऊन आपणहि–' गरिबांचा न्याय करा!–आमची मजुरी वाढवा.' असं मोठमोठ्यानं ओरडावं—असं त्याला वाटलं.

—जेवायला जातों म्हणून सांगून मारुती त्या दिवशीं लवकरच बाहेर पडला. तो घराकडं गेला नाहीं. त्या हमाल–गाडीवानांच्या वस्ती-कडं गेला. मिरवणूक तिथं येऊन नुकतीच थांबली होती. अन् बशिता त्या

लोकांना सांगत होती,— ' आज आतां आपण संप पुकारला आहे. आपल्या मागण्या मान्य होईतोंपर्यंत आपण तो टिकवला पाहिजे. व्यापारी लोक आपल्या पैकीं कांहीं जणांना जास्त भाडं नी हमाली द्यायला तयार होऊन आपल्यांत फूट पाडण्याचा प्रयत्न करतील. पण कुणीहि या मोहाला बळी पडतां कामा नये. त्यामुळं आज जरी कांहीं जणांचा फायदा झाला तरी शेवटीं सगळ्यांचाच घात होईल. संप जास्त दिवस टिकवावा लागला तरी आपण तो टिकवला पाहिजे. आपलाच शेवटीं विजय होईल. मघाशी सभेला अगर मिरवणुकीला जे हजर नव्हत त्या प्रत्येक हमाल—गाडीवानांच्या घरीं जाऊन त्यांची नीट समजूत घालून आपण त्यांना आपल्या संपांत सामील करून घेतलें पाहिजे. त्या उद्योगाला आतां आपण लागूं या. तुम्ही अगोदर सगळेजण आपआपलीं जेवणं—खाणं उरकून या. म्हणजे मग पुढं काय करायचं तें ठरवून तसं करायला लागूं या. मी यशवंताच्या घरीं आहे. '—

मारुती तें ऐकत उभा होता. तिचं तें बोलणं थांबतांच तो तिच्या जवळ गेला आणि तिला म्हणाला.

" आमच्या झुंबरलाल शेटजीच्या माडीवर मगा तुमची मिरवणूक चालली व्हती तवा, येपारी लोक जमूनशान, त्येंची खलबतं चाललीं हुतीं. संप करणाराची चांगलीं खोड मोडली पायजे, असं समदीच म्हणत हुती. दुप्पट खरीच झाला तरी हरकत नाहीं, पण ह्यासनी एक पै वाडाव द्यायची न्हाइ. माल व्हाआयपाय भाड्याच्या मोटारीं आणूंया आन् हमाली करायपाय बी आसपासच्या खेड्यापाड्यांतनं माणसं बगूंया, असं त्येंचं बोलणं चाललं हुतं. मी झुंबरलाल शेटजीच्या घरीं कामाला असतों. तें ऐकल्यापसनं तुमास्नी तें कवा एकदां सांगीन असं मला झालं हुतं. ह्या शेट-सावकार लोकास्नी मनंच नसत्यात. त्यासनीं काडीइतकी बी दया-वाटत न्हाय आमच्याइशयीं. मरमरस्तोर आमी कष्ट करतु तरीबी आमचं प्वाट भरत न्हाय. आन् ह्येंची मातर लोडाला टेकूनशान पोटं सुटत्यात. आपण आम्हा गोरगरीब लोकापाय हीं असलीं काम करताय. मायबाप आहा आपण आमचं. काय बी झालं तरी संप मोडूं देऊं नका. अन्

त्या येपाऱ्यांची चांगलीं खोड मोडल असं करा. हे लोक मन्जी आमच्या जीवाला लागलेल्या जळवा हायत्या बगा. ह्या झुंबरलाल शेटजीच्या धरीं मी कामाला लागलों तवा पैलवानासारकी तब्येत होती माझी. नऊ दहा वर्षांत कामाच्या चरकाला लावूनशान् हें असं चिपाडासारकं केलंय बघा मला त्यानं. ”

बरेच हमाल गाडीवान त्याच्याभोंवतीं जमून त्याचं तें बोलणं लक्ष देऊन ऐकत होते.

त्यांच्यापैकीं एक हमाल म्हणाला,—

‘—पण त्यांनीं भाड्याच्या मोटारी अन् खेड्यापाड्यांतनं हमाली करायपाय माणसं आणली तर मग मातर फिसकटल समदंच. वाड न्हायली बाजूला, मिळतंय तें मिळायची बी पंचाईत पडल मग!’

‘खरंच असं काय झालं तर मातर कटीण जाईल.’

—दुसऱ्या एकानं त्याला दुजोरा दिला.

‘मी म्हणतों, आकाशदादास्नीं हें आपण जाऊनशान् कळवावं म्हणजी ते कायतरी इगत काडतील ह्येच्यावर.’

—तो पहिला हमाल म्हणाला.

त्यावर वनिता म्हणाली,–‘तुम्ही मुळींच काळजी करूं नका कसली. भाड्याच्या मोटारी त्यांना परवडणार नाहींत. त्या तशा परवडल्या असत्या तर यापूर्वींच त्यांनीं आपल्या मालाची वाहतूक मोटारींतून सुरू केली असती. अन् हमाली करण्याकरतां माणसंहि मिळायचीं नाहींत त्यांना आणि मिळाली तरी तीं नवीन असल्यामुळं त्यांच्या उपयोगी पडा-यचीं नाहींत. तुमच्यासारखं नी तुमच्याइतकं काम त्यांच्या हातून मुळींच व्हायचं नाहीं.–अन् तुमच्या मागणीपेक्षांहि त्यांना हमालीकरतां जास्त खर्च करावा लागेल. ते आपला तोटा करून घेणार नाहींत. त्यांच्यांतच मग फूट पडेल अन् त्यांना आपल्या मागण्या मान्य कराव्या लागतील. आकाशना हें कांहीं कळवायचं कारण नाहीं. त्यांच्या आई अत्यवस्थ आहेत. अशा वेळीं त्यांना ही आणि काळजी वाटायला नको. आपण त्यांना हा संप यशस्वी करून दाखवूंया!”

—पण त्या हमालाला तें कांहीं पटलं नाहीं—आपण आपलं सकाळीं आणि काय काय होतंय तें पाहून, आकाशकडं जाऊन त्यांना ती सगळी हकीगत गुपचुप कळवावी—असं त्यानं मनाशीं ठरवलं.

नंतर वनिता मारुतीला उद्देशून म्हणाली,—

" तुम्ही इथं येऊन आम्हाला ही बातमी दिलीत त्याबद्दल आम्ही तुमचे आभारी आहोत. "

" मोटारी आणूं देत न्हायतर मोटारीचे बा आणूं देत, कसं वाड-वत न्हाईत बगूंया भाडं. अन् कोण कसा आमचा संप मोडतोय तेबी मला बगायचंय. आकाशदादास्नी कुणी कळवूं नका र कांई एवढ्यांत. ताई सांगत्यात तसं उग गुमान ऐका. अन् चला जेवणखाण करूनशान् या आपआपलं बिगीबिगी. "

—एक गाडीवान मध्येंच उसळून म्हणाला.

" बराय, मग मी जातों आन् ततं आणकी काय झालं तर कळि-वतों आपणास्नी येऊनशान्"-असं वनितेला सांगून मारुती निघून गेला.

अन् थोड्याच वेळांत मग ते बाकीचे सगळे लोकहि आपआपल्या घराकडं निघून गेले.

वनिता यशवंताबरोबर त्याच्या घरीं गेली. यशवंताची बायको भाकरी करीत होती. तिला तो म्हणाला,—

" अग, हे बगितलंस का कोण आलंय तें ? "

" कोण आलंया ? "

—आपल्या कपाळावरील घाम डाव्या दंडानें चटकन् पुसून मांडीवर फाटकेलं लुगडं गडबडीनं सावरीत यशवंताच्या बायकोनं-मंजुळेनं विचारलं.

इतक्यांत वनिताच तिच्या समोर जाऊन उभी राहिली. तिला पाहून ती लाजून गोंधळली. यशवंतानं वनिता कोण, नी ती कशाकरतां तिथं आली आहे तें तिला सांगितलं. तें ऐकून वनितेविषयीं तिला एकदम विलक्षण आदर नी जिव्हाळा वाटला. जवळच्याच एका पातेल्यांत हात

धुऊन घाईघाईनं आपल्या खालची फळी उचलून तिला ती बसायला देत ती म्हणाली,—

" बसा कीं ह्याच्यावर. "

त्यावर वनिता म्हणाली,—

" आता बसत नाहीं मी. मला पाणी हवंय थोडं हातपाय धुवायला. या घागरींतलं घेऊ कां ? "

मंजुळेनं तिला पाणी दिलं.

हातपाय धुतल्यावर वनितेनं त्या घरभर सगळीकडं एकदां दृष्टी टाकली.

—घर कसलं,—एक खोपट असल्यासारखं होतं तें. तीन चार खणाची जागा होती ती सगळी. एका कोपऱ्यांत एक जातं रोवलेलं होतं. दुसऱ्या एका कोपऱ्यांत उखळ होतं. दोन लहान मुलं तिथं जमिनीवरच झोपलीं होतीं. त्यांना एक दंड घातलेलं फाटकं लुगडं पांघरायला घातलेलं होतं. घराला कुठं खिडकी की एक झरोका नव्हता. फक्त एक लहानसं दार होतं. तेंहि इतकं गिड्डं होतं कीं त्यांतून आतबाहेर येतांजातांना बरंच वाकावं लागे. समोरच्या एका खुंटीला—कासरा, खिळासापत्या, आसूड नी वंगणचा नळा— हे बैलगाडीकरतां लागणारं साहित्य अडकवलेलं होतं. दाराच्या दुसऱ्या बाजूला स्वैपाकाकरितां चूल होती. तिथल्या एका कोपऱ्यांत दोनतीन गाडग्यांच्या उतरंडी होत्या. त्याच्या अलिकडं पाण्याची एक खापराची घागर होती. तिला तीनचार ठिकाणीं कापडाचे बोळे बसवलेले होते. घरांत मोरी कुठंच नव्हती. चुलीजवळ एक देवद्वारी—पेटी होती. तिच्याजवळ कांहीं भांडीं पालथी घातलेलीं होतीं. चुलीला लागून असलेल्या भिंतीच्या एका लहानशा कोनाड्यांत एक पणती मिणमिणत होती. अन् दारासमोरच्या एका कोनाड्यांत एक कंदील लावून ठेवलेला होता. त्याची ज्योत काजळली होती, अन् कांच काळी झाली होती. चुलीजवळ दोन भाकरी भाजून टाकलेल्या होत्या. काथवटींत एका भाकरीचं पीठ मळलेलं होतं अन् एका भाकरीचं तसंच शिल्लक होतं. आणखी एका खुंटीवर कपड्यांच्या कांहीं घड्या टाक-

लल्या होत्या. एका दोरीवर एक लुगडं अन् एक धोतर वाळत टाक-लल होतं. त्या दोहोनांहि दंड घातलेले होते. अन् तीं जागोजाग फाट-लेलीं होतीं.

—तें सगळं पाहून दिवसांतून आठ–दहा तास राबणाऱ्या श्रम-जीवी लोकांना अशा ठिकाणीं हें असलं आयुष्य कंठावं लागावं, याचा तिला खेद वाटला.

ती मंजुळेला म्हणाली,—

" कसं राहातां इथं हो ! "

" मग काय करायचं !—मोटीं घरं–बंगलं आमास्नी कुटनं मिळ-त्याल. तें मिळाय गोरगरिबास्नी लुबाडाय येवं लागतं. आमी काय नुसत्या कष्टांचं धनी. "

—मांडीवरचं फाटकं लुगडं आवरून धरत मंजुळा म्हणाली.

" मला आता भूक लागली आहे. मी करतें त्या दोन भाकरी उर-लेल्या म्हणजे लवकर उरकेल. तुम्ही तवर दुसरी व्यवस्था पाहा. "

—चुलीकडं वळत वनिता म्हणाली.

' आपण नगा करूं कांहीं. मी आत्ता करतें. हातं बसा या फळीवर तवर. '—मंजुळा म्हणाली.

पण वनितेनं तिचं ऐकलं नाहीं. तिनं चुलीजवळ बसून पीठ मळा-यला सुरवात केली. मंजुळेनं तिथं जाऊन तिचा हात धरला.

" सोडाना हात. मला करता येतात कां पाहूंया तरी. "

—वनिता आपला हात तिच्या हातांतून सोडवून घेत म्हणाली.

यशवंता वनितेला जेवायला काय घालावं यासंबंधीं विचार करत दाराजवळ उभा होता. त्याचं तिकडं लक्ष गेल्यावर तो जरा पुढं होऊन म्हणाला,—" आपण कशाला करतां, ती करल की. धा मैल सायकल-वरनं आलात.— मिरवणुकीबरोबर हिंडावं लागलंय तीन–चार मैल... मस्त दगदग झालीया. जरा निवांत बसून इसावा घ्या. तवर हुतय तिचं. "

" तें कांही ऐकणार नाहीं मी तुमचं कुणाचं. या उरलेल्या भाकरी भातां मीच करणार. मला दगदग झाली अन् तुम्हाला झाली नाहीं ? या काम करून आल्या असतील दिवसभर कुणाचं कुठं तरी, अन् तुम्हीही सभेला–मिरवणुकीला होताच कीं.—वनिता म्हणाली.

" आम्हाला दगदग झाली असली तरी तिचं काय आमाला वाटत न्हाइ एवडं. पांचवीलाच पुजलीया आमच्या ती. सव हाय आम्हाला तिची. "—यशवंता म्हणाला.

" तुम्हाला सवय आहे, तशी ती आम्हाला असूं नये वाटतं. "

" आपणांसारख्या शिकल्यासवरलेल्या थोरामोठ्यांच्या माणसाञ्ली कशाला होवी दगदग ही ! "

" ही एक तुमची अज्ञानमूलक वेडेपणाची विचारसरणी तुमच्या हिताच्या आड येते नेहमीं. केवळ जन्मामुळं अगर कसल्याहि प्रकारचे कष्ट न करतां कोणालाहि मिळणारा मोठेपणा हा खरा मोठेपणा नसतो; आणि कोणी कितीहि शिकला सवरलेला असला तरी त्याला श्रम न करतां जगायचा हक्क नाहीं.–ही तुम्ही जाणीव ठेविली पाहिजे. ती सर्वांना झाली पाहिजे. करून द्यायला हवी. एकदां तीव्रतेनें ही जाणीव झाली, कीं तुम्हाला तुमच्या हक्काची जाणीव होत जाईल नी त्यामुळं अन्यायाचा प्रतिकार करण्याची प्रभावी शक्ति तुमच्या अंगीं निर्माण होऊं लागेल. " —वनिता भाकरी थापटत म्हणाली.

ती आपलं ऐकत नाहीं, असं पाहून मंजुळेनं तिच्याजवळ बसून तिला मग मदत करायला सुरवात केली. तिनं थोड्या काटक्या मोडल्या. जाळ आंत सारला अन् फुंकून तो पेटवला. वनितेनं थापटलेली भाकरी तव्यावर टाकली अन् मग जवळच्या एका मडक्यांतलं पाणी काथवटींतल्या त्या उरलेल्या पिठांत ओतून ती ते मळूं लागली.

' आपण आतां काय जेवणार ? '

—यशवंतानं तिला विचारलं,

' तुम्ही जेवाल तें. '

' आम्ही काय चटणीभाकर खातों.'

‘ मग मलाहि चालेल कीं तेंच. ’

‘ तसं कुठं झालंय काय. दूध आणतो मी एक चिपटंभर. ’

‘ माझ्याकरितां म्हणून अधिक कांहीं करायला नको. ’

—यशवंतानं तें कांहीं ऐकलं नाहीं, भांडं घेऊन तो दूध आणावयाला गेला.

“ पाणी फिरवाय होवं भाकरीवर कां मी फिरवूं? ”—मंजुळा वनितेला म्हणाली.

त्यावर—‘ मी फिरवतेना ’ असं म्हणून उजव्या हातांत पाणी घेऊन तिनं तें त्या तव्यावरच्या भाकरीवर सोडलं नी मग हातांतली बांगडी मागं सारून ती तें फिरवूं लागली. तवा बराच खोलगट होता. त्यामुळं पाणी फिरवतांना त्याची कड तिच्या मनगटाला पोळली. ‘ सू ऽ ऽ ऽ – ’ करत तिनं हात मागं घेतला. चांगली इंच, दीड इंच लांबीची काळी जाड रेषा तिच्या मनगटावर उमटली.

‘ चु–चु–चु त्. बगा मी म्हणलं मी करतें, तर ऐकलं नाहीं तुम्ही. पोळवून घेतलंत कां नाहीं? बगूं किती पोळलंय् तें! ’

—असं म्हणत मंजुळेनं तिचा हात आपल्या हातांत घेऊन पाहिला अन् मग ती म्हणली,—‘ सरका आता ततनं. ’

त्यावर—‘ काय होतं पोळलं म्हणून. एवढी एक भाकरी तरी पुरी करणारच! ’–असं म्हणून वनितेनं ती उलथून टाकण्याकरतां उलथण्यानं सरकावून घेतली. ती चांगली भाजली गेली नव्हती. त्यामुळं ती उलथून टाकतांना तिचे तीनचार तुकडे झाले. ती खिन्न झाली. काटक्या ओल्या होत्या. त्यामुळं जाळ नीट लागत नव्हता. थोडं चिडून खाली वाकून तिनं चुलींत फुंकायला सुरवात केली. चुलींतून नुसता धुराचा लोटच्या लोट निघत होता. सगळं घर धुरानं भरलं. तिचे डोळेहि भरले धुरानं. ‘ आपल्याला कांहीं जमत नाहीं बाई. ’—असं म्हणत पातळाच्या पदरानं डोळे चोळत वनिता तेथून उठली.

‘ मी तर म्हणत होतें, मी करतें—म्हणून ’

—मंजुळा म्हणाली. अन् ती मग भाकरी करायला बसली.

थोड्याच वेळांत मंजुळेच्या भाकरी झाल्या. यशवंता दूध घेऊन आला. इतक्यांत त्याचा थोरला मुलगा झोपेंतून जागा होऊन डोळे चोळत उठून बसला. त्याला बरोबर घेऊन ते जेवायला बसले. ‘ तुमचं जेवण अगुदर उरकूनशान् घ्या मग मागनं आमी जेवतों ’ असं यशवंता वनितेला म्हणाला होता, पण—‘ माझ्याबरोबरच तुम्ही बसलं पाहिजे ’ असा तिनं आग्रह केल्यामुळं त्याला तिच्याबरोबर बसावं लागलं.

घरांत सगळ्या दोनच थाळ्या होत्या. त्यांतील एक यशवंतानं घेतली. तींतच त्यानं आपल्या मुलाला घेतलं. दुसरी त्यानं वनितेपुढं ठेवली. तांब्या तर एकच होता. तो त्यानं वनितेला भरून दिला. मंजुळेनं त्यांना वाढलं. दुपारची दोडक्याची भाजी थोडी उरली होती. ती तिनं एका वाटींत घालून वनितेपुढं ठेवली. तें पाहून तो मुलगा कुरकुरत म्हणाला,—‘ आई ऽ, मला कोरड्यास. ’

मंजुळा त्याच्यावर खेकसून त्याला रागानं म्हणाली,–‘ तुला मला मला करायची लई खोड हाय बग. ’ यशवंतानंहि वनितेची दृष्टी चुकवून त्याच्याकडं डोळे वटारून पाहिलं.

—वनितेनं त्यांतली निम्मी भाजी यशवंताला घ्यायला सांगितली. यशवंता ‘–नको, आपल्याला असूं द्या ’–असं म्हणाला. पण मग वनितेनंच ती त्याच्या थाळींत घातली. मंजुळा—‘ दूध घ्या कीं ’—म्हणून वरचेवर तिला आग्रह करत होती अन् तो मुलगा सारखं म्हणत होता,

—‘ आई ऽ मला दूध. ’

मंजुळेला त्याची चीड यायची. ती दूध न घालतां दुधाचं भांडं नुसतंच त्याच्या थाळींत वाकवल्यासारखं करून रागानं म्हणायची—‘ हं हें घे. ’

यशवंताहि वनितेची दृष्टी चुकवून मधून मधून त्याला डिवचून त्याच्याकडं— डोळे वटारून रागानं पाहात होता.

जेवण उरकल्यावर यशवंतानें एक पालपट्टी घेऊन बाहेर अंगणांत नेऊन अंथरली. वनिता त्याच्यावर जाऊन बसली. यशवंताहि तिथं बाजूला एका कोपऱ्यावर बसला.

साडेआठ–नऊची वेळ होती. चांदणं टिप्पूर पडलं होतं. अंगणांतल्या छपरांतील बैलांच्या गळ्यांतील घुंगुरांचा खुन्–खुन्–असा कर्णमधुर आवाज वरचेवर ऐकायला येत होता. अन् वायूंच्या मंद नी आल्हादकारक शीतल लहरी मधून मधून वाहात होत्या. सर्वत्र शांततेचं वातावरण पसरत चाललं होतं.—दूरवरच्या एका पिठाच्या गिरणीचा–'कुक्–कुक्–कुक ' असा होणारा आवाज नी मध्येंच एखाद्या कुत्र्याचं भुंकणं—या मुळंच काय तो त्या शांततेचा क्वचित् भंग झाल्यासारखा वाटत होता.

नंतर थोड्याच वेळांत इतर बरेच हमाल नी गाडीवान तिथं गोळा झाले. त्यांना बरोबर घेऊन मग सभेला जे हमाल नी गाडीवान हजर नव्हते त्यांच्या घरोघर जाऊन वनितेनं प्रचार केला अन् त्यांना संपांत सामील करून घेतलं. रात्रीं साडे अकरापर्यंत त्यांचं तें काम चाललं होतं. बहुतेक सर्वांनीं संपांत सामील व्हायचं आश्वासन दिलं. वनिता यशवंताच्या घरीं परत आली तेव्हां तर ऐन मध्यरात्र झाली होती. मंजुळेजवळ ती झोपली. झोपण्यापूर्वी तिच्या मनांत विचार घोळत होते,—

'आकाशच्या आईचं कसं असेल? अन् आपल्या वडिलांनीं आपली कांहीं कारणाकरितां आपल्या मैत्रिणीच्या विमलच्या घरीं चौकशी केली, अन् तिथं कुठं आपण नाहीं, असं त्यांना समजून आलं तर ते उगीच काळजी करायला लागतील. करूं देत. आणि आपण इथं आलों आहोंत नी हें कार्य करतों आहोत, हेंहि त्यांना समजलं तरी हरकत नाहीं. त्यांच्याकरतां मी माझीं मतं काय म्हणून बदलावींत? —माझ्या बुद्धीला पटून जें कार्य करणं मला माझं योग्य कर्तव्य वाटतं तें मी कां करूं नये? त्यांना माझ्याविषयीं जसं वाटतं तसंच मला या लोकाविषयीं वाटतं.—तें कांहीं नाहीं. अशाच तऱ्हेच्या कार्याला आता आपण सर्वस्वी वाहून घ्यायचं. घरचं कसं होईल, वडिलांना काय वाटेल, भाऊ काय म्हणेल, असा विचार आघाडीवरच्या आम्ही तरूण पिढीनं करणं मूर्खपणाचं ठरेल. शेतकरी–मजूर–कामगार–या गोरगरिबांच्या—बहुजन समाजाच्या जास्तीत जास्त हिताकरतां आम्ही निःस्वार्थी–बुद्धीनं सतत झटलं पाहिजे, झगडलं पाहिजे.'

अन् तिला मग एकदम विरागची आठवण होऊन वाटलं,—'विराग जर आपल्या या चळवळींत पडला तर आकाशपेक्षांहि प्रभावी कार्य त्याच्याहातून होईल. आकाशासारखा तो भावनावश होत नाहीं. तो फार विचारी आहे. आघाडीवरील सेनानींच्या अंगी हवा असणारा भावना आणि बुद्धि यांचा उत्कट समन्वय त्याच्या ठिकाणीं दिसून येतो.—पण तो चळवळींतच पडत नाहीं. कां कळत नाहीं.'

❦ ❦ ❦

दुसरे दिवशीं सकाळीं नऊ वाजतां पुन्हां झुंबरलाल शेटजींच्या माडीवर ते सगळे व्यापारी लोक जमले अन् त्यांचीं खलबतं सुरू झालीं,—

"शाला नव वाजून गेला तरी बी एक हामाल कां गाडिवान आला न्हाय. काई लोकास्नी हामी तुमास्नी जादा भाडा देल, असा म्हणून बी बगितला, पण तरी बी शाला कोण तय्यार होत न्हाय. ते आकाश हातं नाय तरी बी एवडा एकी व्हायलाय. ते असता तर मग हामास्नी त्येंच्या म्हणण्यापरमाण पैसा देऊनशान् बी माणश मिळा नसता. हे केशवरावचा पोरगी बी बराच कारस्थानी दिसतंय कीं शाला! सकाळपारी उठूनशेन् समदा हमाल गाडीवानच्या घरीं जाऊनशान् सांगून व्हायलंयँ कोण बी कामाला जाउं नगा—म्हणून. आता हेला इलाज काय करावी? मोटारीचा बी चवकशी केला पण त्येच्या मालक बी शाला चढून बसलाय. पेट्रोल म्हागलाय म्हणतंय. अन् ते मागल ते देऊनशान् हामाला काय फायदा न्हाय मंग."

—झुंबरलाल त्रासिकपणें म्हणाले.

"फायदा तोटा बघत बसायची ही वेळ नव्हे. या लोकांची चांगली खोड कशी मोडतां येईल हेंच आपण पाहिलं पाहिजे. आज पैसे थोडे जास्त खर्चावे लागले तरी हरकत नाहीं. मालाची वाहतूक आपण भाड्याच्या मोटारी ठरवूनच करूं या."

—जरीच्या काठ्याचा रुमाल बांधलेले एकाक्ष आपल्या बोटांतली आंगठी फिरवत म्हणाले.

" अरी पण त्येच्यामंदी आपला फायदा काय हाय ? बेपारीनें फायदा फावे आपली. आज जेवडा मिळेल तेवडा सई. उंद्याचा कोणी पायला."

—झुंबरलाल म्हणाले.

" मग करा त्यांच्या मागण्या मान्य. अन् चढवून ठेवा त्यांना डोक्यावर. आज दीडपट मागताहेत उद्यां दुप्पट मागतील."

—ते एकाक्ष म्हणाले.

" छट् छट. तसले कांहीं लाड चालूं द्यायचे नाहींत मुळींच त्यांचे. काय पडेल तें भाडे देऊन मोटारी ठरवायच्या !"

—एक बसक्या नाकाचे गृहस्थ म्हणाले.

" पण इतक्या मोटारी मिळायच्या कशा एकदम ?"

—आणखी एकानं शंका काढली.

" इथं किती मिळण्यासारख्या आहेत तें पाहूया. चंदापूरला कांहीं मिळतील."

—एकाक्ष म्हणाले.

" पण हमाली कुणी करायची मग ?"

—लठ्ठ शेटजीनीं विचारलं.

" हमालीकरतां आसपासच्या खेड्यापाड्यांतून लोक पाठवून माणसं मिळवण्याचा प्रयत्न करूं या. वाटेल तितकी मिळतील. अन न्हाईंच मिळाली तर त्यांची मागणी तेवढी मान्य करूंया म्हणजे झालं."

—ते बसक्या नाकाचे गृहस्थ म्हणाले.

" मागणी कुणाचीच मान्य करायची नाहीं. काय वाटेल ती सोय करूंया दुसरी."

—एकाक्ष म्हणाले.

" होय पण, दुसरी सोय करायची म्हणजे काय करायचं ?"

त्या शंकेखोरानीं विचारलं.—

"—अहो, मालाच्या गाड्याबरोबर जे गाडीवान परगांवचे येतात त्यानांच विचारून पहायचं. तें काय होईल हो कसंहि. मोटारींचं अगोदर

काय तें ठरवा आणि सगळं एकदां निश्चित करा. नाहींतर आमचं एक तुमचं एक असे आपआपल्यांतच जर तट पडले तर ते आपल्यावर मात केल्याशिवाय राहाणार नाहींत. तेव्हां तसं कांहीं करूं नका. काय झुंबरलाल, तुम्हाला काय वाटतं ?–तुमचं काय तें एकदां आम्हाला नक्की सांगा.—"

—एकाक्ष तपकिरीची चिमट नाकाला लावीत म्हणाले,—

" अमाला तर हें काय पसंत न्हाय. हें समदा एवडा बेपार–उलाडाल करायची कशासाटीं. फायद्यापाय. मंग आज आपला फायदा हुईल तेवडा आपण करून घेतली पायजे. भाव तेजी हाय. माल बी खूप येऊन -हायलंय. फायदा मिलायचा दिवश हाय. मोटारीमंदी फाजील खरीच हुईल. तवा हामी म्हणतें तुरूत त्येंची मागणी कबूल करून टाकावा ! "

—झुंबरलाल उत्तरले.

अन् त्यांच्यांत मग मतभेद निर्माण झाले. तूर्त त्यांच्या मागण्या मान्य कराव्यात, असं झुंबरलालच्या पक्षाचं मत पडलं. एकाक्षांच्या पक्षाला तें मान्य नव्हतं.

शेवटीं ते बसक्या नाकाचे गृहस्थ म्हणाले, ' असं भांडत बसण्यांत अर्थ नाहीं. सगळ्यांच्याच सल्ल्यानं कांहींतरी एक निश्चित मार्ग ठरवायला हवा. मला वाटतं,—इतक्या घाईनं त्यांच्या मागण्या मान्य करणं कधींच शहाणपणाचं ठरणार नाहीं. आणि थोडे दिवस तरी वाट पाहावी. तवर आपला धंदा चालू ठेवावाच.—हमालीकरतां इथंच अगर इतरत्र लोक मिळाल्यास पाहावेत. इथल्या मोटारचे मालक जास्त भाडं सांगत असतील—तर दुसरीकडं प्रयत्न करून बघावा. अन् त्याचबरोबर संप टिकणार नाहीं असे प्रयत्नहि चालू ठेवावेत. त्या आकाशची आई फार आजारी आहे; तूर्त कांहीं त्याला यायला सवड व्हायची नाहीं. केशवरावना सांगून त्यांच्या मुलीला तेवढं येथून तातडतोब न्यायला लावावं. केशवराव माझ्या चांगल्या ओळखीचे आहेत. झुंबरलालांच्याहि ते चांगले परिचयाचे आहेत. कुणीतरी त्यांच्याकडं जाऊन त्यांना ही

सगळी हकिगत सांगून ते आपल्या मुलीला चांगली समज देऊन येथून लागलीच घेऊन जातील, असं त्यांना भरवावं. ती मुलगी इथून आजच्या आज गेली कीं मग कांहीं हा संप टिकणार नाहीं. अन् एकदां तो मोडला कीं त्यांच्यापैकीं कांहींजणांना हाताशीं धरून तो पुन्हां जुळून येणार नाहीं, अशी आपण दक्षता घेऊं.'

सगळ्यांनींच तें मान्य केलं. झुंबरलाल प्रथम थोडे कुरकुरले पण शेवटीं त्यांनींहि आपली संमति दिली. केशवरावांच्याकडं त्यांनाच पाठवायचं ठरलं. तें त्यानीं कबूल केलं. अन् ते मग गेलेहि.

एका लहान मुलाला कडेवर घेऊन त्याला खेळवण्याच्या निमित्तानं गच्चीवरून इकडून तिकडं हिंडत मारुतीनं त्यांची ती चर्चा मुद्दाम ऐकली होती. ते व्यापारी तेथून निघून गेल्यावर जेवायला जातों असं सांगून तो त्या हमाल—गाडीवानांच्या वस्तींत— गेला; नी ती सगळी हकिगत त्यानं वनितेला नी त्यांना सांगितली. ती ऐकून कांहींजण बुचकळ्यांत पडले. आपल्या वडिलांना हें समजलं अन् ते जर आले तर सगळंच चमत्कारिक होईल, अशी वनितेच्या मनांतहि भीति उत्पन्न झाली. ती तिनं आपल्या चर्येवर मात्र व्यक्त होऊं दिली नाहीं. ती त्यांना धीर देत होती, तुम्ही कसलीच काळजी करूं नका अन् आकाशनाहि इतक्यांत कांहीं कळवायचं कारण नाहीं. आकाशला तें कळवावं असं आदले दिवशीं म्हणालेल्या त्या हमालाला मात्र तें पटलं नाहीं. त्यानं लागलीच आकाशकडं जाऊन त्याला ती बातमी द्यायचं ठरवलं. कोणालाहि तें कळूं न देतां तो आकाशकडं चंदापूरला निघून गेला.

व्यापारी पेठेंत मालाचे ढीगाच्या ढीग पडले होते. बैलगाडीच्या तळावर आदले दिवशीं आसपासच्या खेड्यांतून आलेल्या मालानं भरलेल्या बैलगाड्या अद्याप तशाच सुटलेल्या होत्या नी आणखी नवीन गाड्या यायला सुरवात झाली होती. व्यापारी अधाशी दृष्टीनं त्या मालाकडं पाहात मनांत हळहळत होते. त्या पेठेंत दररोज काम करणाऱ्या हमाल-गाडीवानांपैकीं एकजणहि कोणी तिथं दिसत नव्हता. त्यामुळं त्या

पेठेला प्रेतकळा आल्यासारखी दिसत होती. तिचं सारं वैभव लोप पावलं होतं.

अकरा वाजून गेल्यानंतर कांहीं व्यापाऱ्यांनीं थोडीशी जुळवा-जुळव करून माल खरेदी करायला सुरवात केली. संपवाल्यांना भीति घालण्याकरतां मालाच्या वहातुकीसाठीं त्यांनीं मुद्दाम भाड्याच्या दोन-तीन मोटारी ठरवून आणल्या नी हमालांचीं कामं करण्याकरतां घरचे गडी नी परगांवच्या आलेल्या त्या गाडीवानांपैकीं कांहींजण मिळवून कसें तरी काम सुरू केलें. हमाली करण्याकरतां आसपासच्या खेड्यांतून आणखी माणसं मिळवण्यासाठीं त्यांनीं आपले लोकहि पाठविले.

ही बातमी संपवाल्या लोकांना लागतांच त्यांच्या तोंडचें पाणी पळालें. असंच काम चालू झालं तर मिळत होते तेहि पैसे आपल्याला मिळेनासे होतील अशी बऱ्याच जणांना भीति वाटूं लागली. अन् 'आकाश दादा आल्याशिवाय याला आतां तोड निघायची नाहीं.'—असं ते म्हणूं लागले. वनिता त्यांना धीर देत होती. मात्र तिचा धीर सुटत चालला होता. पुढं काय करावं याविषयीं ते सर्वजण एकत्र जमून विचार करीत होते.

इतक्यांत आकाश तिथं आला. त्याला चंदापूरला ती बातमी कळवायला आलेला तो हमाल त्याच्याबरोबर होता. आकाशला पाहातांच त्या सगळ्यांना आनंदी आनंद झाला. ते मोठमोठ्यानं ओरडूं लागले,—
"आकाशदादा की जय!"

पण नंतर आकाशची आई वारली असल्याचं त्यांना समजल्यावर त्यांना तितकंच दुःखहि झालं. वनितेला तर एकदम गहिंवरून येऊन तिच्या डोळ्यांतून अश्रू ओघळूं लागले. आई तिला आपल्या मुलीसारखं मानत होत्या. अन् तिचंहि त्यांच्यावर निरतिशय प्रेम होतं.

आकाशला त्यांनीं ती सगळी हकिगत सांगितली.

ती ऐकून आकाश म्हणाला,—

'कांहीं हरकत नाहीं. आपल्याला कांहीं भीति बाळगायचं कारण नाहीं कसलंच. नवीन माणसं मिळालीं तरी त्यांचा त्यांना चांगला उप-

योग होणार नाहीं. नी ते खर्चाच्या दृष्टीनंहि त्यांना परवडणार नाहीं. भाड्याच्या मोटारीहि त्याना परवडणं शक्य नाहीं. शिवाय मोटारींच्या मालकांना भेटून आपण त्यांचीं मनं वळविण्याचा प्रयत्न करूं या. आणि इथं परगांवच्या येणाऱ्या गाडीवानांत नी आसपासच्या खेड्यापाड्यांत जाऊन आपण प्रचार करून त्यांचीहि सहानुभूति मिळवूं या. '

—आकाशची ती विचारसरणी सगळ्यांना पटली. आतां वाटेल तें झालं तरी आकाशदादांचा शब्द मोडायचा नाहीं, असा त्यानीं निश्चय केला.

त्यानंतर वनिता आकाशला म्हणाली,—

" माझ्याबरोबर यांच्यापैकीं थोडे लोक द्या; मी आसपासच्या खेड्यांतून जाऊन प्रचार करते. मला आतां इथं राहतां येणार नाहीं. कारण माझ्याविरुद्ध अण्णांना भरवून देऊन, ते मला येथन घेऊन जातील अशी व्यवस्था करण्याकरितां, व्यापऱ्यांपैकीं एक शिष्ट अण्णाकडं चंदापूरला रवाना झाले आहेत. अण्णांना हें समजलं तर लागलीच इकडं येतील. ते यायच्या अगोदर मी इथून निघून जाते. हा संप यशस्वी व्हावा अशी माझी इच्छा आहे. इथं येऊन त्यानीं माझी चौकशी केली तर मी इथं आलें नव्हतें नी नाहींहि असंच त्यांना सगळ्यांना सांगायला सांगा; हें प्रचारकार्य करण्याची संधि मिळाली तर मला आनंद होईल."

आकाशनं तिला आपली संमति देऊन तिचे आभार मानले. तिच्याबरोबर खेड्याला जायला बरेच लोक तयार झाले. त्यांच्यापैकीं—कांहीं जणांना बरोबर घेऊन वनितेनं सारंगपूर सोडलं.

त्यानंतर थोड्याच वेळांत केशवरावांची मोटार तिथं आली. तींत ते, प्रभाकर नी झुंबरलाल—होते. त्यांनीं तिथं वनितेची सगळीकडं चौकशी केली पण त्यांना प्रत्येक ठिकाणीं एकच उत्तर मिळालं,——

" त्या इथं नाहींत नी आल्याहि नव्हत्या. "

झुंबरलालांचा उत्साह मावळला. केशवराव त्यांच्यावर चिढून म्हणाले,——' तुम्ही कुणाचं तरी ऐकून कांहींतरी सांगत आलांत. कुणीतरी दुसरी तरुणी असेल ती. ती वनितेसारखी दिसली असेल कुणाला तरी.

त्याचं तुम्ही ऐकलंत अन् आलांत. चौकशी करायला हवी होती तुम्ही नीट. तुम्ही पाहिलं होतंत तिला ?—दुसरे पुष्कळ सांगतात. '—

झुंबरलालची फारच केविलवाणी स्थिति झाली. ते कांहींच बोलले नाहींत.

आकाश तिथं आला असल्याचं त्यांना समजल्यावर तर त्यांचा धीरच खचला.

त्यानंतर केशवरावना मात्र 'ही मग कुठं गेली असेल '—अशी विलक्षण काळजी लागून राहिली. अन् प्रभाकरच्या मनांतहि तोच विचार घोळत होता, —

'खरंच कुठं गेली असेल ही ?'

## प्रकरण ६ वें.

'—भीमरूपी महारुद्रा वज्र हनुमान मारुती—

वनारी अंजनीसूता रामदूता प्रभंजना—

—अग, शनिमहात्म कुठं पाहिलंस का ?'

—माधवरावांनीं आपल्या पत्नीना—शांताबाईंना मारुतीस्तोत्र म्हणतां म्हणतां मध्येंच विचारलं.

'मला नाहीं माहीत. आणि कशाला लागला आहांत आतां देव देव करायला आणि? देव काय करणार आहे आपल्या दैवापुढं? भोग भोगावे लागतात. अशानं ते चुकणार आहेत थोडेच!'

—चहाच्या आधणाचं पातेलं चुलीवरून खालीं उतरून त्याच्यावर झांकण ठेवीत शांताबाई स्वैपाकघरांतून म्हणाल्या.

'चुकणार नाहींत तर बसा भोगत. कशी वाटावी त्या देवाला तरी सहानुभूति तुमची? कुठलं दैव घेऊन बसली आहेस. देवाची कधीं आठवण होत होती का तुम्हाला?—त्याचीं हीं फळं आहेत बरं.'

'आहेत तर देवदेव करीत बसा रात्रंदिवस. कोण नको म्हणतंय तुम्हाला?—बघूंया कीं मग तरी कांहीं स्थिति सुधारते का आपली ती, कां ती आणि दिवसें दिवस अधिक खालावत जातीय् तें. देव काय आकाशां-तनं नोटा टाकायचा नाहीं. नशीब घड असावं लागतं.

‘ बरं असूं दे.--शनिमहात्म–तेवढं–बघून दे मला. एक प्रत होतीना आपल्याकडं ?—’

‘ मला ठाऊक नाहीं. परवा रद्दी घातली त्यांत गेली कीं काय कोणास ठाऊक ? ’

—चहा गाळत शांताबाई म्हणाल्या.

‘ म्हणजे ! —काय माणसं ग तुम्ही !— भोगा आतां दशा मग !— ही देवासंबंधीची कळकळ ! आज शनिमहात्म रद्दींत घातलंत, उद्यां देव मोडीला घाला म्हणजे चांगला खराटा फिरेल घरादारावरनं. इतके उन्मत्त होऊं नका. थोडे तरी डोळे उघडे ठेवत चला. पोथ्यापुराणं तुम्हाला रद्दीसारखी वाटतात, पोरांना देवाची पूजा करा म्हटलं, कीं ती कपाळाला आठ्या घालतात, देवाच्या नैवेद्याकरितां सोवळयानं स्वयंपाक कर म्हणून तुला सांगितलं, कीं तुला तें अवघड वाटायला लागतं,—चांगलं आहे, निस्तारा आतां.—आणि म्हणे दैव ? कधीं वेळच्यावेळीं देवाची पूजाअर्चा करतील कीं कधीं सोवळं ओवळं पाळतील — नांव नाहीं ! कुठला देव नी कुठलं काय—असली वृत्ति. पूर्वीची माणसं देवाला मानत होती म्हणून जगत होती चांगल्या तऱ्हेनं. आमच्या आजोबांच्या वेळीं त्यांच्याबरोबर दररोज पंक्तीला कमींत कमी वीस-पंचवीस बाहेरचीं इतर माणसं असायचीं, अन् तुम्हाला मात्र आणि थोड्याच दिवसांत अन्नाला महाग व्हावं लागेल. याचं कारण काय असावं असं तुम्हाला वाटतं ?–आमचे आजोबा नियमानं दोन दोन तास देवाच्या पूजेंत घालवायचे, आहे ठाऊक ? अन् तुमचं मात्र पित्त खवळतं देव म्हटलं कीं—’

—असं तणतणत माधवराव देवाच्या पुजेकरतां देवघराकडं वळले.

त्यांच्या त्या बोलण्याकडं शांताबाईंचं तितकसं लक्ष नव्हतं.

त्या मुलांच्या कपांत चहा ओतीत होत्या.

अन् मुलांत कुरबूर सुरू झाली होती,—

“ आई, विभवला कसा कप भरून दिलास ? ”

—मंदा कुरकुरत म्हणाली.

“ कसा दिलास म्हणजे ?—मी मोठा आहे–म्हणून ! ”

—तिला खिजवण्याकरतां विभव मुद्दाम म्हणाला.

सुहासनें—तर,—'आई, मला भरून' असं म्हणून पाय खोडून रडायला सुरवात केली.

'उगी मुकाट्यानं प्या. एवढा तरी मिळालाय आज नशीब समजा. उद्यांपासून तोहि मिळायचा नाहीं. '—शांताबाई उद्वेगानं म्हणाल्या.'

विभव नी मंदा यांनीं आपले कप उचलले.

सुहासची मात्र समजूत पटली नाहीं. तो जोरानें पाय खोडून मोठमोठ्यानें रडूं लागला. मध्येंच त्याचा पाय त्याच्या पुढच्या त्या कपाला लागला; त्यामुळं त्यांतला सगळा चहा सांडला. तें पाहून शांता-बाई चिडल्या. त्याला रागानं मारीत त्या म्हणाल्या,—

'माजलास?—मस्ती आली फार?—गप्प बसतोस कीं नाहीं? चीप्—तोंड मीट. मीट तोंड. करशील का हट्ट पुन्हां असा?'

'नाहींऽ–पुन्हां नाहीं मागणार.—नाहीं—मी मागत—'

—असं कळवळून म्हणत सुहास आणि मोठ्यानं रडूं लागला.

'हट्ट–हट्ट—सारखा प्रत्येक गोष्टीचा हट्ट करायचा. थोडा सुद्धां समजूतदारपणा नाहीं.–म्हणे कप भरून पाहिजे.–मस्त दहा कप दिला असता, पण नशिबं तरी कुठं तशी धड हाका मारतायत् कारट्यांनों तुमचीं?'—शांताबाई मारणं थांबवून तणतणल्या.

सुहास स्फुंदून डोळे चोळत तेथून उठून माजघरांत गेला.

मग मात्र शांताबाईना—त्याला आपण एवढ्याशा चहाकरतां इतकं मारायला नको होतं म्हणून वाईट वाटलं. त्यांनीं चहा घेतला नाहीं. आपल्या पुढची कपबशी उचलून घेऊन, सुहासची समजूत घालून त्याला तो चहा घ्यायला लावण्याकरितां त्या लागलीच त्याच्या पाठोपाठ माज-घरांत जात समजुतीच्या स्वरांत म्हणाल्या,—'हं हा घे. चहाकरतां रड-तात का कुठं भागूबाई. शहाणा आहे आमचा राजा. हट्ट करतोस अन मग मार खातोस. मंदालाहि तुझ्या इतकाच दिला होता कीं. तिनं घेतला कीं नाहीं मुकाट्यानं? हं. घे हा आतां. एवढं कसं कळत नाहीं

रे राजा तुला ? शहाणा ना तूं. घे आटप. सरला येईल आणि. आलीच वाटतं बघ.'—

—सरला आली नव्हती.

किराणा दुकानचे मालक—लेले आले होते. त्यांनीं आंत येऊन शांताबाईंना विचारलं, '—

' कां आहेत का माधवराव ? '

माधवराव स्तोत्र गुणगुणत होते—

'—आरक्त देखिले डोळा गिळिले सूर्यमंडळा.
वाढतां वाढतां वाढे भेदिले शून्यमंडळा
भूतप्रेत समधादि रोगव्याधि समस्तहि...... '

लेल्यांचा आवाज ऐकून ते थांबले. त्यानीं चुटकी वाजवून स्वैंपाकघरांतून विभवला बोलावून त्याला हळूच सांगितलं,—' ते लेले आले आहेत;—घरीं नाहींत—म्हणून सांग त्याना. '

पण इतक्यांत लेलेच तिथं आले, नी ' नमस्ते '—असं म्हणून माधवरावना नमस्कार करीत म्हणाले,—" काय पूजा चाललीय वाटतं ? "

" हो; या कीं. विभव, त्यांना पाट देरे बसायला."

" बसायला वेळ नाहीं आतां. नोकरी गेली म्हणे तुमची माधवराव ? "

" तसं अजून कांहीं निश्चित नाहीं. पाहूं या आतां काय होतं आहे तें. प्रयत्न चालले आहेत. "

" तें कां मी तर ऐकलं कीं, हुकूम सुद्धां झालाय एक तारखेपासून तुम्हाला कमी केलं आहे म्हणून. "

" असं कां ?—पण मला अजून कांहीं कळलेलं नाहीं. "

" बरं ते जाऊंदे. मी आलोंय माझ्या कामाकरतां. आमची बाकी एकदां देऊन टाका कीं. तीस पस्तीस रुपये झाले आहेत. आम्हाला तगादे लागले आहेत. सगळेच भागवून टाका आतां अन् वायदे सांगूं नका. दिपवाळी जवळ येत चालली आहे. माल वगैरे आम्हाला आणायाला पाहिजे. रोखीशिवाय आतां कोणी देत नाहीं माल. मग केव्हां भागवतां ? "

" पाहातों कीं चार आठ दिवसांत. अन् असं पैसे पैसे कां करायला लागलां आहांत. कधीं बुडवलेत का तुमचे पैसे आम्ही ? वेळप्रसंग बघायला नको. तुम्ही आत्ता द्या म्हणाल पण आणायचे कुठनं ?—द्यायला,–मिळायला नकोत ?—"

" मी आत्ताच द्या असं कुठं म्हणतोय तुम्हाला. चार आठ दिवसांनीं कां होईना पण एकदां सगळे देऊन टाका. "

" ते सगळं कळतं मला लेले, तुम्ही कशाला सांगायला पाहिजे. तुम्हाला आत्तांच एवढी पैशाची घाई कां झाली हो ? आज दहा वर्षं आमचं खातं आहे तुमच्याकडं. आजपर्यंत कधी आला नाहींत हो घराकडं ? आत्ताच कां यावंस वाटलं ?—आमची नोकरी गेली. आतां कुठले पैसे देणार आम्ही.— अशी तुम्हाला भीति, काळजी वाटूं लागली असेल म्हणूनच ना ? "

" तसं कांहीं नाहीं आं ! "

" नाहीं कसलं आलंय ! उगीच सोंग करूं नका. मागं एक एक वेळेला शंभर–शंभरपर्यंत बाक्या तटलेल्या होत्या,—तटत होत्या, तेव्हां कधीं आला नाहींत मागायला एकदांहि ? अन् काल तर कहर केलात कीं अगदीं ! "

" तो कसला बुवा ? "

" तांदूळ आणायला मुलाला पाठवून दिलं होतं, तर त्याला परत पाठवलंत तांदूळ संपलेत असं सांगून. तुम्हाला वाटलं असेल आतां यांना कुठले पैसे मिळणार, हे देणार कुठले, पण लेले, आजपर्यंत एक पै बुडविली नाहीं कुणाची आम्ही. आणि पुढंहि कुणाची बुडवणार नाहीं."

" अहो, पण मी म्हणतोय कुठं तसं. तुम्ही बुडवले नाहींत, बुडवणार नाहीं, हें सगळं खरं पण नडीला नकोत का द्यायला ? पूर्वी आम्हालाहि दोन दोन चार-चार हजाराचा माल उधार मिळत होता एक एक वेळेला. आतां नांव काढूं देत नाहींत उधारीचं. पांच पैशाचा सुद्धां माल उधार देत नाहींत कुणी ! "

" तें कांहीं का असेना: तुमचे पैसे मी भागवतों लवकरच हं. "

" होता होईल तितकं जरा लवकर बघा म्हणजे झालं. "

असं म्हणत लेले निघून गेले.

माधवराव विषण्ण चित्तानं पुन्हां गुणगुणूं लागले,—भूत-प्रेत समंधादि रोगव्याधि समस्तहि...........'

तें स्तोत्र म्हणून झाल्यावर माधवरावांनीं देव्हाऱ्यांतला एक एक देव उचलून ते धुण्याकरतां—आपल्या समोरच्या ताम्हनांत ठेवायला सुरवात केली. मात्र कां कोणास ठाऊक, त्यावेळीं त्यांच्या मनांत एक विचार आला,—' काय करतों आहों आपण हें-?—देवाची पूजा ?—पण या मूर्तींची पूजा म्हणजे देवांची पूजा होत असेल ?—देव म्हणजे तरी काय पण ?—एक शक्ति ? कुठं आहे ती ?-या मूर्तींत-?—खरंच काय असेल देव म्हणजे ?—अन् या मूर्तीची मनोभावानं पूजा करून आपली स्थिति कशी सुधारणार ?—तसं असतं तर माणसाला हे इतके व्याप करावेच लागले नसते. पूजा करून सगळं कांहीं त्याला साध्य झालं असतं.-व्हायला हवं. पण तसं होतंय कुठं ?—कां आपलंच कांहीं चुकत असेल ?—तसंच कांहींतरी असलं पाहिजे.—असं करणं म्हणजे ती खऱ्या देवाची पूजा होत नसेल किंवा ही पूजाच मनाभावापसनं व्हायला पाहिजे तशी होत नसावी.'

अन् मग त्यांना वाटलं,—' आपल्या हातून पूजा अर्चा इत्यादि देवाची सेवाच योग्य रीतीनं झाली नाहीं, आणि म्हणूनच आपल्याला ही अशी स्थिति प्राप्त झाली आहे; नी हे असले नास्तीकपणाचे विचार आपल्या मनांत येत आहेत......'

त्यानीं मग मोठ्या भक्तिभावानं घंटा वाजवून मंत्र म्हणत देवावर पाणी घालायला सुरवात केली.

' खुन् खुन्-खन्-खन्—खन्-खन्—खन्-खन्-'-असा घंटेचा निनाद होत होता. अन् त्याचवेळीं अंगणांत कोणाच्या तरी सायकलची घंटा वाजत होती,—' खन्-खन्-खन् ' माधवरावांचं तिकडं लक्ष जातांच त्यानीं विभ्रवला पुन्हां बोलावून-कोण आलंय् तें पाहायला सांगितलं. कापड दुकानचे मालक रामगोपाळ मारवाडी आले होते.

विभवनें चौकशी करून येऊन तसं त्यांना सांगितलं,—

' त्यांना बाहेर गेलोंय म्हणून सांग मी, '

—आपल्या पुढच्या ताम्हनांतील बाळकृष्णाची मूर्ति उचलून ती एका वस्त्रानें पुसत माधवराव म्हणाले.

विभवनें परत जाऊन तसं त्या मारवाड्याला सांगितलं. शांताबाई तिथं समोरच होत्या. त्यांना उद्देशून रामगोपाळ म्हणाले,—' हामची बीलचे पैसा मागायला हामी आला होता म्हणून सांगा त्येसनीं. चार खेपा घातली हामी. आता हामी वायदा ऐकायचा न्हाय तुमची कस-लाबी. पंचीस रुपय झालीय बिलाचा. शमदा बीलाचा पैसा हामास्नी पायजे म्हणून त्येसनीं सांगा. ' नी मग—' अशा शमदा लोक कराय लागली तर बेपार तरी कशा करायचा हामी ? "—असं तणतणत तो निघून गेला.

थोड्याच वेळांत माधवरावांची देवपूजा झाली.

त्यांनीं मग शांताबाईला नैवेद्याकरतां साखर आणायला सांगितली.

शांताबाईनीं एका कागदाच्या चिटोऱ्यावर चिमटभर साखर घेऊन ती त्यांच्यापुढं नेऊन ठेवली नी त्या तिथंच उभा राहिल्या. त्यांचं नैवेद्य दाखवणं झाल्यावर त्या मग त्यांना म्हणाल्या,—

" पैशाची सोय केली पाहिजे आतां कांहींतरी. तगादे लागणार लोकांचे सारखे आतां. मघाशीं दूधवाली तंडून गेली चांगली अर्धा तास. तीन महिन्याचे पैसे द्यायचेत तिचे. ती म्हणाली—उद्यांचें उद्यां मला पैसे मिळाले पाहिजेत, नाहींतर मी दूध बंद करणार—म्हणून. आणखी आतां दोघं दुकानदार येऊन गेलेच. आज सरपण नाहीं. साखऱ्या संप-लाय. तांदूळ आणायला हवेत. तेल खलास झालंय. बरं वायदे तरी लोकांना सांगायचे किती ?—आजपर्यंत ऐकत होते लोक पण आता कुणीहि ऐकणार नाहीं. वायदे सांगून तगादे थांबायचे नाहींत. पैशाची सोय केलीच पाहिजे कांहींतरी. पोरंबाळं हीं इतकीं खाणारीं आहेत. भाजी भाकरी घातली तरी वीस पंचवीस रुपये लागतील महिन्याला. एवढे तरी नकोत मिळायला ? आज आतांच काय करायचं हा प्रश्न आहे. "

"म्हणजे कांहीं नाहीं का अगदीं घरांत?"

"आणलेलं असेल तर असायचं ना! आपोआप कांहीं निर्माण होत नाहीं.—तांदूळ तर नांवाला नाहींत."

"विराग कुठं गेलाय?"

"मेडल विकायला गेलाय तो आपलं."

"कां?"

"तेवढेच कशाला तरी पैसे होतील म्हणून. नशीब हें असं हाका मारतंय कीं आमचं...प्रपंच्याकरतां पोराला आपली भूषणावह वस्तु विकायची पाळी यावी म्हणजे दुर्दैवच नाहीं तर काय?—नोकरीकरतां छप्पन ठिकाणीं जाऊन खटपट करून आला... शिकवण्या मिळवण्याकरतां प्रयत्न केले. पण कुठं कांहीं नाहीं. तो तरी काय करणार आतां?—व्यापार-धंदा करावा म्हटलं तर जवळ पैसा नाहीं. नोकरी कुठं मिळत नाहीं. कसा मिळवायचा पैसा तरी मग? कांहीं सुचेनासं झालंय त्याला तर. सारखा विचार करीत असतो........"

"मी आतां असं करावं म्हणतोय-!—हें गांव सोडून आपल्या गांवीं राहायला जावं."

"गांव बदललं म्हणजे काय पैसे लागायचे नाहींत?"

"पैसे लागणारच, पण तें इतके लागायचे नाहींत. आपलं घर आहेच तिथं. तेव्हां घरभाडं कांहीं द्यावं लागणार नाहीं. भाजीपाला इथल्यापेक्षां स्वस्त- प्रसंगीं आपल्या मळ्यांतला वगैरे फुकटसुद्धां मिळेल. तिथं गेल्यावर मग बघूं या आणि कांहीं उद्योग वगैरे करून पैसा मिळवितां आला तर. इथं राहाण आतां श्रेयस्कर नाहीं. लोकांचे सारखे तगादे सुरू होणार. आपल्याजवळ तर पैसा नाहीं; पगाराच्या पैशापैकीं फक्त तीस रुपये उरले आहेत माझ्याजवळ. जायचं ठरलंच तर भाड्याला वगैरे लागतील म्हणून मी ते मुद्दाम ठेवले आहेत राखून. अन् जावं हेंच उत्तम अन् तें सुद्धां चारदोन दिवसाच्या आंत. जाणार जाणार म्हणून उगीच गवगवा करूं नये. आदले दिवशीं रात्रीं तीनचार भाड्याच्या बैलगाड्या सांगाव्यात. अन् पहाटे सामान भरून निघून जावं. नाहींतर इथं

जवळ जवळ दीडदोनशें रुपये द्यायचेत लोकांचे, ते आतां ताबडतोब द्यावे लागतील. शिवाय दरमहा कमींत कमी पंचवीस–तीस रुपये तरी हवेत खर्चाकरितां. मिळकत तर एक पैचीहि नाहीं आतां. अन् जवळ फक्त तीस रुपये शिल्लक आहेत. आपल्या गांवीं आपलं कसंतरी चालेल. गाय आतां व्यायला झाली असेलच. दुधाचा प्रश्न नाहीं. शेतीचं उत्पन्न थोडसं आहेच. चालवायचं कसंतरी तेवढ्यावर. –मग काय करायचं?–"

"—पण मग मुलांच्या शिक्षणाची सोय काय करायची?"

"तें पुढं पाहतां येईल!"

—त्यांचं हें बोलणं चाललं होतं, इतक्यांत विराग बाहेरून आला. त्याला बोलावून शांताबाईनीं विचारलं,—"काय झालं रे?"

"विकून आलों कीं मेडल."

"किती आले पैसे?"

—माधवरावनीं आशाळभूतपणें विचारले.

"सत्तावीस रुपये आले होते. त्यापैकीं क्लासची फी दिली पांच रुपये; बावीस रुपये राहिलेत."—विराग खिशांतून काढून शांताबाईच्या हातीं देत म्हणाला.

"वाटेल तसे खर्चूं नका उगीच. नाहींतर माझ्याजवळ द्या ते."

—माधवराव सोवळं सोडून धोतर नेसण्याकरतां उठत म्हणाले. त्यावर—'नको–ठेवते माझ्याजवळच!'—असें म्हणून शांताबाई तेथून स्वयंपाकघरांत निघून गेल्या. विरागला तो एका वक्तृत्व–चढाओढींत पहिला आल्याबद्दल तें मेडल मिळालं होतं. नंतर माधवराव विरागला म्हणाले,—

"आपल्या गांवीं जावं म्हणतोय मी राहायला!"

"कांहीं हरकत नाहीं. पण केव्हां?"

"चार दोन दिवसाच्या आंतच जाऊं या. काय करायचं आहे आतां इथं राहून तरी. तिथं आपलं घर आहे. शेतीचं उत्पन्न आहे. चालेल कसंतरी. तुला काय वाटतं?"

"आतां इथं राहूं नये आपण."

"आज दुपारीं आतां नक्की ठरवूंया काय तें. तूं आतां अगोदर असं कर—तिच्या जवळून एक रुपाया मागून घे अन् तांदूळ आण."

विरागनं स्वैपाकघरांत जाऊन शांताबाईंना रुपाया मागितला.

"त्यांच्याकडून घे. अन् तूं त्यांना जितके पैसे आले' म्हणून कशाला सांगितलंस? दहा बारा रुपये आले म्हणून सांगायचंस.... माझ्याजवळचे सगळे पैसे मला खर्च करायला लावल्याशिवाय त्यांना आतां चैन पडायचं नाहीं. थोडे पैसे जवळ असले म्हणजे उपयोगी पडतात नडी—अडचणीला."

"आतांपुरता एक रुपया दे. मी आतां त्यांच्याकडं मागत नाहीं."

शांताबाईंनीं मोठ्या नाखुषीनें एक रुपाया काढून त्याच्या हातीं ठेवला. विराग तांदूळ आणायला निघाला. इतक्यांत पोस्टमननें त्याच्या खोलीच्या खिडकींतून एक पाकीट आंत टाकलेलं त्यानं पाहिलं.—

तो आपल्या खोलींत गेला. त्यानं तें पाकीट उचलून घेऊन फोडलं. तें लतेकडून आलं होतं.—तिनं लिहिलं होतं,—

'तुझं पत्र पोचलं; दादांची नोकरी गेल्याचं वाचून अत्यंत खेद-वाटला. आतां कसा चालायचारे प्रपंच आमचा?—अन् विराग तुझं ध्येय तुला आतां कसं साधतां येणार?—अखिल मानवजात सुखी होईल अशा कार्याकरतां वाहून घेणार होतास ना तूं? परिस्थितीच्या आगींत तूं आपलं हें ध्येय भस्मसात होऊं देऊं नकोस. काय करायचं ठरवलं आहेस—? आपल्या पोटाचा—जीवनाचा—आपल्या कुटुंबाच्या चरितार्थाचा प्रश्न अगोदर सोडवला पाहिजे. तो कसा सोडवावा?— या विवंचनेंत असशील तूं.—होय ना?— इथंच चुकतं बघ सगळं. आणि मग ध्येयं कितीहि उज्वल नी मोठीं असलीं तरी माणसाच्या हातून कसलंच कार्य घडून येत नाहीं. नी आलं तरी तें प्रभावी ठरत नाहीं. अखिल मानवजातीचं हित—हें तुझं ध्येय ना? मग व्यक्ति, कुटुंब, समाज अगर राष्ट्र—यांच्या हिताची विवंचना तूं कां करावीस?—अखिल मानवजातीच्य वृक्षाच्या मुळांशीं तूं आपल्या उज्ज्वल तत्त्वांचं,—परिश्रमाचं,—ध्येयाचं खत घाल; त्यामुळं तो वृक्ष जोमदार होइल नी मग आपोआप त्याच्या या शाखा,

डाहळया पानं·शांतीसुखानं बहरतील. तुला एक गोष्ट आठवते का ?–आपले काका बरचेवर आपल्याला ती सांगत असत.—एकानं आजन्म परमेश्वराचं ध्यान करायचं, हें आपलं ध्येय ठरविलं. मग पोटाचा प्रश्न अगोदर सोडवायला हवा म्हणून कमींत कमी वेळांत जास्तींत जास्त पैसा मिळेल असा कांहींतरी मार्ग शोधून काढण्याच्या तो प्रथम प्रयत्नाला लागला. एकदां कां पोटाचा प्रश्न अशा तऱ्हेनं सोडवतां आला, कीं मग आपल्याला परमेश्वर चिंतनाकरतां वाटेल तितका वेळ मिळेल ही त्याची कल्पना. त्याला एका साधूनं एक मार्ग सांगितला.–किमया–कृत्रिम सोन्याचा शोध. त्यानं रात्रं-दिवस तें संशोधन चालूं ठेवलं. निरनिराळया वनस्पती आणायच्या, भट्टया घालायच्या...नाना तऱ्हा. त्याच्याकरतां त्याला मग पैशाची टंचाई भासूं लागली. पैशाकरतां त्यानं नोकरी धरली. नोकरीकरतां वेळच्यावेळीं जायला हवं तेव्हां जेवणखाणाची वगैरे घरची व्यवस्था पहाण्याकरतां कोणतरी पाहिजे म्हणून त्यानं लग्न करून घेतलें. त्याला पुढं मुलं झालीं. पैसा प्रपंचालाच पुरेनासा झाला, नी वेळहि मिळेनासा झाला. संशोधन थांबलं. किमया कांहीं साध्य झाली नाहीं. त्यानं शेवटीं आपल्या एका मुलाचं नांव सोन्या ठेवलं. पुढं पुढं तो प्रपंचाला मनस्वी कंटाळला अन् मग देवाला आठवून सारखं म्हणूं लागला,—‘ देवा, केव्हां सोडवणार मला एकदां यांतनं ?’ गोष्ट जुनी आहे; देवाची कल्पना वगळून आपल्याला दुसरी कोणतीहि घालतां येईल. ध्येयाच्या बाबतींत असं होऊं नये—नाहीं का ? नुसतं ध्येय उच्च असून काय उपयोग ? तें ध्येय साधण्याकरतां आपण प्रत्यक्ष काय करतों त्यावरूनच आपल्या कर्तबगारीची खरी साक्ष पटेल. तुला उपदेश करण्याकरतां मी हें लिहीत नाहीं. तूं हें माझ्यापेक्षांहि अधिक चांगलं जाणतोस. इतकंच नव्हे तर तूंच मला हें सगळं शिकवलं आहेस. त्याचा तुला विसर पडूं नये म्हणून–तो तुला पडणार नाहीं, अशी माझी खात्री असतांहि–मी हें लिहिलं आहे.

—खरंच पण, लिहिण्याच्या भरांत तुला एक महत्त्वाची गोष्ट सांगायची राहिलीच कीं. एकदोन दिवसांत मामांचं घर सोडून कुंजवनची ती नोकरी पत्करायचं मी नक्की ठरावलं आहे.—मला तीस रुपये

मिळायला लागतील. काटकसरीनं वागून मला घराकडं दहाबारा रुपये पाठ-
वितां येतील. मामा माझ्या लग्नाची घाई कां करीत होते ठाऊक आहे का ?
मंदारशीं माझं लग्न व्हावं अशी मामांची नव्हे इथल्या सगळ्यांचीच
इच्छा आहे-होती—म्हणून त्यांनीं हा व्यूह रचला होता. असं असं एक
चांगलं स्थळ आहे म्हणून ते दादांना खोटंच कळवीत होते. उद्देश हा
कीं मग आईच्या आग्रहावरून त्यांनीं लिहावं-आम्हाला दुसरं स्थळ
नको, तिला आम्ही मंदारलाच देणार आहोंत, अन् मग आपण घाई
करावी,-मंदारलाच द्यायची असेल तर ठरवून टाका एकदां काय तें नक्की,
आम्हाला त्याचं लग्न यंदा ठेवायचं नाहीं-अशी, नी चटकन् मग लग्न
उरकून घ्यावं. अन् ही इतकी घाई कशासाठीं, तर मंदार आणखी
नापास होत गेला तर त्याच्या माझ्या शिक्षणांत आणि अंतर पडत जाईल,
नी मग कदाचित् आमचं लग्न शक्य होणार नाहीं-म्हणून ! विराग हीं
आमच्या सुशिक्षित नी सुसंस्कृत माणसांचीं मनं-मतं !-किती स्वार्थी नी
अज्ञानमूलक आहेत ?-याना माणसं तरी कां म्हणावं ?-यांनीं आपल्या
इच्छा दुसऱ्यावर कां लादाव्यात ? दुसऱ्यांना इच्छा,-मतं नसतात ?--
केव्हां कळायचं तरी या लोकांना हें ?—अन् या सगळ्याला कारण आई !-
वाटतं आपल्याला आईचं प्रेम, पण तेंहि कांहीं कमी स्वार्थी नसतं !
तिचा कसला आलाय स्वार्थ यांत—म्हणशील. अरे, मी तिची मुलगी
असले तरी मंदार तिच्या भावाचाच मुलगा आहे, शिवाय भाऊ श्रीमंत
आहे. नुसत्या रक्ताचीं नातीं फोल असतात-असं वनिता वरचेवर म्हणत
असते तेंच खरं ! मी घरीं नाहीं असं समजून एक दिवस त्यांचीं हीं
चाललेलीं खलबतं चुकून मला ऐकायला मिळालीं.— मी कोणाचींहि
मतं माझ्यावर मुळींच लादून घेतलीं नसतीं- पण नकोच तें. आतां इथं
राहाण्यांत अर्थ नाहीं. अनायासें संधि आली आहे; मी तिचा फायदा
घेणार. इतक्यांत तूं आई-दादांना कांहीं कळवूं नकोस. बहुतेक एक
दोन दिवसांत मी तिकडं जाईन. जातांना मला मोठ्या युक्तीनं बाहेर
पडावं लागेल.—

तुझी—लता.

—तें पत्र वाचून झाल्यावर विरागनं त्याची घडी केली. इतक्यांत माधवरावांनीं तिथं येऊन त्याला विचारलं,—'कायरे, कुणाचं पत्र आलंय ?'—त्यावर तें आपल्या मित्राकडून आलंय् अशी उडवाउडवी विरागनं केली, पण पाहूंया कोणत्या मित्राचं आहे तें—असं माधवराव म्हणाल्यावर त्याला तें त्यांच्या हातीं देऊन म्हणावं लागलं,—'लतेचंच आहे आपल्या.' तें पत्र माधवरावांनीं वाचलं. त्यांना आनंद झाला. एरवीं त्याची त्यांना चीड आली असती. मुलींनीं नोकऱ्या करायच्या-ही कल्पना सुद्धां त्यांना सहन होत नसे. पण त्यावेळीं मात्र ते तिचा कैवार घेऊन म्हणाले,—

"वा, बरेच दिसतायत कीं दिनकरपंत मग हे. मामा असले म्हणून काय झालं ? तिच्या शिक्षणाची त्यांना काळजी वाटत होती ती याच्याच-करतां वाटतं. किती विलक्षण असतात माणसांचीं मनं खरंच !—मला कल्पना नाहीं याची. नाहींतर मी मागंच स्पष्टपणें सांगितलं असतं, शिक्षणाचीच आम्हाला गरज नाहीं म्हणून. आणि आमची हीहि बरीच कारस्थानी दिसते कीं! छान केलंन् लतेनं. एक मिनिट राहूं नकोस म्हणावं तिथं तिला. नोकरी करायची असली तर पत्कर, नाहीं तर आपलं सरळ इकडं निघून ये म्हणावं. आम्ही आहोंतच इतके, तशी तूं एक. तिला लिहून कळव आजच्या आज. नोकरीहि कांहीं वाईट नाहीं. तूं ती पत्करलीस तरी आमची मुळींच हरकत नाहीं म्हणावं. तिला स्वतंत्र रीतीनं चागल्या तऱ्हेनं जगतां येईल. शिवाय आम्हालाहि मदत होईल थोडीशी. महिना दहा रुपये जरी तिच्याकडनं आले तरी तेवढे वरखर्चाला बस्स होतील आम्हाला आमच्या गांवीं. लिहून टाक तिला. कां मी लिहूं ? अन् हें पाहा, मी म्हणतो आपण आज-उद्यां दोन दिवसांत सगळी आवराआवर करून परवाच्या दिवशीं पहाटे येथून जाऊंया. सामान किती होतयं तें पाहून भाड्याच्या बैलगाड्या सांगून ठेऊंया उद्यां मग." त्यावर—"ठीक आहे !"— असं म्हणून विरागनं आपली संमति दर्शविली.

माधवराव पुन्हां देवघरांत गेले नी आत्यंतिक भक्तिभावानं देवाकडं पहात कृतज्ञतेनं पुटपुटले,—'परमेश्वरा, तूंच आमचा त्राता आहेस. तुझा आम्हांला विसर पडला म्हणूनच तूं आम्हांला हे दिवस दाखविलेस.

आज तुझी मनापसनं सेवा करतांच तुला आमची दया आली. लागलीच तूं आमची थोडीफार काळजी दूर केलीस. आम्ही पापी-अपराधी आहोत. क्षमा कर. '

नी मग देवाला साष्टांग नमस्कार घालून क्षणभर तन्मयतेनं देव्हाऱ्या-कडं पाहात ते उभे राहिले. निरंजनाच्या प्रकाशामुळं त्या धातूंच्या मूर्ति चकाकत होत्या. माधवरावांना मात्र वाटलं,—' केवढं तेज ओसंडत आहे देवांच्या अंगातून ! '—

ठरविल्याप्रमाणं दोन दिवसात त्यांनीं सगळी बांधाबांध केली. विरागनं भाड्याच्या चार बैलगाड्या सांगितल्या. पहाटे कूच करायचं त्यांनीं ठरवलं. आवराआवर करण्यात त्यांना रात्रीचे बारा वाजले अन् पहाटे चारला तर गाड्या जोडायच्या होत्या. विराग,— माधवराव नी शांताबाई या तिघांनाहि नंतर झोप लागली नाहीं. विराग अंथरूणावर पडला होता. सातआठ वर्षांपूर्वी त्यानं आपलं तें गाव—रोहिणी—पाहिलं होतं.— अंथरूणावर पडल्या पडल्या तो तें आठवूं लागला. तिथलीं निरनिराळीं दृश्यं त्याच्या अंत:चक्षूसमोर उभी राहिलीं.– तिथला तो पाटलाचा मोठा-थोरला वाडा.—गांवाबाहेरची चिरेबंदी बाधून काढलेली ती प्रचंड गांवविहीर. शाळा. मास्तराचं घर. देऊळ. गावा-भोवतालचे नेहमीं पिकांनीं गजबजलेले हिरवेगार मळे. आपलं घर. अंगण. परड्यांतला आड. तिथले ते भोळेभाबडे लोक. गांवापासून दोन मला-वर असलेला तो रेवतीचा रम्य तलाव. हिवाळ्याच्या दिवसांत सायंकाळीं तिथं दिसणारीं तीं नयनमनोहर निसर्ग दृश्यें. तिथलं ते ताडींच्या झाडांचं बन. तेथून दिसणारं तें दूरवरचं स्टेशन. रात्रीच्या वेळीं माणसाचं चटकन् लक्ष वेधून घेणारे तिथले ते हिरव्या तांबड्या रंगाचे सिग्नलचे दिवे... किती तरी गोष्टी त्याला आठवल्या अन्—हें सगळं आपल्याला आतां पुन्हा पाहायला मिळणार म्हणून त्याला थोडासा आनंद वाटला.

पहाटे चार साडेचार वाजतां त्यानीं गाड्या जुंपल्या. माधवरावांनीं देवाची संबळी आपल्याजवळ घेतली. ते गावाबाहेर पडल्यावर-थोड्याच वेळांत शुक्राची चांदणी उगवली. तिच्या आल्हादकारक, शांत प्रकाशांत

त्या गाड्या एकामागून एक निघाल्या होत्या. बैलांच्या गळ्यांतील घुंगुरांचा मंजूळ आवाज होत होता. आपल्या बैलांना घाईन चालण्याचा इषारा देण्याकरतां ते गाडीवान मध्येंच वरचेवर त्यांचीं नांवं उच्चारत होते,–

'पिल्या–पिल्या—पाकन्या–पाकन्या—परदा–परदान्या—!'

विरागचं तिकडं कशाकडंच लक्ष नव्हतं, त्याच्या मनांत विचार घोळत होते,—

'खरंच काल लतेनं आपल्या पत्रांत लिहिलं आहे ते अगदीं बरोबर आहे. नुसत ध्येय उच्च असून काय उपयोग?—तं साध्य करण्याकरतां माणसाच्या हातून जे प्रयत्न होतील, त्यालाच खरं महत्त्व आहे. असे प्रयत्न काय केले आहेत आपण आजपर्यंत? उलट स्वतःचा चरितार्थ चालवतां यावा म्हणून आपण वकिलीच्या परीक्षा द्यायचं ठरविलं. आणि आतां दादांची नोकरी गेल्यापासून आपल्या कुटुंबाचा चरितार्थ चालविण्याकरतां आपण कांहींहि करून पैसा मिळवला पाहिजे—हे विचार सारखे आपल्या मनांत घोळूं लागले आहेत. माणसानं जगायचं कशासाठीं? वैयक्तिक—कौटुंबिक सुखासाठीं? पण तें तरी सुख त्याला कसं साध्य होऊं शकेल–?—कारण व्यक्ति,–कुटुंब, समाज, राष्ट्रांनी जग किंवा अखिल मानवजात–यांचीं बरीचशीं सुखं परस्परांवर अवलंबून असतात. कौटुंबिक स्थिति चांगली नसेल तर त्यांतील व्यक्तींना सुखी होतां येणार नाहीं. एखाद्या समाजाची दुसऱ्या एखाद्या समाजाकडून पिळवणूक होत असेल तर त्या समाजांतील कुटुंबांना सुख लाभायचं नाहीं. तसंच राष्ट्राच्या बाबतींत. राष्ट्र स्वतंत्र नसेल अन् दुसऱ्या एक वा अनेक राष्ट्रांकडून त्याची पिळवणूक होत असेल तर त्यांतील—निरनिराळे समाज सुखी होऊ शकणार नाहींत नी नुसती सगळीं राष्ट्रं स्वतंत्र होऊनहि अखिल मानवजात सुखी होणार नाहीं. म्हणून माणसामाणसांत जाती, धर्म, वर्ण, राष्ट्र–इत्यादि उभे असलेले अजस्र तट नामशेष करून समता, स्वातंत्र्य आणि विश्वबंधुत्व—या उदात्त तत्वांवर नव्या जगाची उभारणी व्हायला हवी.

त्या जगांत कोणालाहि दुसऱ्याच्या श्रमाचा फुकटचा फायदा घेतां येऊं नये. स्पर्धेऐवजीं सहकार्य, भोगाऐवजीं त्याग नी द्वेषाऐवजीं प्रेम

प्रस्थापित झालेलं असावं. जगांतली आर्थिक नी बौद्धिक विषमता नाहींशी झाल्यावर मानवजातीचीं बरीचशीं दुःखं नाहींशी होतील, म्हणून त्यांचं निर्मूलन करण्याकरितां तशा प्रकारच्या क्रान्तिकार्याला वाहून घेणं, हें केव्हांहि श्रेयस्करच ठरेल. मात्र या विषमता नाहींशा झाल्यामुळं मानवजात सर्वस्वी सुखी होईल असं मुळींच नाहीं; कारण अज्ञान,-संस्कार परिस्थिति इत्यादिमुळं विकृत बनलेल्या निरनिराळया भावनांच्या अजस्त्र कारागृहांत खितपत पडलेल्या मानवी मनाला भोगाव्या लागणाऱ्या दुःखाच्या यातना या त्याहिपेक्षां अत्यंत जाचक आहेत; म्हणून त्यांतून मानवी मनाची मुक्तता करण्याचं कार्यहि त्याचबरोबर व्हायला हवं—म्हणजेच मानवी जीवनाच्या विकासाला खरं साहाय्य केल्यासारखं होईल. अशा तऱ्हेनं मानवी जीवनाच्या विकासाला साहाय्य करणं हाच मनुष्याचा जीवित–हेतु होय. आजवर हेंच कार्य तो करीत आला आहे. त्याच्याचकरतां तो जगत असतो. विकसित मानवी जीवनाचा इतिहास आपल्याला हीच साक्ष देतो. अशाच तऱ्हेच्या कार्याला आतां आपण पूर्णपणें वाहून घ्यायचं. दुसरा कसलाच विचार करायचा नाहीं.'

तर माधवराव कांहीं निराळयाच विचारांत मग्न होते,—'देव आहे म्हणून सगळं आहे. म्हणूनच जग चाललंय. नाहींतर हाहाःकार उडाला असता सगळा. पाऊस, वारा, धान्य, जीवजंतु, आम्ही माणसं, या सगळया त्याच्याच लीला आहेत. त्याची भक्तिभावानं जो सेवा करतो त्याचं तो कल्याण करतो. त्याचा ज्याला विसर पडतो त्याला तोहि विसरतो; अन् मग दारिद्र्य–दुःख त्याला पिडूं लागतात.'

नंतर मध्येंच त्यांना एकाएकीं आपण बरेच दिवसांत सत्यनारायण केला नाहीं याची आठवण झाली. ते मग लागलीच आपल्या पत्नीला म्हणाले, 'आतां गेल्यावर सवडीनं एकदां सत्यनारायण करायचा बरं का.'

शांताबाईचं त्यांच्या त्या बोलण्याकडं लक्षच गेलं नाहीं. त्यांचे कांहीं निराळेच विचार चालले होते,—

"दैवाचा खेळ आहे सगळा हा. आज इथं तर उद्यां तिथं. आणि काय काय नशिबीं आहे कोणास ठाऊक ! दैवच नाहीं तर काय हें !

गरिबी–श्रीमंती, अधिकार,– मोठेपणा,–दैवाच्याच लीला आहेत सगळ्या या. माणसाचं दैव बलवत्तर पाहिजे, तरच जगण्यांत खरी मौज. नाहींतर आमचं हें फुटकं नशिब ! जन्म गेला सगळा कष्टांत. रांधा–वाढा—अन् उष्टीं काढा. लोकांच्या बायका नाटकं सिनेमा पाहतात, फिरायला जातात, लिहितात वाचतात, कपडे चांगले वापरतात. आमच्या मात्र पांचवीला चूल अन् मूल पुजलेलीं आहेत.—नशिब नको का चांगलं असायला ?"

चंदापूरहून त्यांचं ते गांव–रोहिणी–पंचवीस तीस मैल होतं. सायंकाळीं चार वाजतां तिथं गाड्या पोचल्या. त्या भागाला पाऊस नव्हता. रेवतीचा तलाव प्रथम लागला. त्यांत पाण्याचा एक थेंबहि नव्हता. त्या तळ्याचं पाणी आटलंय असं कधीं घडलं नव्हतं. ठिकठिकाणीं गुराचें कळप मोकळ्या रानातून नुसतेच हिंडत होते. रानांत चरायला कांहीं नव्हतं. काहीं गुराखी पोरानीं आपल्या जनावरापुढं त्याना खाण्याकरतां कडुलिंबाचे–पिंपळाचे ढाळे मोडून टाकलेले होते. जनावराच्या अंगावर नुसतीं हाडं–कातडीं दिसत होतीं अन् त्या पोरापैकीं कुणाच्याहि अंगांत एकहि धड वस्त्र नव्हतं. गांवविहिरीलाहि फारस पाणी नव्हतं. गांवाभोंवतालचे सगळे मळे रुक्ष दिसत होते. कुठं तरी थोडसं हिरवं पीक दृष्टीस पडत होतं. गांवातल्या त्या पाटलाच्या मोठ्या वाड्याची सडकेसमोरची भिंत ढासळली होती. त्यामुळं तो वाडा भयाण दिसत होता. आणखी कित्येक घरांच्या भिंती तशाच ढासळलेल्या होत्या. कांहीं छपरं वाकलीं होतीं. कांहीं मोडलीं होती. गांवांत जागजागीं उकीरड्याचे ढीग सांचलेले होते. आणि त्यांचं घर ते तर विचारायलाच नको. त्याच्या दोन बाजूच्या भिंतीचे कोपरे पडले होते. परड्यांतलं बाभळीचं झाड वठलं होतं. सर्व कुंब्यावर सराट्याचे वाळलेले वेल नी तसलंच चिमणचाऱ्याचं गवत मातलेलं होतं. घराच्या समोरच्या दरवाजाचा खालचा बराचसा भाग कुजला होता. अंगणात ठिकठिकाणीं कुत्र्यांनीं डबरीं काढलीं होतीं आणि घरांत सर्वभर...घुशीनीं उकीर काढले होते.. ......

सगळं सामान उतरून घेऊन तें तात्पुरतं शिस्तीनं लावण्यांत त्यांचा बराचसा वेळ गेला. तिथं रात्रीं चावडीपुढं सभा होणार होती.

तें विरागला समजलं म्हणून जेवण उरकल्यावर तो आपलं सहज तिकडं जाऊन यावं म्हणून गेला. शे-दोनशें लोक चावडीपुढं जमले होते. नी त्यांच्यामध्यें एक तरुणी उभी राहून सांगत होती, '–गरिबांनीं गरिबांना मदत करायला हवी. तुमच्यापैकीं कोणीहि कुणाच्या तरी थापांवर विश्वास ठेवून हमाली अगर गाडीभाडं करण्याकरतां सारंगपूरला जाऊं नये. अशा वेळीं उलट तुम्ही त्यांना मदत केली पाहिजे...............'

ती तरुणी वनिता होती, ती बराच वेळ बोलत होती.

विरागकडं तिची दृष्टी जातांच आश्चर्यचकित होऊन तिनं स्मित केलं नी त्याला खुणेनं विचारलं,—

" इथं कसा तूं ? "

त्यावर त्यानं ' होऊं दे तुझं बोलणं मग सांगतों '—असा भाव अभिनयानं व्यक्त केला.

सभेचं काम संपल्यावर विराग तिला आपल्या घराकडं घेऊन आला. नंतर आपण तिथं का आलोंत ती सगळी हकीकत त्यानं तिला सांगितली. माधवरावांची नोकरी गेल्याचं ऐकून तिला खेद वाटला. वनिता मग त्याला आपल्या संपाची सगळी हकीगत सांगून म्हणाली,'हमाली करितां व्यापारी लोक खेड्यापाड्यांतून माणसं मिळवणार होते तीं त्यांना मिळूं नयेत म्हणून तसा प्रचार करण्याकरितां मी अशी आज आठ-दहा दिवस खेड्याखेड्यांतून हिंडते आहे. या माझ्या प्रचार-कार्याचा फार उपयोग झाला. व्यापाऱ्यांना माणसं मिळूं शकलीं नाहींतच. शिवाय संपाला मदत म्हणून या खेड्यापाड्यांतून तीस–चाळीस पोतीं धान्य मिळवून मला पाठवतां आलं. आमचा हा संप खात्रीनं यशस्वी होणार. तूं आतां इथं राहून काय करणार ? '

' इथं राहणार नाहीं मी. चार दोन दिवसांत परत चंदापूरला जाऊन मी आतां माझ्या कार्याला सुरवात करणार. '

' कसल्या कार्याला ? '

' तें मी आतां प्रत्यक्ष करून दाखवीन. '

‘ या आमच्या मजूर-कामगारांच्या चळवळीविषयीं तुला आस्था वाटत नाहीं ? ’

‘ वाटत नाहीं म्हणजे ? जरूर वाटते. पण नुसती संघटना आणि संप यामुळं आपल्याला मजूर कामगारांचं कितीसं हीत साधतां येईल ?... तें जास्तींत जास्त साधतां यायला काय करायला हवं हें आपण पाहिलं पाहिजे नी त्याचबरोबर दुसऱ्याच्या श्रमाचा फुकटचा फायदा घेण्याच्या वृत्तीचं जगांतून निर्मूलन होईल असं कार्य आपण केलं पाहिजे !’

‘ पण तें कसं करायचं ? ’

‘ समाज क्रान्तिकार्याला प्रवृत्त करून समाजांत वैचारिक क्रान्ति घडवून आणून. मी तसाच प्रयत्न करणार आहे. ’

त्यांचं हें असं बोलणं चाललं होतं. इतक्यांत वनितेची चौकशी करीत एक गृहस्थ तिथं आला नी त्यानं एक पत्र तिच्या हातीं दिलं.

तें आकाशचं पत्र होतं. त्यांत त्यानं लिहिलं होतं, —

प्रिय वनिताताई,

कळविण्यास आनंद वाटतो कीं, आपला संप यशस्वी झाला आहे. व्यापाऱ्यांनीं सगळ्या मागण्या मान्य केल्या आहेत. तुम्ही आतां चंदापूरला जायला हरकत नाहीं. आणखी कांहीं दिवस मला इथं राहिलं पाहिजे. बाकी इथं मी राहाणार आहे ते नुसतं नांवालाच म्हणा. आसपासच्या खेड्यापाड्यांतून पावसाच्या अभावीं दुष्काळाच्या छाया पसरूं लागल्या आहेत. शेतकरीवर्ग हवालदील झाला आहे. मी या खेड्यापाड्यांतून हिंडून शेतकऱ्यांची संघटना करून त्यांना सारा माफ होईल, त्यांच्याकरितां सरकार दुष्काळी कामं सुरू करील, असं कार्य करणार आहे. नी त्याचबरोबर या परिस्थितीचा फायदा घेऊन अगदीं कमींत कमी मजुरी देऊन भांडवलदारांना कसलींच कामं करून घेतां येणार नाहींत, अशी कांहीं तरी व्यवस्था करणार आहे.

आणखी विशेष म्हणजे इथल्या संपाचं वृत्त ऐकून आपल्या चंदापूरच्या हमालानींहि संप करायचं ठरवलं आहे. विरागच्या मदतींनं त्यांची संघटना करा. कदाचित तुमचे वडील तुम्हाला कसून अडथळा करतील.

मला काय तें कळवा. विरागला माझा नमस्कार सांगा, अन् त्याला म्हणावं तिथली तेवढी हमालांची संघटना करून त्यांच्या हमालींत वाढ होईल असं कर. पत्राची वाट पहात आहे.

माझा पत्ताः—
यशवंता सद्गुणे गाडीवान याचे घरीं
नकट्या मारुतीजवळ, सारंगपूर.

वनितेनं ते पत्र विरागला वाचायला दिलं. त्यानं तें वाचल्यावर ती त्याला म्हणाली,—

‘ येणार आहेस ना तूं लवकरच चंदापूरला ? ’

‘ हो. ’

‘ मग काय लिहूं आकाशला ? ’

‘ त्याची ही कामगिरी बरोबर बजावतों म्हणून लिही त्याला. आणि दोन दिवसांनीं मी तिकडं येईन. ’

‘ कांहीं हरकत नाहीं. मी उद्यां सकाळीं जाते मग इथून घरीं. अण्णा काळजींत असतील. ’

‘ ठीक आहे. ’—विराग तें पत्र तिच्या हातीं देत म्हणाला.

---

# प्रकरण ७ वें

' सोमवार—सोमवार आठ, मंगळवार नऊ, बुधवार दहा,— आज दहा दिवस झाले पत्ता नाहीं पोरीचा. बरं तिला तरी कांहीं काळजी आहे, कीं होय बाबा घरांत बाप आहे आपला, तो काळजी करेल, त्याला कळवावं, अन् मग वाटेल ते करावं. पण तें कसं होईल ? कुठला बाप अन् कुठलं काय !— उद्यां आता अकरा तारीख. मानपत्र समारंभाचा दिवस. कलेक्टर घराकडं पार्टीला येणार. इच्याकरतां म्हणून मुद्दाम हरीभाऊ नी त्याचा मुलगा प्रमोद यांना आमंत्रण दिलंय मी. अन् ही घरांत नाहीं. नसली तरी हरकत नव्हती. पण ही फिरते आहे चळवळी करीत.— याला कारण तीं दोन कार्टीं—आकाश अन् तो विराग. ते शिकवतात. नी ही ऐकते त्यांचं. दरिद्री लेकाचे. पैसा मिळवायची अक्कल नाहीं. चळवळी—करतायत्. आतां काय सांगायचं उद्यां तीं माणसं येणार त्यांनीं विचारलं तर ! चळवळी करीत हिंडते आहे म्हणून !— कलेक्टर—डि. जज्ज असलीं बडीं माणसं आपल्या घरीं येणार. त्यांना जर हें समजलं, तर त्यांना काय वाटेल ! पाऊल टाकायचे नाहींत पुन्हां घरांत ते आमच्या. चुकलं आपलंच. आपण या फंदांतच पडायचं नाहीं. पण आशा एक आहे कीं माणसाची. दोन्हीं स्थळं जमून येण्यासारखीं होतीं म्हणून एवढा उपद्व्याप केला मी. '

—असं आपल्याशींच मोठ्यानें पुटपुटत केशवराव आपल्या दिवाणखान्यांत इकडून तिकडं येरझारा घालीत होते.

' इतक्यांत दिवाणजी तिथं आले. केशवरावनीं त्यांना विचारलं,–

" कां लागला का कुठं पत्ता ?"

" नाहीं मालक. सगळ्या खेड्यांना माणसं पाठविलीं. पण कुठं तपास लागत नाहीं म्हणून तीं सगळींच परत आलीं आहेत. एका गांवांत जावून चौकशी केली म्हणजे तिथले लोक दुसऱ्याच एका गांवाचं नांव घेऊन सांगतात, इथं आल्या नाहींत त्या; तिथं असतील आज. बरं तिथं जाऊन चौकशी केली तर तिथले लोक सांगतात, इथं त्या कालच येऊन गेल्या, आतां त्या अमक्या ठिकाणीं असतील. या गावासन् त्या गांवाला त्या गावासनं या गांवाला भटकत फिरतायत गडी सारखे. धंदा तर जोरांत सुरूं झालाय, मालाला सारखी मागणी आहे. अन् आम्ही आपलं भटकतोय गांवोगांव."

"जाळा धंदा ! काय करायचंय धंदा करून ? सोन्यासारखी माझी पोरगी बेपत्ता आहे, अन् धंदा कसला करतां आहांत तुम्ही ? कुणाकरितां करायचं हें सगळं ?–दुकानीं बसूं नका कोणीहि. बंद करून टाका सगळीं. अन् सगळेजण तिचा तपास करायला जावा. मी अडकून पडलोंय या उद्यांच्या लिच्यांडात; नाहीं तर जग धुंडून आलों असतों मी सगळं. तरी–रात्रंदिवस तिची विचारपूस करतों आहेच. भेटेल त्याला विचारतोय—तुम्ही कांहीं ऐकलंयत का आमच्या मुलीसंबंधीं म्हणून—गांठ पडेल त्याला सांगतोय लक्ष असूं द्या तुमचं थोडं असं.—जावा तुम्ही अन् रडगाणं गात परत येऊं नका. उद्यांची तेवढी ब्यद आटपली कीं मी मोकळा होतोय्; पृथ्वीच्या पोटांतनं हुडकून आणीन तिला मग. तुम्हाला कल्पना यायची नाहीं दिवाणजी, माझ्या अंतःकरणाची; तीन दिवस झाले आज, झोप नाहीं. तीळ तीळ तुटतोय माझा जीव सारखा. एवढे एवढे बच्चे असल्यापासून जीवापलिकडं प्रेमं करून त्यांचं मी जतन केलं आहे. बघा सगळींकडं तपास करून. तारा करा. माणसं पाठवा. पत्रं लिहा. अन् तिचा कुठं कुणाला तपास लागला तर तिला

असेल तशी घेऊन या म्हणावं. तिला म्हणावं, मी तुझी आतुरतेनं वाट पाहात आहे. अत्यंत काळजींत आहे. मला ताबडतोब भेट. मग पुन्हां तुला हवं असल्यास आणि जा—'

त्याच वेळीं खालच्या चौकांत 'अण्णा, अण्णाऽऽ'—अशा कोण-तरी हाका मारत होतं. केशवरावांचं तिकडं लक्ष जातांच त्यांना तो आवाज ओळखला.

तो वनितेचा आवाज होता. 'आलों हं आलों वने, मी—!' असं म्हणत घाईघाईनं जिना उतरून केशवराव खालीं चौकांत गेले. वनिते-जवळ जातांच तिला कडकडून मिठी मारून ते गहिंवरून म्हणाले,—
'कुठं गेली होतीस मला सोडून खुळे!—मला सांगायचं नाहींस? आम्ही आपलं सगळीकडं शोधतोंय, तरी कुठंच पत्ता नाहीं तुझा.'

वनिता कांहींच बोलली नाहीं.

केशवराव तिला मग आपल्या दिवाणखान्यांत घेऊन आले नी म्हणाले.

उद्यां अकरा तारीख. मानपत्रसमारंभ आहे आपल्या घरीं. कलेक्टर येणार आहेत पार्टीला. हरीभाऊंना नी त्यांचा मुलगा प्रमोद यांनाहि मी आमंत्रण दिलंय मुद्दाम. तुझ्या मैत्रिणीला-चंचलेलाहि सांगि-तलंय्. चातकासारखी वाट पाहातोंय मी तुझी,—आतां येईल, मग येईल,—म्हणून. बरं झालं निदान आज तरी आलीस. मला आनंद झाला. अन् तूं या चळवळी कसल्या करायला लागली आहेस? कुणी सांगितल्या आहेत तुला या उठाठेवी करायला?—मला हें मुळींच पसंत नाहीं. तूं सगळं हें सोडून द्यावंस; तुझं आता लग्नाचं वय हें......"

केशवराव आणि कांहीं तरी बोलणार होते पण जिन्यांत पाऊल वाजत असलेलें ऐकून ते मध्येंच थांबले.

प्रभाकर एकाला घेऊन वर आला. वनितेला पाहातांच तो आनं-दून म्हणाला,—

"ओ—हो, ताईसाहेब केव्हां आल्या? कुठं दडी मारली होतीत इतके दिवस?—घरीं कळवून जायचं नाहींस का?—अन् मैत्रीणीच्या घरीं

राहायला जातें असं सांगून चळवळी करीत हिंडतेस काय ?—फार मजूर कामगारासंबंधीं प्रेम वाटत असेल तर लक्षावधि रुपये मिळवावेत अन् त्यांचो त्यांच्यांत खैरात करावी. संप अन् चळवळी करून काय होणार आहे ?— ”

प्रभाकरचं बोलणं ऐकून वनिता चिडली. केशवरावांनीं तें पाहिलं. उगीच वाद वाढून वनितेच्या मनावर त्याचा आणि परिणाम व्हायला नको म्हणून केशवराव ‘ गप्प बैस. तूं बोलूं नकोस तिला कांहीं ’ —असं प्रभाकरला म्हणाले. अन् त्यानीं मग त्याला विचारलं,—

“ याना कां घेऊन आलायस ? ”

“ हार—गुच्छाकरतां उद्याच्या ! ”

—प्रभाकर खुर्चीवर बसत म्हणाला.

“ मग काय म्हणताहेत ते ? ”

“ पंन्नास रुपये मागताहेत. ”

त्यावर तो गृहस्थ म्हणाला,

“ फुलच मिळत नाहींत साहेब. मला आत्ता माणसं पाठवून तजविज केली पाहिजे. काम बघा कसं करतों तें ! ”

“ बरं आहे, मग दुपारीं दोनच्या आत दहा हार अन् एक वीस पंचवीस गुच्छ आणून द्या. हार–गुच्छ चांगले झाले पाहिजेत मात्र हं. कलेक्टर येणार आहेत आमच्याकडं. नाहींतर कांहींतरी करून आणाल अन् आमची शोभा कराल. अन् वेळेला आले पाहिजेत. ”

केशवराव आपल्या टक्कल पडलेल्या टाळूवरून आपला उजवा हात फिरवीत म्हणाले.

“ अगदीं बरोबर वेळेला पोचते करतों. अन् कामहि चोख करतों अगदीं. बघातरी, आपण पुन्हां याल माझ्याकडंच ! ”

“ याल काय, यायचं आहेच. आमच्या या मुलांचीं लग्नं ठरलीं म्हणजे पुन्हां कदाचित् येत्या मार्गशीर्ष मासींच आम्हांला तुमच्याकडं यावं लागणार आहे. ”

‘ ठीक आहे साहेब, मग मी लागतों तजविजीला. ’—असं सांगून गृहस्थ निघून गेला.

“ किती रुपये खर्च करणार आहां ? ”

आपल्या वडिलांना—वनितेनं—केशवरावांना विचारलं.

“ किती होतील तितके. पैशाचा प्रश्न नाहीं, माझा उद्देश साध्य झाला म्हणजे झालं. ”

“ कसला उद्देश ? ”

“ कसला ?-तुम्हां दोघांच्या लग्नाचा. रावबहाद्दुर सरदेसाई आपल्या प्रभाकरची चौकशी करीत होते चंचलेकरतां त्यांच्या. अन् तुझ्यासंबंधीं हरीभाऊ पटवर्धनांना मी गोष्ट काढणार आहे. त्यांचा मुलगा आहे—एक लग्नाचा. एकुलता एक आहे बी. ए. पर्यंत शिकलेला आहे. स्थळहि बरं आहे. डिस्ट्रिक्ट जज्ज होते हरीभाऊ. ”

“ डिस्ट्रिक्ट जज्ज असतील, नाहींतर सार्वभौम असतील, माझ्यासंबंधीं आपण त्याच्याजवळ कांहीं बोलूं नका. मला माझं हित कळतं. लग्न करायचं कीं नाहीं, केलंच तर ते कोणाशीं करायचं, तें माझं मी ठरवीन.”

—वनिता संतापून म्हणाली.

“ आम्ही कुणी नाहींच का तुझे ? ”

“ मी कुठं तस म्हणतें आहे. ”

“ मग आम्ही करूं तें तुझ्या अहितासाठीं वाटतं ?—”

“ पण माझं हित तुम्ही आपल्या दृष्टीनं पाहतां. माझी दृष्टी निराळी असेल तर ?—”

“ निराळी म्हणजे कसली तें तरी कळूं दे एकदां आम्हाला मग. ”

“ मला वाटतं, आपण हा विषयच थांबवावा. मात्र पार्टीकरतां इतका खर्च करून आपण अन्याय करतां आहां. तुम्हांला असा खर्च करायचा अधिकार नाहीं. खेड्यापाड्यांत जाऊन पाहा—शेकडों कुटुंबांना उपासमार सहन करावी लागते आहे. कित्येकजण अर्धपोटीं काल कंठताहेत. आठआठ दहादहा तास राबूनहि किती तरी जणांचा नुसता अन्नवस्त्रांचा प्रश्न सुटत नाहीं. तुम्हांला मात्र कसल्याहि प्रकारचे विशेष कष्ट न

करतां मुबलक पैसा मिळू शकतो. अन् तो तुम्ही असा वाटेल तसा खर्च करतां. खरोखरीच हा अन्याय आहे. आपण जो पैसा खर्च करतो तो आपण कसा मिळवला किंवा आपल्याला तो कसा मिळाला या संबंधीं नीट विचार करा म्हणजे मी म्हणतें तें आपल्याला पटेल."

"बरं तें जाऊं दे. तूं उद्यां हजर तरी राहाणार ना पार्टीला!"

"मुळींच नाहीं. पार्ट्या कसल्या, ह्या चोरांनीं चोरांना दिलेल्या मेजवान्या होत."

"मग तूं हजर राहाणार नाहींस तर? चांगलंच करतें आहेस मग! त्यांनीं विचारलं-तुमची मुलगी कुठं आहे म्हणून तर काय सांगू मग मी?"

"ती असल्या समारंभाला हजर रहात नाहीं म्हणून सांगा म्हणजे झालं."

"अन् कां म्हणून विचारल्यावर?"

"ती चोर नाहीं म्हणावं."

वनिता तेथून उठून खालीं जात म्हणाली.

दुसरे दिवशीं मानपत्रसमारंभ मोठ्या थाटानें पार पडला. मानपत्र अर्पण करण्यापूर्वी केशवरावांनीं तें वाचून दाखवलं. त्यांतील आशय असा होता,—

—आपण इथं आल्यापासून आमच्या व्यापाराची अभिवृद्धि झाली आहे. व्यापाराची प्रगति झाल्याशिवाय आमच्या देशाची प्रगति व्हावयाची नाहीं, हें जाणून आपण व्यापाऱ्यांना वरचेवर उत्तेजन देत आला आहां. ही आपली कळकळ, आपली न्यायनिष्ठुरता, प्रजा-वात्सल्य, प्रेमळपणा, मनोधैर्य, जोमदार कर्तृत्व, स्पष्टवक्तेपणा इत्यादि...

रावबहादूर सरदेसाई तें ऐकून अगदीं खूष झाले. उत्तरादाखल त्यांनीं छोटंस भाषण केलं. ते म्हणाले,—

व्यापारी मंडळाचे अध्यक्ष, मंडळांतील सभासद आणि सद्गृहस्थ हो, वास्तविक व्यापारवृद्धीसाठीं आमच्या हातून कसल्याच तऱ्हेचं कार्य घडलेलं नाहीं, असं असतां आपण आमचा जो हा गौरव केलात त्याबद्दल आम्ही आपले ऋणी आहोंत. व्यापार हा राष्ट्राचा प्राण आहे असं

आमचं मत आहे. [ या वेळीं केशवरावांनीं टाळ्या वाजवल्या.] व्यापाराशिवाय राष्ट्र म्हणजे रामाशिवाय रामायण होय. [ या वेळीं टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला. ] ..आपल्या व्यापाराचा उत्तरोत्तर उत्कर्ष होवो अशी हार्दिक इच्छा आम्ही प्रगट करतों.

तो समारंभ उरकल्यावर व्यापाऱ्यापैकीं कांहीं निवडक मंडळी, रावबहाद्दुर सरदेसाई, ..त्यांची मुलगी–चंचला, हरीभाऊ, प्रमोद इत्यादि मंडळी पार्टीकरतां—केशवरावांच्या घरीं आली........

‘ अॅट होम ’—पार्टीकरतां दिवाणखाना सजवून सुसज्ज करण्यांत आला होता. भरजरीच्या भारी किंमतीच्या गालिच्यांनीं खालची सगळी जमीन आच्छादली होती. मध्यें चांगली वीस माणसाची त्याच्यावर खाण्याची सोय होईल एवढं टेबल मांडलं होतं. त्याच्या दोन्हीकडच्या बाजूला नव्या करकरीत आठ–आठ फॅन्सी खुर्च्या मांडल्या होत्या. टेबलावर रेशमी पांढऱ्या रंगाचं जरीची नी लोकरीची वेलबुट्टी काढलेलं टेबलक्लॉथ पसरलं होतं. प्रत्येक दोन खुर्च्यांच्या मध्यें टेबलावर निरनिराळ्या सुंदर फुलांचे ढीग घातले होते, आणि खुर्च्यांसमोर काटे–चमचे असलेल्या डिसेस् ठेवल्या होत्या. त्या फुलांवर नी दिवाणखान्यांत सर्वभर अत्तरांचा फवारा सोडण्यात आला होता; त्याचा सुवास सगळीकडं दरवळत होता. खुर्च्यांना ज्याच्या त्याच्या नांवच्या चिठ्या अडकविणेंत आल्या होत्या. बसण्याची व्यवस्था अशी केली होती.—

प्रमोद केशवराव रावबहाद्दूर सरदेसाई एक बडे व्यापारी

——इतर——

प्रभाकर चंचला हरीभाऊ कात्रे कॉंट्रॅक्टर लल्लुभाई

खुर्च्यांना लावलेलीं लेबल्स न पाहतां आपण बसूं तिथं प्रमोद येऊन बसेल, म्हणून चंचला खुर्चीवर बसली नाहीं. दिवाणखान्यांतलं

एक कुलूप नसलेलं कपाट तिनं उघडलं. त्यांत पुस्तकं होतीं. त्यांतलं एक एक पुस्तक काढून तिनं तें उगीचच चाळायला सुरवात केली. दोनतीन वेळां तिच्या वडिलांनीं तिला खुर्चीवर येऊन बसण्याबद्दल खुणेनं इषारा दिला.—चंचलेनं मुद्दामच तिकडं लक्ष दिलं नाहीं.

तें पाहून केशवराव म्हणाले,—

' पाहातायत्, पाहूं दे कीं. संकोच बाळगायचं कारण नाहीं कांहीं. आपलंच घर आहे. अन् त्यांना कांहीं नवीन नाहीं. '

' आपली मुलं कुठं दिसत नाहींत—? '

—सरदेसाईनीं विचारलं.

' प्रभाकर येतोय आता. कपडे करतोय. अन् मुलगी—वनिता घरींच नाहींय् सकाळपासून. कुठं गेलीय कोणास ठाऊक. '—

—असं म्हणत केशवराव प्रभाकरला बोलावण्याकरतां त्याच्या खोलींत गेले. प्रभाकर दिवाणखान्यांत जाण्याच्या तयारीनें उभा होता. त्यानं हिरवा ब्लेझरचा कोट घातला होता. त्याला ते म्हणाले,—

' हा कशाला घातलायस कोट ? तुला शोभत नाहीं हा. उलनचा काळा कोट घाल. आटप लवकर. ' प्रभाकरनं आपल्या अंगांतला तो कोट काढून दुसरा कोट घातला अन् ते दोघंहि मग लागलीच दिवाणखान्यांत आले.

प्रमोदहि खुर्चीवर बसला नव्हता. चंचला बसतांच तिच्या जवळची खुर्ची आपण पटकवावी म्हणून तो तिथं दिवाणखान्यांत लावलेलीं निसर्गाचीं नी इतर मोठमोठीं फ्रेममध्यें बसवलेलीं चित्रं पाहात इकडून तिकडं फिरत होता. त्याचं तें वागणं सरदेसाईना पसंत पडलं नाहीं. ते वरचेवर त्याच्याकडं पाहात तिरस्कार व्यक्त करीत होते अन् हरीभाऊ मुद्दाम लक्ष देऊन तें पाहात होते. त्याच्या त्या वागण्याची त्यांनाहि चीड आली होती.

चंचलेचं प्रमोदच्या हालचालीकडं लक्ष होतं. प्रभाकर येतांच पाहुण्यांना अभिवादन करून आपल्या खुर्चीवर बसला. केशवरावहि आपल्या जागेवर बसले. दोनच खुर्च्या फक्त मोकळया होत्या. एक चंचलेची

अन् दुसरी प्रमोदची. प्रमोदनं तें पाहिलं. त्याचा त्याला खेद वाटला. आता आपण कुठंहि बसलों तरी चंचलेजवळ आपल्याला बसतां येणार नाहीं. तेव्हां निदान प्रभाकर आणि ती तरी एकत्र येऊं नयेत म्हणून तो चटकन् प्रभाकरजवळच्या खुर्चीवर जाऊन बसला. त्याला कुणी अडथळा केला नाहीं. चंचला रिकाम्या राहिलेल्या खुर्चीवर जाऊन बसली. त्यामुळं प्रभाकर आणि ती समोरासमोर आली. तेंहि प्रमोदला सहन झालं नाहीं. अन् त्यानं मग चुळबूळ सुरूं केली. कदाचित्—मिस्टर, तुम्ही इथं बसतां का,— असं तो प्रभाकरला म्हणायला कमी करणार नाहीं—अन् मग शोभा करून घेईल आपली चांगलीच; म्हणून त्याच्या पायाला आपल्या पायानं डिवचून त्यांनीं त्याचं आपल्याकडं लक्ष वेधून घेतलं नी—'उगीच गप्प बैस इथंच—!'—असा डोळे दापून त्यांनीं त्याला इषारा दिला.

नंतर थोड्याच वेळांत खाण्याच्या निरनिराळ्या पदार्थांनीं डिशेस् भरलीं गेलीं अन् पार्टीला सुरवात झाली.

सरदेसाई वरचेवर प्रभाकराकडे पाहात होते. अन् त्यांच्या मनावर प्रभाकरविषयीं होणारा परिणाम केशवराव बारकाईनं न्याहाळीत होते. तो अनुकूल होत आहे असं पाहून, त्यांना आनंद वाटत होता. हरीभाऊंचं त्या सगळ्याकडं लक्ष होतं. त्याचा त्यांना खेद वाटत होता.

'वनिता कशी नाहीं—?'

—चंचलेनं प्रभाकरला विचारलं.

'ओ सॉरी;—खरंच वनितताताई कुठं दिसत नाहींत हो मिस्टर!'

—प्रमोद प्रभाकरला उद्देशून लागलीच म्हणाला.

त्यावर प्रभाकरनं कायसं उत्तर दिलं पण तें कोणालाच ऐकायला आलं नाहीं; कारण खालीं सडकेवर दूरवर कसला तरी कोलाहल चालला होता. अन् तो जवळ जवळ येत होता. ही काय भानगड आहे, म्हणून सर्वजण खाणं थांबवून कान देऊन ऐकूं लागले. तों 'आम्हाला काम द्या.' 'आमचा न्याय करा—' अशा निरनिराळ्या घोषणा त्यांना ऐकायला येऊं लागल्या. ते आवाज जसजसे जवळ येत चालले तसतसं तें काय असावं हें जाणण्याची हरीभाऊ सोडून त्या सगळ्यांनाच उत्सु-

कता वाटूं लागली. खाणं तसंच टाकून थोड्याच वेळांत ते सगळे दिवाणखान्यांतून एक एक गच्चींत येऊन उभा राहिले. हरीभाऊ मात्र आपल्या जागेवरून हालले नाहींत. ते कसल्या तरी विचारांत मग्न होते. उजवीकडच्या रस्त्यावरून एक प्रचंड मिरवणूक येत होती. तींत पुरुष, बायका नी मुलं होती. मिरवणुकीच्या पुढं आघाडीवर वनिता होती. अगदीं सुरवातीला दोन्हींकडच्या बाजूला काठ्या लावलेल्या एक मोठा बोर्ड दोन इसमांनीं धरला होता. त्याच्यावर मोठ्या अक्षरांत लिहिलेलं होतं,—

'जन्मापासून आम्ही दारिद्र्याबरोबर लढतों आहोत. आम्हाला मदत करा !'

त्याच्या मागं थोड्या अंतरावर दुसरा एक बोर्ड होता तो स्त्रियांनीं धरलेला होता. त्याच्यावर लिहिलं होतं,—' आम्हाला काम मिळत नाहीं त्यामुळं आमची उपासमार होते आहे. '

एका सात आठ वर्षांच्या मुलाच्या हातांत एक काठी लावलेला एक लहानसा बोर्ड होता. त्याच्यावर 'जन्मापासून माझ्या अंगावर कपडा नाहीं '—अशीं अक्षरं होतीं. अन् सगळ्याच्या शेवटीं एक बोर्ड होता त्याच्यावर लिहिलेलं होतं,— ' आम्हाला मजुरी भरपूर मिळत नाहीं. '—

तें पाहून केशवराव थिजले.

कलेक्टरसाहेबाच्या मनावर त्याचा काय परिणाम होतोय कोणास ठाऊक, अशी यांना भीति वाटूं लागली. त्यांची कांहींतरी समजूत घालण्याकरतां म्हणून ते म्हणले,—

' हें कामन आमच्या मुलीचं—वनितेचं नव्हे बरं का. आकाश नी विराग या दोघांचीं कारस्थानं आहेत हीं. हिला ते पुढं करतात. '

' विराग माझ्या माहितीचा आहे पण आकाश कोण बुवा हा ?'

— कलेक्टरसाहेबांनीं विचारलं.

' त्याचाच एक स्नेही आहे. '—केशवराव म्हणाले.

' आमच्या चंचलेच्या माहितीचा दिसतोय तो वरचेवर त्याचं नांव घेत असते ती. '

केशवरावांना तें ऐकून थोडं हायसं वाटलं.

चंचलेला वनितेचा हेवा वाटला. आकाशला वश करण्याकरतां,—मजूर–कामगाराविषयीं त्याला प्रेम वाटतं अन् तो असल्या या चळवळी करतो म्हणून तर वनितेनं हें सगळं आरंभलं नसेल, असा एक विचार तिच्या मनांत आला अन् मग तिला वाटलं आपण हिच्यापेक्षांहि अधिक कार्य करून त्याला दाखवलं तर !......

प्रभाकर मात्र तें पाहून नाखूष झाला. त्याला दोन कारणं होतीं आपली धाकटी बहीण असून आपल्यापेक्षां तीच कर्तबगार निघाली, असं लोक म्हणायला लागतील. आपली ती बहीण म्हणून ओळखली जाण्याऐवजीं आपण तिचे भाऊ म्हणून ओळखलों जाऊं—हा कमीपणा आहे,—असं त्याला वाटलं,– हें एक आणि दुसरं म्हणजे—चंचलेचं नी आपलं लग्न जमावं असं त्यालाहि वाटत होतं·त्याला बाध येईल·अशी त्याला भीति वाटली हें होय. हरीभाऊ गच्चीकडं वरचेवर मागं वळून पाहात खुनशीपणानं हसत होते—अन् त्यांचे चिरंजीव तिथं गाणं गुणगुणत होते,—

" प्रेम कोणीहि करेना कां अशी फिर्याऽद खोऽऽटी "

× × ×

रात्रीं कलेक्टरसाहेबांनीं चंचलेला विचारलं,— ' तुझं काय मत आहे मग ! मला तरी हें स्थळ पसंत आहे. मुलगा कांहीं वाईट नाहीं· तुझ्या थोड्या फार परिचयाचा आहे. मैत्रिणीचाच भाऊ आहे तुझ्या तो. शिकलेला आहे साधारण. याच्यापेक्षांहि चांगली स्थळं मिळतील आपल्याला पण स्थळ चांगलं वाईट पाहाण्यापेक्षां तुला अधिक सुख कुठं लाभेल तें पाहायला हवं. अन् या दृष्टीनं विचार केल्यास हें स्थळ मला बरं वाटतं. कलेक्टरची मुलगी आपल्या मुलाला मिळाली याचं मुलाच्या बापाला कौतुक वाटेल. तो तुझ्याशीं प्रेमानं वागेल. मुलालाहि अभिमान वाटेल. पैसा आणि मोठेपणा यांत खरं सुख असत नाहीं. सुख मनाच्या समाधानांत असतं. मनाला समाधान लाभायला सर्व गोष्टी माणसाच्या इच्छेप्रमाणं घडून याव्या लागतात. तुझ्या सगळ्या इच्छा तिथं पुरवल्या जातील. कारण कलेक्टरची मुलगी म्हणून त्यांना तुझ्याविषयीं आदर वाटेल. एखादं

चांगलं बडं स्थळ आपल्याला नक्की मिळूं शकेल. पण त्यानं आपल्याला बडं समजायचं अन् आपणहि आपल्याला तसंच समजायचं—असं व्हायचं अन् मग विरोध उत्पन्न होऊं लागायचे. त्यापेक्षां आपणाहून कमी प्रतीचं स्थळ आपण पाहिलं तर असं व्हायचं नाहीं. माझा आग्रह नाहीं. तुझं तूं नीट विचार करून सांग मला काय तें. बरं, घाईहि नाहीं.—त्याची इतकी. मी आपलं माझं मत तुला सांगितलं. तुझ्या त्या मैत्रिणींचाच एक प्रश्न आहे. ती असल्या या चळवळी करते आहे. त्याचा अपवाद यायचा संभव आहे. पण मला वाटतं आमचा हा बेत तिला कळला तर भावाच्या हिताकरितां ती हें सगळं सोडून देईल.—मग काय—!'

'मी म्हणतें, माझ्या लग्नासंबंधीं आपण इतक्यांत विचारच करूं नये.'

—चंचाला म्हणाली. नी ती मग तेथून उठून आपल्या खोलींत यायला निघाली.

'माझी मुळींच घाई नाहीं काय करायचं तें तूंच नीट विचार करून ठरव. मला आतां कशाचंच कांहीं महत्व वाटत नाहीं. अधिकार, पैसा, मानमरातब—यांत मला सुख लाभत नाहीं. एकाच गोष्टींत माझं सुख आतां उरलेलं आहे अन् ती म्हणजे तूं. तुला जास्तींत जास्त सुखी झालेली पाहाण्यांत मला सुख वाटेल.'

चंचला आपल्या खोलींत आली नी टेबलावरचा वृत्तपत्राचा एक अंक उचलून घेऊन तो वाचत ती कॉटवर पडली. पहिल्याच पानावर जाड अक्षरांत एक बातमी होती. तिकडं तिचं लक्ष प्रथम वेधलं गेलं. ती बातमी अशी होती,—

### सारंगपूरचा संप यशस्वी झाला :—

सारंगपूर:—येथील हमाल नी गाडीवान यांनीं आपणास मिळते आहे त्याच्या कमींत कमी दीडपट हमाली नी गाडीभाडं मिळावं म्हणून संप पुकारला. होता तो हाणून पाडण्याकरतां व्यापाऱ्यांनीं शिकस्तीचे प्रयत्न केले, पण त्यांना यश आलं नाहीं.

शेवटीं त्यांना त्यांच्या मागण्या मान्य कराव्या लागल्या. हा संप

यशस्वी होण्यास मात्र आकाश कुलकर्णी नी कु. वनिता देशमूख यांचे प्रयत्नच सर्वस्वी कारणीभूत आहेत.

ती बातमी वाचून चंचलेला वनितेचा फारच हेवा वाटूं लागला. आकाशला ती आता खात्रीनं वश करून घेणार— याचा तितकाच तिला खेदहि वाटला. अन् तिच्या मनांत मग विचार घोळूं लागले,—‘ तिच्या-पेक्षाहि आकाशला आपण अधिक प्रिय होऊं असं आपल्याला कांहीं करतां येणार नाहीं का ? पण या आठ दहा दिवसांत तर आपण नुसतं त्याला भेटलों सुद्धां नाहींत. आतां अगोदर त्याला तो असेल तिथं उद्यांच्या उद्यां भेटावं अन् त्याला सांगावं आपणहि आता मजूर-कामगारांच्या चळवळीला वाहून घेणार आहोत म्हणून. पाहूंया त्याच्या मनावर याचा काय परिणाम होतोय तो तरी एकदा. आणि मग आपल्याविषयीं त्याला अधिक प्रेम वाटण्याकरतां काय करावं तें नंतर ठरवूंया. त्याची सायकल आहेच आपल्याजवळ अजून. तिच्यावरूनच उद्यां आपण त्याच्याकडं जावं म्हणजे आपल्यालाहि श्रम घ्यायची चांगली संवय आहे हें.त्याच्या निदर्शनाला येईल नी त्याचा त्याच्या मनावर अनुकूल परिणाम होईल. उद्या अगोदर वनितेला भेटून त्याचा तिथला पत्ता तिला विचा-रावा, अन् त्याला आतां ‘ तूं ’ म्हणायचं नाहीं-‘ तुम्ही ’—‘आपण. ’— त्याच्याकडं जायचंच उद्यां. ’

—असे तिचे विचार चालले होते. इतक्यांत आपल्या खोलीच्या दारावर कोणतरी टोकत असल्याचं तिला ऐकायला आलं. तिनं विचारलं “ कोण ? ”

“ मी प्रमोद ! ”

“ अं. या वेळचं आलांत ? ”

—चंचला उठून दार उघडत म्हणाली.

“ आमंत्रण द्यायला आलों तुम्हाला. ”

“ कसलं ? ”

“ उद्यां चहाला यायचं आमच्याकडं. ” प्रभाकर नी वनिता यांनाहि सांगितलंय्. उद्यां मात्र आतां मी तुमच्या कांहीं सबबी ऐकणार

नाहीं हं. "तुफानी तरुणी" मध्यें हिरॉईनचं काम केलेल्या नटी मिस् जंब्रिया याहि येणार आहेत त्यांच्या बरोबरच. 'सिरियस् प्रॉडक्शन' चे डयरेक्टर गब्रू अन् आपल्या इथले मोटारचे कारखानदार टी दौलतराव हेहि येणार आहेत. ते आपल्या आगामी 'अंधारी दुनिया' च्या शुटिंगकरतां इथं आले आहेत. त्यांनाहि मुद्दाम भेटून मी आमंत्रण देऊन आलोंय. चारला यायचं बरोबर. गाडी पाठवून देईन मी आपली. नाहींतर मीच येईन. मग काय याल ना?"

"केव्हां—उद्यां दुपारीं चारला ना? येईन."

"अगदीं नक्की?"

"नक्की!"

"ठीक आहे—नमस्ते!"

"नमस्ते"

प्रमोद लागलीच निघून गेला.

चंचलेला त्याचा अचंबा वाटला. मिस् जंब्रियेनं त्याच्यावर विलक्षण मोहिनी घातली होती, याची तिला काय कल्पना असणार?—

---

# प्रकरण ८ वें



‘ —कलेक्टरसारखा मोठ्या हुद्याचा माणूस घरांत मेजवानीला आलेला, इतके लोक जमलेले, अन् तूं आपली मिरवणूक घेऊन निघालीस नेमकी त्याच वेळेला अन् अगदीं आपल्या घरासमोरच्या रस्त्यावरनं. तुला दुसरी वेळ नव्हती ? दुसरा रस्ता नव्हता ? अन् सांगितला होता कुणी तुला हा उपद्व्याप करायला आधीं ?– काय वाटलं असेल त्यांना ?– मला तर असं झालं कीं कुठनं झक मारली अन् आमंत्रण द्यायची मला बुद्धि झाली त्यांना.—’

—केशवराव आपल्या टाळूवरून हात फिरवत, वनितेला उद्देशून म्हणाले.

वनितेला कसलं तरी पुस्तक हवं होतं म्हणून ती तें दिवाणखान्यांतलं पुस्तकाचं कपाट उघडून त्यांतली पुस्तकं चाळत उभी होती. ती मध्र्येच थांबून म्हणाली,

‘ माझ्यापासून तुम्हाला आतां त्रास होऊं लागला आहे, अन् तो होणार—दिवसेंदिवस तो अधिकाधिक होत जाणार, हें मी जाणतें. तो होऊं नये अशी माझीहि इच्छा आहे पण त्याच्याकरतां मला माझीं मतं तरी बदललीं पाहिजेत नाहींतर घर तरी सोडलं पाहिजे. माझीं मतं बदलणं शक्य नाहीं. घरच सोडतें म्हणजे झालं मी.’

केशवरावांच्या मनावर तिच्या त्या बोलण्याचा विलक्षण परिणाम झाला. ते लागलीच समजुतीच्या स्वरांत म्हणाले,—

'तसं मी म्हणत नाहीं. मी तुला कधी विरोध केलाय का?—पण तूंच सांग बरं त्यांना आपल्या घरीं बोलावलेलं असतांना असं आपल्या-हातून कांहीं घडणं चांगलं कां?—आपल्या प्रभाकरला ते आपली मुलगी देण्याच्या विचारांत होते.

प्रभाकरविषयीं त्यांच्या मनावर परिणामही काळ चांगला झाला होता. वरचेवर ते त्याच्याकडं पाहात होते. अन् खूष दिसत होते. नंतर तुझी मिरवणूक पाहून काय वाटलं असेल त्यांना. तूंच विचार कर. एकुलती एक मुलगी आहे त्यांची ती. हें लग्न जर जमून आलं असतं तर प्रभाकरच्या जन्माचं कल्याण झालं असतं. तुझा भाऊच आहे प्रभाकर-तुला त्यांत आनंद वाटायला हवा होता. निदान त्याच्याकरतां तरी तूं हें करायला नको होतंस. मग यांत एवढं वावगं काय बोललों मी, म्हणून तुला राग आला अन् तूं म्हणालीस—मी घरच सोडतें–म्हणून?—तूं घर सोडलंस तर मग आम्ही तरी कशाला घरांत राहायचंय? आम्हीही तुझ्या मागोमाग येऊं. मला तूं हवीस. प्रभाकर हवा. नाहींतर आजपर्यंत कशाला व्याप केले असते मी एवढे, अन् काल तरी त्या पार्टी देण्याच्या फंदांत पडलों असतों. काल मी ती पार्टी दिली ती कलेक्टरकरतां अगर आणि कुणाकरतां नसून—वने, तुमच्याकरतां. अशा पार्ट्या मी यापूर्वी कुणाला तरी दिलेल्या तुला आठवतात?— घर सोडतें—हे शब्द आतां तूं पुन्हां उच्चारूं नकोस·—नव्हे मनांत असा विचार सुद्धां आणूं नकोस. तुझ्या या शब्दांचा माझ्या मनावर काय परिणाम झाला असेल? याची तुला कल्पना करतां यायची नाहीं.—आतड्याची माया कांहीं वेगळी असते!'

'पण मी घरांत राहून तुम्हाला असा त्रास झाला तर?'

—एक पुस्तक घेऊन कपाट लावीत वनिता म्हणाली.

इतक्यांत दादासाहेब चारोळे तिथं आले. त्यांच्याकडं तिरस्कारानं पाहात केशवराव त्रासिकपणें म्हणाले,—

"कां आलांत?"

" परवाच्याच कामाकरतां. आपण सांगितलं होतंत अकारा तारखे-नंतर भेटा म्हणून."

" पण कांहीं उपयोग नाहीं हो. पैसाच नाहीं शिल्लक. धंदा केलाय बघूंया आतां काय काय होतंय तें. पैसे मिळाले तर तुम्हाला खात्रीनं देतों. नाहीं तर माझा नाइलाज आहे."

" तसं करूं नका—मला फार आशा होती—"

" अन् माझीहि इच्छा होती पण करायचं काय ?—पैसा नको ?"

" कांहींहि करा, माझ्या अगदी नरडीला आलंय. या महिनाअखेर दस्ताची मुदत संपतीय. त्याच्या आंत पैशाची तजविज झाली नाहीं तर दावा दाखल होईल माझ्यावर. अन् एकदांचा दावा दाखल झाला कीं संपलंच आमचं !—"

" पण मी तरी काय करूं सांगा माझा अगदीं नाइलाज आहे. मध्येंच भाव आला तर मी सौदा विकून टाकणार आहे, पण तशी काय लक्षणं दिसत नाहींत; उलट खालीं खालींच येत चाललाय भाव."

त्यांचं आणी बराच वेळ तें बोलणं चाललं होतं. शेवटीं केशवरावनीं त्यांना अगदीं स्पष्ट शब्दांत नकार दिला.

चारोळयांची अत्यंत निराशा झाली. ते मग मोठ्या खेदानं तेथून बाहेर पडले.

'हीं आपलीं मतंच कां तूं सोडून देत नाहींस ? कशाला करतेस या चळवळी– नाहीं ते उपद्व्याप !'

'मग काय करूं ?'

'कांहीं करूं नकोस. स्वस्थ बैस घरांत. शीक हवं तर आणी,—शिकायचं असलं तर.'

'असं कां ?'

'तुझ्याच कल्याणाकरतां—सुखाकरतां !'

'पण मला या चळवळींतच खरं सुख नी माझं कल्याण आहे असं वाटत असेल तर ?'

‘ तर मग माझी कांहीं हरकत नाहीं त्याला. मात्र तूं आपलं घर सोडूं नकोस ! ’

वनिता तें पुस्तक घेऊन खालीं आपल्या खोलीकडं जायला निघाली. वनिता खालीं आपल्या खोलींत गेली तों—चंचला तिथं तिची वाट पाहात बसली होती. तिला पाहून तिनं तिला आश्चर्यानं विचारलं,—

‘ अं,–तूं केव्हां आलीस ? ’

‘ आत्ता हेंच ! ’

‘ कांहीं विशेष ? ’

‘ कांहीं नाहीं. आकाशचा पत्ता हवाय ग मला. त्याला मी भेटायला जाणार आहे. ’

‘ उद्देश ? ’

‘ कांहीं नाहीं. सहज सायकल आहे त्याचीं माझ्याकडं, आज दहा बारा दिवस झाले, ती परत करायचीय. शिवाय त्याची आई वारल्यापासून मी त्याला भेटले नाहीं. —आहे—का पत्ता तुझ्याकडं ? ’

‘ आहे. अग, पण ती सायकल माझीच असेल ग. तुझ्याकडं केव्हां आला होता तो ? ’

‘ मला वाटतं, त्याची आई वारली त्याच्या दुसऱ्या दिवशीं सारंग-पूरला जाण्यापूर्वी. ’

–आकाशची नी आपली विशेष मैत्री आहे अशी तिची–वनितेची कल्पना करून देऊन त्यामुळं त्यांचं प्रेम जमत चाललं असल्यास त्यांत वितुष्ट यावं या हेतूनं चंचलेनं मुद्दामच तसं खोटं सांगितलं.

‘ सायकल माझी असली तर मलाच देऊन टाक कीं मग ? ’

—वनिता टेबलाचं ड्रावर उघडत म्हणाली.

‘ त्याला विचारून उद्यां देईन तुला मग ? त्याचं पत्र आलंय मला सायकल तेवढी पाठव म्हणून. ’

चंचलेनं आणखी एक थाप मारली.

‘ थांब कीं जरा मग, मी त्याला एक पत्र लिहून देणार आहे. हा बघ पत्ता. ’

ड्रावरमधून एक पत्र काढून तें चंचलेच्या हातीं देत वनिता म्हणाली,— " वाच ना, आमचीं पत्रं गुप्त नसतात. " अन् ती मग पत्र लिहायला बसली. त्याला खुलासेवार विस्तृत पत्र लिहायचं तिनं ठरविलं होतं. पण चंचलेच्या या बोलण्यावरून तिचं मन थोडसं साशंक झालं. अन् तिनं मग अगदीं त्रोटक पत्र लिहिलं,—

प्रिय आकाश,

तुमचं पत्र मला रोहिणी येथें विरागच्या घरीं मिळालं. त्याच दिवशीं विराग घरच्या सगळ्या मंडळीसह तिथं राहायला आला होता. रोहिणी हें त्यांचं गांव आहे. इथल्या हमालांची संघटना लवकर होईल असं वाटतं. एक दोन दिवसांत काय तें कळवीत आहे. विराग लवकरच पुन्हां चंदापूरला परत येणार आहे. इथल्या हमालाची संघटना करून त्यांची हमाली वाढेल असं करत आहोंत. विरागचीहि संमति आहे.

तुमची

ता. क:— वनिता

यशवंता नी मंजुळा यांना माझा नमस्कार सांगावा.

नंतर त्या पत्राची घडी करून ती चंचलेच्या हातीं देत ती म्हणाली,–

एवढं पत्र त्याला दे, अन् म्हणावं मी एकदोन दिवसांत तिकडं येईन. नाहीं तर पत्रानं कळवीन सगळी हकिगत. पत्ता बघून ठेवलास कां?—लिहून घ्यायला नको. तिथं नकट्या मारुतीजवळ गेलीस, अन् कोणालाहि विचारलंस तर तुला ते यशवंताचं घर दाखवतील. आकाश कुठं असतात म्हणून विचार म्हणजे झालं नुसतं!'

तें पत्र घेऊन चंचला निघून गेली.

वनिता मग आपल्याशीं म्हणाली,–' असं करणं आकाशला शोभत नाहीं. आमचा बहुजन समाज दारिद्र्याच्या किडीनं बुजबुजला आहे. त्याची त्यांतून मुक्तता करण्याचं केवढं कार्य आम्हाला करायचं आहे. बहुजन समाजाच्या उद्धाराकरतां झटणाऱ्या आम्हा आघाडीवरच्या तरुणाचं जीवन त्यागी हवं–भोगी–विलासी नको. प्रेम करायचं तें दारिद्र्यानं गांजलेल्या दलित वर्गावर करावं. त्या प्रेमाकरतां—त्यांच्या कल्याणाकरतां

पडेल त्या त्यागाची किंमत द्यायला आम्ही सिद्ध झालं पाहिजे. म्हणजे आकाशला या वर्गाविषयीं जिव्हाळा वाटत नाहीं, असं मला म्हणायचं नाहीं. त्याला तळमळ वाटते, जिव्हाळा वाटतो, पण तो आत्यंतिक वाटायला हवा !--तसा तो त्याला वाटत नाहीं—नसावा; कारण तसं असतं तर चंचलेच्या श्रीमंतीचा अगर तिच्या सौंदर्याचा मोह त्याला पडला नसता. अन् तो पडला आहे हें खास. नाहींतर तिला भेटायची अगर तिला पत्र लिहायची त्याला काय गरज होती?—बरं तिचा त्याचा स्नेह जमला आहे, असं म्हणावं तर तेंहि शक्य नाहीं. विचार जमल्याशिवाय स्नेह जमत नसतो. त्या दोघांच्या विचारांत जमिनअस्मानाचं अंतर आहे. असं असतां तो तिच्याशीं असं वागतो, याचं कारण त्याची वृत्ति सर्वस्वी त्यागी नसावी. चंचलेवरहि त्याच्या या वागण्याचा बराच परिणाम झालेला दिसतो आहे. शेवटीं तिच्याकरतां त्याला आपल्या या कार्याचा विसर न पडो म्हणजे झालं. विराग असं कांहीं करणार नाहीं.—'

वास्तविक तिचा—वनितेचा—हा आकाशविषयीं गैरसमज झाला होता. अन् तसा तो होणं सहाजिक होतं. कारण एक एक वेळेला कारण नसतांना एकमेकाविषयीं गैरसमज उत्पन्न होतात अन् तिच्या बाबतींत तर तसंच कारण घडून आलं होतं.

सकाळची आठ-सव्वा आठची वेळ होती ती. चंचला तें पत्र घेऊन आपल्या मोटारींतून बंगल्यावर परत आली नी लागलीच मग सायकलवरून सारंगपूरला जायला निघाली. कलेक्टरसाहेब-रावबहाद्दूर सरदेसाई सरकारी कामाकरितां त्याच दिवशीं पहाटे बाहेरगांवीं गेले होते. दोन दिवस त्यांचा तिकडं मुक्काम होता.—

सायकलवरून जात असतांना चंचलेच्या मनांत विचार घोळत होते,—

'वनितेला आपण मुद्दाम तसं सांगितलं, तें फार बरं झालं. त्यांच्यांत आतां नक्की वितुष्ट उत्पन्न होईल. अन् आतां आपण गेलोंत नी आकाशला —आपण मजूरकामगारांच्या चळवळीला वाहून घेणार आहोंत, असं सांगितलं म्हणजे त्याला खात्रीनं आपल्याविषयीं प्रेम वाटूं लागेल. तसं

दिसलं तर या चळवळींत पडायचं अन् त्याचं प्रेम संपादन करायचं. आकाश फार विचित्र आहे पण मींहि त्याच्यापेक्षां विचित्र आहे म्हणावं त्याला. बाबा माझ्याकरतां आपली नोकरी सोडतील अन् काय करायचं आहे नोकरी तरी करून त्यांना आतां. आकाश मी तुझी होणार-छे तुला मी माझा करणार.'

आपण दहा मैल सायकलवरून अगदीं सहज जाऊं, अशा जोमानं ती निघाली होती पण चारपांच मैल जातांच ती दमली. तिच्या अंगाला घाम फुटूं लागला. पिंढऱ्याचे गोळे दुखूं लागले अन् तशांत सायकलच्या मागच्या चाकांतली हवा कमी झाली होती. खालीं उतरून तिनं मागचं चाक दाबून पाहिल. त्यातली बरीचशी हवा गेली होती. काय करावं हा तिला प्रश्न पडला. सायकल हातांत धरून पांच मैल चालत जाणं आपल्याला शक्य होणार नाहीं, असं तिला वाटलं. सायकलबरोबर पंप नव्हता. बरं, परत जावं म्हटलं तरी पांच मैल चालत जायला हवं होतं. तेंहि शक्य नव्हतं. इतक्यांत मागून भाड्याची एक मोटार आली. तींतून तिनं जायचं ठरवलं. हातानं खूण करून तिनं मोटार उभी केली. सायकल वर टाकायला सांगून ती आंत बसली.

सारंगपूरला मोटारस्टँडवर ती मोटार उभा राहतांच तींतून खालीं उतरून तिनं आपली सायकल मागितली. त्यावेळीं ड्रायव्हरच्या कानांत कोणतरी एकजण सांगत होता,-'लेका, कलेक्टरसाहेबाची मुलगी आहे ही-पैज.'

तें ऐकून ड्रायव्हर चंचलेजवळ आला नी तिला आदबीनं लवून सलाम करीत म्हणाला,—

' साहेब, कुठं जायचंय आपल्याला ? गाडी घेऊन पोचवायला येतों मी. '

' नको. '

—क्लीनरनं काढून दिलेली सायकल—त्याच्या जवळून घेत चंचला म्हणाली.

मागच्या चाकांतली सगळीच हवा गेली होती तें पाहून ड्रायव्हर म्हणाला,—

' साहेब, हवा नाहीं मागच्या चाकांत. ' अन् मग त्यानं आपल्या क्लीनरला हुकूम सोडला,—

' इसूब, पंप आण जरा. लौकर आण. '

इसूबनं पंप आणला. ड्रायव्हरनं हवा भरली.

चंचलेनं त्याला विचारलं,—' नकट्या मारुती कुणीकडं आहे ? '

तो ड्रायव्हर समोरच्या रस्त्याकडं बोट करीत म्हणाला,—' या सडकेनं नीट सरळ जायचं नेमका तिथंच जातो रस्ता हा. '

चंचला सायकलवरून तिकडं जायला निघाली. पण तिथून थोड्या अंतरावर तिची नी आकाशची वाटेतच गाठ पडली.

' नमस्ते. कुठं निघालांत ? '

—असं सायकलवरून खालीं उतरत चंचलेनं त्याला विचारलं.

' नमस्ते. मी खेड्यायला निघालोय एका. तुम्ही कुणीकडं पण इकडं ?'

' आपल्याकडंच आलें आहे ! '

' असं ?—का बुवा ? '

' एरवीच. थांबायला वेळ आहे ना पण आपल्याला ? '

' हो. मी आणि थोड्या वेळानं जाईन. चला कीं आमच्या यशवंताच्या घरीं बसूं या थोडा वेळ. पण तिथं जमीनीवर बसावं लागेल. —अन् घर म्हणजे अंधारी झोपडी आहे ती एक...'

' मला आवडेल. या लोकांच्या जीवनाशीं समरस व्हावं असं मला नेहमीं वाटतं '—चंचला मुद्दाम म्हणाली.

त्यावेळीं आकाशनं अशा कांहीं दृष्टीनं तिच्याकडं पाहिलं कीं जणुं काय त्याला म्हणायचं होतं,—

' तुम्ही हें साफ खोट बोलतां आहां ! '

चंचलेला तो भाव अजमावतां आला नाहीं. तिला उलट वाटलं, ' तो आपल्याकडं आदरानं पाहातो आहे. '

—चंचलेला घेऊन यशवंताच्या घराकडं जाण्याकरतां आकाश मागं वळला अन् ती दोघं मग तिकडं जायला निघाली. इतक्यांत समोरून

एक टूरिंग आली अन् ती त्यांच्याजवळ येऊन थांबली. तींत हरीभाऊ होते. चंचलेला पाहून त्यांनीं आपल्या ड्रायव्हरला ती थांबवण्याबद्दल सांगितलं होतं.

'अं, इकडं कुठं ?'

—हरिभाऊंनीं चंचलेला बोलावून विचारलं.

'कुठं नाहीं. सहज आलें होतें.'

—चंचला त्यांच्याकडं पाहून गालांतल्या गालांत हसत म्हणाली.

'अच्छा, ठीक आहे. यायचं असेल तर चल, गाडी आहे आपली.'

'नाहीं; मला अवकाश आहे थोडा.'

गाडी सुरू करण्याबद्दल हरिभाऊंनीं ड्रायव्हरला खूण केली नी ती सुरू झाल्यावर त्यांनीं त्याला विचारलं,—

'कोण रे तो तिच्या बरोबर आहे तो ?'

'आकाश कुलकर्णी म्हणून आपल्या चंदापूरचेच आहेत ते. मधें इथं संप झाला नव्हता कां हमाल गाडीवानांचा तो यांनींच घडवून आणला होता. गोरगरिबांशीं फार प्रेमानं वागतात ते !'—उजव्या हातानें स्टेअरिंग करीत, डाव्या हातांतील आपल्या घड्याळाकडे पाहात, तो ड्रायव्हर म्हणाला.

यशवंताचं घर तेथून जवळच होतं. थोड्याच वेळांत आकाश नी चंचला तिथं पोचली. तिथं गेल्यावर आकाशनं तिला विचारलं,—

'सायकलवरून आलांत ?'

'हो. तुमचीच सायकल आहे ही, त्या दिवशीं माझ्याकडं तशीच राहिलेली. त्या दिवशींचा सायकल पाठवून देण्याबद्दल तुमचा निरोप मला पोचला त्याप्रमाणं मी ती लागलीच पाठवून दिली होती पण तुमची गांठ पडूं शकली नाहीं. शिपाईलोक फार निष्काळजी असतात. तरी मी त्याला बजावून सांगितलं होतं आणि,—ताबडतोब जा, त्यांची खोटी होईल म्हणून—'

—चंचलेनं थाप मारली.

'विसरलोंच मी तुम्हाला कळवायला. ती सायकल वनितातार्इंची आहे, त्यांच्याकडंच पाठवून द्या ती, असं नंतर मी तुम्हाला कळवणार

होतो. अन् त्यांनाहि सांगायला विसरलों त्यांची सायकल तुमच्याकडं आहे म्हणून.’

‘ विसरलं असेल, त्याचं काय एवढं !’

‘ अहो, पण त्या कांहींतरी गैरसमज करून घ्यायच्या.’

‘ हो. असं मात्र एखाद्या वेळेला व्हायचं. तिचा स्वभाव फार चमत्कारिक आहे.’

‘ छे, तसं कांहीं नाहीं. गैरसमज म्हणजे—आपली सायकल अजून आपल्याला कां मिळाली नाहीं ? ती मला हवी असेल म्हणून, कीं ती आणि कुणी नेली असेल ?—असला कांहींतरी गैरसमज या अर्थानं मी तो शब्द वापरला.’

‘ बरोबर आहे तुमचं, तसंहि वाटण्याचा तिला संभव आहे.’

‘ तें असो. तुमच्या आगमनाचा हेतु कळला नाहीं मला—!’

‘ हेतु कसला आलाय त्यांत. सायकल द्यायची होती तुमची. शिवाय तुमची गांठ पडूनहि बरेच दिवस झाले होते. तेव्हां म्हटलं जाऊन तरी यावं एकदां अन् म्हणून आलें. आई गेल्या त्यानंतर आजारी होतें मी पांचसात दिवस. दोनतीन दिवस झाले मला बरं वाटायला लागून. आपल्या मनावर परिणाम झाला असेल फार आईच्या निधनाचा ?—’

‘ तसा कांहीं विशेष झाला नाहीं. तिच्या मरणापूर्वीच ती मेली होती. तिच्या निधनाच्या दुःखापेक्षांहि ती दारिद्र्याशीं झगडत असतांना तिला भोगाव्या लागणाऱ्या यातना पाहून मला अधिक दुःख होत होतं.’

‘ खरंच हें सगळं दारिद्र्य जगांतून सर्वस्वी नाहींसं झालं तर फार बरं होईल नाहीं ?—अलीकडं तर माझ्या मनांत सारखे हेच विचार घोळूं लागले आहेत. मजूरकामगारांच्या चळवळीला मी सर्वस्वी वाहून घ्यायचं ठरविलं आहे.’

‘ म्हणजे !’—तिच्या चर्येवरील भाव नीट काळजीपूर्वक अजमावीत आकाश आश्चर्यानें उद्गारला.

‘ हा वर्ग सुखी झाल्याशिवाय कोणालाहि सुखी होतां यायचं नाहीं.’

आपल्या भुवया चढवीत चंचला गंभीरपणें म्हणाली. तिच्या त्या अभिनयांत कृत्रिमता होती. आकाशनं तें तेव्हांच ताडलं. तो मग मुद्दाम म्हणाला,—

‘ या चळवळींना वाहून घेण्यापेक्षां तुम्ही लेडीजकरितां एखादा टेनिसक्लब अगर असलीच एखादी दुसरी संस्था काढावीत. गरिबांच्या-दलितवर्गाच्या उद्धारापेक्षां हें कार्य तुमच्याहातून चांगलं घडेल. ’

आकाशच्या या बोलण्यानं चंचला चिडली. ती संतापून म्हणाली,—

‘ कां गरिबांच्या उद्धाराचे मक्ते घेतलेत तुम्हीच काय तेवढे ? ’

‘ माझ्या म्हणण्याचा अर्थ तसा नाहीं. दलितवर्गाविषयीं जिव्हाळा वाटत असल्याशिवाय त्यांच्या उद्धाराचं खरं कार्य कुणाच्याहि हातून घडणार नाहीं. अन् त्याच्याविषयीं जिव्हाळा वाटतो तो प्रत्यक्ष त्या परिस्थितीनं पिडलेल्याना किंवा त्यांच्या जीवनाशीं......सहृदयतेनं समरस होणाऱ्यांनाच. शिवाय नुसताच जिव्हाळा वाटूनहि उपयोग नाहीं. जिव्हाळ्यानं—नुसत्या प्रेमानं रोग बरे होत नसतात.—अगदीं आईचं प्रेमसुद्धां उपयोगी पडायचं नाहीं त्याला. निरनिराळ्या रोगांनीं ग्रासलेल्या मनुष्यासारखी आमच्या दलितवर्गाची स्थिति झाली आहे. म्हणून त्यांतून त्याची मुक्तता करण्याकरतां काय करायला हवं याचं ज्ञानहि हें कार्य करूं इच्छिणारांनीं अभ्यासानं मिळविलेलं असलं पाहिजे. म्हणजे या वर्गाच्या उद्धाराकरतां भांडवलशाहीबरोबर झुंजणारे—लढणारे आघाडीवरील तरुण तरुणी, या वर्गाविषयीं जिव्हाळा वाटत असलेलीं, प्रेमळ नी ज्ञानी हवींत. तुम्ही या कसोटीला कितपत उतराल ? ’

‘—खरंच मला या लोकांच्याविषयीं जिव्हाळा वाटतो. मला हें कार्य करायची फार इच्छा आहे. तुम्ही सांगाल तसा मी अभ्यास करायला तयार आहे. ’—चंचला शांतपणें म्हणाली.

‘ पण तुमच्या वडलांना तें मुळींच रुचायचं नाहीं. तुम्ही असं कांहीं करायला लागलात तर नोकरीला मुकावं लागेल त्यांना आपल्या. ’

‘ पण माझ्याकरतां ते नोकरी सोडायला आनंदानं तयार होतील. ’

'तुम्ही मग अगोदर समाजसत्तावादावरचीं पुस्तकं वाचून काढा. वनितातांईकडं तुम्हाला मिळतील तीं.—म्हणजे हें कार्य कसं करावं याची तुम्हाला कल्पना येईल. तुमच्याहातून हें कार्य घडलं तर मला आनंद वाटेल.'

त्यानंतर आणि बराच वेळ तीं दोघं बोलत बसलीं होतीं.

शेवटीं आकाश तिला म्हणाला,—

'मला जायला हवं आता एका खेड्याला.'

'बरं मग मीहि जातें. मग सायकलचं काय करायचं ? वनितेला परत देऊं कीं—'

'ठेवून जावा इथंच अन् त्यांना सांगा—मी ठेऊन घेतलीय म्हणून......अन् म्हणावं तुम्हाला जरूर असेल तर मला कळवा, म्हणजे मी ताबडतोब पाठवून देतों कोणाबरोबर तरी.'

'ठीक आहे. हो, पण मी विसरलेच कीं वनितेनं एक पत्र दिलंय तुमच्याकरतां—' आपल्या जवळचं—तें पत्र काढून त्याच्या हातीं देत चंचला म्हणाली.

आकाशनं ते पत्र उघडून वाचलं, तो फक्त म्हणाला,—'ठीक आहे. असूं दे !'

मोटारींतून परत येतांना चंचला आनंदांत होती. तिला आकाशच्या त्या वाक्याची वरचेवर आठवण होत होती—'तुमच्याहातून हें कार्य घडलं तर मला आनंद वाटेल'—अन् ती मग मनाशीं म्हणत होती,—आकाशला आपण आतां खात्रीनं वश करून घेऊं.

× × ×

त्याच वेळीं केशवरावांच्या माडीवर प्रभाकर नी केशवराव यांची गुप्तपणें चर्चा चालली होती,—प्रभाकर म्हणत होता,—'त्या आकाश-चाच बंदोबस्त करायला पाहिजे कांहींतरी, म्हणजे मग ही आपोआप ताळ्यावर येईल. तो विराग कांहीं आतां इथं नाहीं. तो गेलाय म्हणें आपल्या गांवीं राहायला लेले म्हणत होते सकाळीं. आकाशची तेवढी व्यवस्था केली म्हणजे बरं !'

' मीहि तसंच करावं म्हणतोय. रावबहाद्दुर सरदेसाई यांच्या कानावर घालावं अन् त्यांना सांगावं, करतां आलं तर पाहा तुम्हाला कांहीं–म्हणून '—केशवराव म्हणाले.

' कांहीं हरकत नाहीं. त्यांनीं मनांत आणलं तर त्याला नेस्तनाबूद करून टाकतील ते. '

त्यांची ती चर्चा चालली होती इतक्यांत तिथले कांहीं व्यापारी केशवरावांच्याकडं आले. केशवराव त्यांचं स्वागत करून म्हणाले,—

' कां बुवा, आज मोर्चा कां आलाय हा ? '

' आम्हीं आलों नाहीं—तुम्हीच यायला लावलंत. '

— एक शिष्ट म्हणाले.

' म्हणजे ? '

' तुम्ही म्हणजे तुमच्या मुलीनं ! — इथल्या हमालांना संप करायला लावणार आहे ती. म्हणजे आमचा व्यापार बंद पडणार. '

दुसरे एक लॉंग कोट घातलेले गृहस्थ म्हणाले.

' कां पण ? ' — केशवरावनीं थोडं घाबरून विचारलं.

' त्यांची हमाली आम्ही वाढवावी म्हणून ! '

' मी आतां तुम्हाला खरं सांगू कां ? हीं सगळीं कारस्थानं सारंगपूरचा ज्यानं संप घडवून आणला होता त्या आकाशचीं आहेत. त्याचा एक दोन दिवसाच्या आंत मी बंदोबस्त करतों, म्हणजे आपोआप या सगळ्या नाड्या आखडल्या जातील. '

' कांहीहि करा अन् संप न होईल अशी दक्षता घ्या म्हणजे झालं.'

' घेतों, अगदीं नक्की घेतों. '

× × ×

अन् हरिभाऊंच्या बंगल्यावर त्यावेळीं काय चाललं होतं ?—

—प्रमोदची नुसती धांदल उडून गेली होती. मोठमोठ्यानं प्रेमगीतं गुणगुणत दुमजल्यावरून खाली, खालून वर, त्याची सारखी धावपळ सुरू होती.

' साहेब, टेबल कुठं मांडायचं ? '

—एका नोकरानं मध्येंच त्याला विचारलं.

‘ कुठं म्हणजे काय, गद्धया. दिवाणखान्यांत—! ’

‘ मग थोरल्या साहेबास्नी इचाराय होवं ? ’

‘ कुठले थोरले साहेब ? तुम्ही खुर्च्या टेबलं वर दिवाणखान्यांत नेऊन ठेवा. त्यांनीं विचारलंच तर मी सांगेन म्हणे काय सांगायचं तें ! ’

हरीभाऊ दुमजल्यावरच्या एका खोलींत आराम खुर्चीवर सिगारेट ओढत पडले होते. नुकतेच ते सारंगपूरच्या आपल्या दुसऱ्या एका स्नेह्याकडे जाऊन आले होते. त्यामुळं ते शिणले होते.

त्या स्नेह्याकडं चहा घेत असतांना त्यांनीं त्यांना विचारलं होतं,—

“ काय हो, हरिभाऊ तुमच्या प्रमोदच्या लग्नाचं काय झालं ? कलेक्टरसाहेब आपली मुलगी देणार आहेत, असं म्हणत होतात ना ?—”

“ तें कांहीं जमेलसं वाटत नाहीं. ”

—हरिभाऊंना असं नाखुषीनं उत्तर द्यावं लागलं होतं. त्यावर त्यांचे ते स्नेहि म्हणाले होते,—

‘ अहो, मी हे केव्हांच ताडलं होतं. तुम्ही इतका सरळ माणूस समजू नका सरदेसाई म्हणजे. बोलेल एक, दाखवेल एक, अन् करेल तिसरंच ! ’

‘ यू आर राईट !—( खरं आहे तुमचं. ) ’

—हरीभाऊं गंभीरपणें म्हणाले होते.

तो प्रसंग त्यांना आठवला अन् ते मग आपल्याशीं म्हणाले,—

‘ खरंच मघाशीं गणपतराव म्हणाले तें कांहीं खोटं नाहीं. भयंकर माणूस आहे चिंतामणी म्हणजे. काय प्रेमानं वागायचा लेकाचा. ‘म्हणे तूं इथं राहायला आलास तर मला आनंद होईल. कांहींहि करून इथंच राहायला यायचं ठरव. कशाला ? तुझा मोठेपणा पाहायला ? काल त्या केशवरावशीं किती प्रेमानं वागत होता लेकाचा. अन् वरचेवर त्याच्या मुलाकडं नी आपल्या मुलीकडं सहेतुकपणें काय पहात होता. मला खिजवण्याकरतां दुसरं काय ?—अन् प्रमोदकडं किती तुच्छतेनं पाहायचा !—

तो असं त्याच्याशीं वागतो तरी हा सारखा आपला त्याच्या बंगल्यावर जातच असतो अन् त्या चंचलेपुढं सारखी लाळ घोटत असतो. आणि चोवीस तास प्रेमगीतं काय गुणगुणत असतो, कुणालाहि वरचेवर चहाला काय बोलवत असतो, आजतर कुठली एक भवानी जंबिया म्हणून नटी येणार आहे म्हणें चहाला. अन् त्या चंचलेलाहि पुन्हां आमंत्रण देऊन आलाय छप्पन वेळां. तें तिनं नाकारलं असलं तरी.–पण या चिंतामणीला प्रमोदविषयीं एवढा तिरस्कार वाटायचं कारण काय ? त्याची मुलगी काय एवढी आप्सरा लागून गेली आहे ? अन् कुठं विद्वत्तेचे दिवे तरी पाजळले आहेत तिनं एवढे ? चवचाल कार्टी ! मघाशीं सारंगपूरांत भटकत होती एका मजूर कामगारांच्या पुढाऱ्याबरोबर. अन् चिंतामणी पूर्वीसारखा आता माझ्याशीं प्रेमानं वागत नाहीं. उलट तिरस्कार करत असतो माझाहि. बोलून दाखवत नाहीं. तसं तो कधींं––पण वागण्यावरून ओळखतां येतं कीं. इथं राहाण्यांत आतां अर्थ नाहीं. बंगला विकून टाकावा, मुंबईला एक झकास नवा खरेदी करावा. अन् शक्य तितक्या लवकर इथून टाणं हालवावं हें उत्तम !’........

× × ×

“ खुर्च्या किती मांडायच्या साहेब ? ”

घाईघाईनं खालीं जायाला–निघालेल्या प्रमोदला उद्देशून एका नोकरानं दिवाणखान्यांतून विचारलं.

प्रमोद परत आला, नी त्याला म्हणाला,–‘ हें बघ मिस् जंबिया एक, मी दोन, डायरेक्टर गब्रू तीन, चंचला चार, तो प्रभाकर पांच, त्याची बहिण–वनिता सहा, अरे हो, आणि टी दौलतराव सात, अन् आमचे अप्पा आठ, पण थांब हं; मी विचारतों त्यांना—’—नी मग लागलीच हरीभाऊकडं जाऊन त्यानं त्याना विचारलं,–

‘ चहा घेणार काय आमच्याबरोबर तुम्ही ! ’

‘ नाहीं ! ’–हरीभाऊनीं तडकाफडकी उत्तर दिलं.

‘ दॅट इज नॉट गुड.–( हें बरं नव्हे ).–मिस् जंबियासारख्या सुप्र-

थोर माणसं आपल्या घरीं येणार अन् तुम्ही त्यांच्याबरोबर चहा घेणार नाहीं?--खरं म्हणजे तुम्ही त्यांचं स्वागत करून म्हणायला हवं,—

'आयु ॲम ग्लॅड टु सी यू ॲंड आयु ॲम व्हेरी मच थँकफुल टु यू-ऑल-फॉ-र--'

'हं बंद कर. मला त्रास देऊं नकोस उगीच. माझं डोकं दुखतंय. तुला हवं ते कर तूं. लोटांगणं घाल तूं त्यांच्यापुढं. निर्लज्ज. बोलूं नये म्हणावं तों तों जास्तच वाढत चाललंय कीं तुझं. अन् पुन्हां त्या चंचलेला आमंत्रण दिलंस काय? अरे, थोडी तरी तुला लाज वाटायची होती? तुला ते किती तुच्छ लेखतात ठाऊक आहे कां?—' हरीभाऊ संतापून म्हणाले.

'अप्पा, प्रेम निर्लज्ज असतं.'

'असतं तर चालता हो. काळं कर माझ्या-समोरून.'

'नमस्ते. थँक यू.'—

—असं म्हणून प्रमोद पुन्हा दिवाणखान्यांत आला नी आपल्या त्या नोकराला म्हणाला,—

'ऑल राईट. सातच मांड रे खुर्च्या. इकडं तीन अन् तिकडं चार. मिस् जंबिया, मी अन् चंचला एकीकडं बसूं अन् प्रभाकर, वनिता डायरेक्टर गब्रू अन् टी दौलतराव दुसरीकडं बसतील.'

साडेतीनलाच चहाची जय्यत तयारी झाली अन् तेव्हांपासूनच घड्याळाकडं नी दाराकडं प्रमोदचं लक्ष वेधून राहिलं.

मिस् जंबिया नी गब्रू यांची नी प्रमोदची ओळख टी दौलतराव यांचे मध्यस्थीनें झाली होती. टी दौलतरावांचा हा धंदाच होता. तिथं त्यांचा मोटार-दुरुस्तीचा कारखाना होता. प्रमोद आपली गाडी वरचेवर तिथं दुरुस्तीला टाकत असे. त्यामुळं त्याचा नी त्यांचा परिचय झाला होता. प्रमोदचा स्वभाव त्यांनीं लागलीच ओळखला अन् त्याच्यापासून आपल्याला चांगला फायदा करून घेतां येईल असं त्यांना वाटल्यावरून त्यांनीं परिचय वाढवून त्याचा स्नेह संपादन केला होता. त्याकरितां कितीतरी चहाचे कप नी सिगरेटस्चे टिन्स् त्यानीं खर्च केले होते. डायरेक्टर गब्रू हे टी दौलतरावांचे स्नेही होते. मुंबईला त्यांची एक 'सिरियस् प्रॉडक्शन'

नांवची स्टंट बोलपट कंपनी होती. ते नेहमीं पैशाच्या अडचणींत असत नी मग असं कुणाला तरी गांठून लुबाडीत. दौलतरावामार्फत हें नवीन सावज त्यांनीं पकडलं होतं.

पावणे चार वाजतां प्रमोदनं चंचलेकडं आपली मोटार पाठवली. तोच मोटार घेऊन जाणार होता पण आपण गेलोंत नी 'तीं माणसं' आली तर त्यांचं स्वागत कोण करणार म्हणून तो राहिला. पण थोड्याच वेळांत ड्रायव्हरनं परत येऊन—'त्या बंगल्यावर नाहींत' असं सांगितलं. प्रमोदला त्याचा खेद वाटला.—

चंचला वनितेकडं गेली होती. तिला नी प्रभाकराला घेऊन प्रमोद-कडं चहाला जायचं तिनं ठरवलं होतं. तें नुसतं निमित्त होतं. तिचा उद्देश निराळाच होता. अन् तो म्हणजे तिच्याकडं गेल्यावर आकाश-संबंधीं कांहींतरी विषय निघेल नी त्याच्याविषयीं तिचं मन कलुषित करायला आपल्याला संधि मिळेल—हा होय. पण वनितेनं तो विषयच काढला नाहीं अन् नंतर तिनंहून तो काढल्यावरहि तिनं तो फार चातुर्यानं टाळला.

वनिता चहालाहि जाणार नव्हती, पण चंचला तिला फार आग्रह करून म्हणाली,—'खरंच तुझी चांगली करमणूक होईल थोडा वेळ. बघ तरी एखदां तो खुळा कसं वागतो तें.'

यावर—'करमणुकीकरतां जायचं ? कितीतरी महत्त्वाचीं कामं करतां येतील आपल्याला एवढ्या वेळांत. तुझी करमणूक होईल. माझी व्हायची नाहीं. वेळ मात्र फुकट जाईल माझा.'—असं वनिता म्हणाली होती.. पण चंचलेनं तिचं ऐकलं नाहीं. तिला नी प्रभाकरला घेऊन आमच्या मोटारींतून ती प्रमोदच्या बंगल्याकडं गेली.

त्यांच्या अगोदर प्रमोदचे ते दोन पाहुणे नी टी दौलतराव तिथं आले होते. प्रमोदनं त्यांचे स्वागत केलं नी त्यांना एकमेकांच्या ओळखी करून दिल्या.

जवळ जवळ अर्धा तास त्यांचा तो चहा फराळ चालला होता. प्रमोद मिस् जंग्रियेला खूष ठेवण्याकरतां अगदीं शिकस्तीचा प्रयत्न करत होता. अन् त्याचं सगळ्यांनाच हसूं येत होतं.

चहा उरकल्यावर मिस् जंबिया प्रमोदला म्हणाली,—

‘ तुम्हीहि चला कीं आमच्याबरोबर. ’

प्रमोदनं लागलीच आपली संमति दिली. तो त्यांच्याबरोबर मोटारींतून गेला. चंचला, प्रभाकर नी वनितेला पोचवण्याकरतां मोटारींतून परत त्यांच्या घराकडं गेलीं.

मिस् जंबियेनं प्रमोद, आपल्याजवळ बसवून घेतलं होतं. मोटारींतून जात असतांना ती वाटेंतच त्याला म्हणाली,—

‘ तुम्ही आमच्याबरोबर बॉंबेला चला अन् आमच्या कंपनीचे भागीदार व्हा. असिस्टंट डायरेक्टरचं काम तुम्ही चांगलं कराल. आम्ही तुम्हाला पांचशें रुपये पगार देऊं. बघा इच्छा असेल तर. मात्र आम्हाला थोडी मदत करायला हवी. आमच्या नवीन पिक्चरचं शूटिंग चालूं आहे. आम्हांला थोडी पैशाची गरज आहे. एक पंचवीस तीस हजार रुपये तुम्ही कंपनीला कर्जाऊ म्हणून दिलेत तर फार मोठी मदत केल्यासारखं होणार आहे. आम्ही तुमचे पैसे चार महिन्याच्या आंत परत करूं. अन् व्याजहि देऊं रकमेला भरपूर. बघा. पैसे काय कोणीही द्यायला तयार होतील आम्हांला. पण निदान या निमित्तानं तरी तुमचा आमच्या कंपनीशीं संबंध घडून येईल अन् तसं झालं तर मला फार आनंद वाटेल. ’

--प्रमोदनं आनंदानं आपली संमति दिली.-

चंचलेनं मोटार नेऊन वनितेच्या दारांत उभी केली. प्रभाकर नी वनिता खालीं उतरली. दारांत यशवंता सायकल घेऊन उभा होता. त्याला पाहून वनितेनं विचारलं, ‘ कुणी आकाशनीं पाठवलं तुम्हाला ! ’

‘ होय, सायकल द्याय सांगतलीय तुमास्नी ही. त्यास्नीं अटक झालीया. ’

‘ अटक झाली !—अन् कुणाला, आकाशला !—

— वनितेनं अधीरतेनं विचारलं.

‘ व्हय ! ’— यशवंतानं खिन्नपणें उत्तर दिलं.

---

# प्रकरण ९ वें

त्या दिवशीं दोन वाजतां आकाशला अटक झाली होती. वनितेच्या त्या सायकलवरून तो नुकतांच एका खेड्याला जाऊन पुन्हां यशवंताच्या घरीं परत आला होता. इतक्यांत पोलीसनीं येऊन त्याच्यावर वॉरंट बजावून त्याला अटक केली होती.

—त्या अटकेच्या मुळाशीं तिथल्या व्यापाऱ्यांचं कारस्थान होतं. आकाशमुळंच हा संप घडून आला नी त्याच्यामुळंच आपल्याला हमाली नी गाडीभाडं वाढवून तोटा सोसावा लागला—म्हणून......आकाशवर त्यांचा दात होता. शिवाय त्याचा एकदां बंदोबस्त झाला म्हणजे पुन्हां हमाली नी गाडीभाडं कमी केलं तरी चालेल, अन् त्यांच्यांत आपल्याला फूटहि पाडतां येईल,—असं व्यापाऱ्यांना वाटत होतं. म्हणून पोलीस ऑफिसर नी इतर सरकारी अधिकारी यांच्यावर निरनिराळ्या तऱ्हेनं वजन पाडून नी वशिले लावून, त्याला भारतसंरक्षण कायद्याखालीं अटक करण्याबद्दल त्यांनीं शिकस्तीचे प्रयत्न चालविले होते. त्यांच्या त्या प्रयत्नांना यश आलं. भारतसंरक्षण कायद्याखालीं आकाशला अटक झाली.

अटक करून आकाशला लागलीच चंदापूरला नेण्यांत आलं होतं.

× × ×

त्याच्या अटकेची ती बातमी यशवंताकडून समजतांच वनितेला अत्यंत खेद वाटला. त्याला लागलीच भेटायला जायचं मनाशीं ठरवून तिनं यशवंताला विचारलं,—

'कुठं आहेत ते?—बहुतेक इथं आणलं असेल त्यांना?'

'यशवंतानं नुसती होकारार्थी मान हालविली.

चंचलेनंहि त्याला लागलीच भेटायचं ठरविलं. कपडे बदलण्याकरतां म्हणून गाडी घेऊन प्रथम ती बंगल्यावर गेली.

आकाशला पोलीस कचेरींत लॉकअप्मध्यें ठेवलं होतं. तिथं त्याला आणून अजून तासहि झाला नव्हता.

त्याचा तपास काढत वनिता तिथं गेली. समोरच खुर्चीवर एक पोलीस ऑफिसर बसला होता त्याला ती म्हणाली,–

'मला आकाशना भेटायचं आहे.'

'आत्ता'?–'ही कोण?'–अशा अर्थपूर्ण दृष्टीनं तिच्याकडं पाहात, आपल्या उजव्या पायांतील बुटाची टाच पुढंमागं करून खाली फरशीवर घासत, त्या पोलीस ऑफिसरनं विचारलं.

'हो.—कां मला आत्ता भेटतां यायचं नाहीं? परवानगी वगैरे घ्यावी लागते कां कुणाची?'

'डी. एस्. पी. ची परवानगी आणावी लागेल तुम्हाला; आत्ताच भेटायचं असेल तर.'

इतक्यात चंचला तिथं आली.

तिला पाहातांच तो–पोलीस ऑफिसर उठून उभा राहिला. ती कलेक्टरची मुलगी आहे हें त्याला ठाऊक होतं.

'काय दाते तुम्ही इथं असतां काय?'

—त्या पोलीस ऑफिसराला उद्देशून चंचला म्हणाली नी मग वनितेकडं तिची दृष्टी जातांच तिनं तिला विचारलं,—

'अं–तूं केव्हां आलीस?'

'आत्ता हीच.' वनितेनं उत्तर दिलं. चंचलेच्या प्रश्नाचं 'हो' असं दात्यांनीं हसत उत्तर दिलं होतं, पण चंचलेचं तिकडं लक्षच गेलं नाहीं.

नंतर ती दात्यांना म्हणाली,—

‘ आम्हाला आकाशना भेटायचं आहे. ’

‘ कांहीं हरकत नाहीं. आंत आहेत ते, या ना. ’

—असं म्हणत दाते दोघींना आंत आकाशकडं घेऊन गेले.

‘ आम्ही थोडा वेळ बोलत बसलों तर हरकत नाहीं ना तुमची ? ’

·—चंचलेनं दात्यांना विचारलं.

‘ मुळींच नाहीं ! ’

––असं म्हणत दाते बाहेर गेले नी पुन्हां आपल्या त्या खुर्चीवर जाऊन बसले.

त्यांनंतर आकाश, चंचला नी वनिता बराच वेळ बोलत बसलीं होती.

‘ अशी एकाएकीं कशी अटक केली ! तुम्हांला ’–वनितेनं आकाशला विचारलं.

‘ ते कां ? एकाएकीं मुळींच नाहीं. मला अटक करून माझ्यावर खटला भरण्यांत यांवा,––मला शिक्षा व्हावी,––म्हणून कितीतरी दिवस व्यापाऱ्यांचे प्रयत्न चालले आहेत ! ’

‘ व्यापाऱ्यांचे–? उद्देश ? ’––

––चंचलेनं मध्येंच विचारलं.

‘ मी एकदां तुरुंगांत गेलों म्हणजे तिथल्या हमाल गाडीवानांत फूट पाडून त्यांची हमाली नी गाडीभाडं पुन्हां कमी करतां येईल, असं वाटलं असेल त्यांना ! ’—आकाशनं उत्तर दिलं, नी मग तो वनितेला उद्देशून, म्हणाला,—

‘ त्याच्यांत फूट न पडेल अशी तुम्हाला आता दक्षता घ्यायला हवी. घ्याल ? ’

‘ जरूर. पण मला वाटतं आता कुणालाच दक्षता घ्यायचं कारण पडणार नाहीं. त्यांची संघटना चांगली झाली आहे. संघटनेचं महत्व त्यांना प्रत्यक्ष पटलं आहे. मी सारंगपूरला दररोज जाऊन येत जाईन. तिथं राहावं लागलं तर राहातहि जाईन. ’

—वनिता म्हणाली.

'मी तुमच्या सुटकेचा प्रयत्न करूं कां?'

—चंचलेनं विचारलं.

'नको.'—आकाश मान हालवीत म्हणाला.

'मग मी काय करूं?'

'तुम्हाला योग्य वाटेल तें.'—आकाश म्हणाला नी मग वनितेला त्यानं विचारलं,—

'इथल्या संपाचं काय झालं?'

'सारंगपूरपेक्षांहि इथली संघटना चांगली झाली आहे. कुणी पुढारी मिळाला नाहीं तरी, इथले हमाल आपल्या मागण्या मान्य झाल्या नाहींत तर संप पुकारून तो यशस्वी करून दाखवतील. एक दोन दिवसांत हमाली वाढविण्याबद्दल ते व्यापाऱ्यांकडं मागणी करणार आहेत. बहुतेक उद्यां इथं विराग येईल. तो इथलं पाहील सगळं.'

'तुम्ही दलित वर्गाविषयीं लोकांना सहानुभूति वाटावी नी भांडवलशाहीविषयीं चीड उत्पन्न व्हावी म्हणून कसली चळवळ करणार होता, त्याचं काय झालं?'

'काल एक मिरवणूक काढली होती मी इथं. ज्यांना कामच मिळत नाहीं, आठआठ–दहादहा तास काम करूनहि ज्यांचं पोट भरत नाहीं, ज्यांना उपासमार सहन करावी लागते,—वस्त्रं मिळत नाहींत,—असे दलितवर्गांत मोडणारे सर्व प्रकारचे लोक—पुरुष, स्त्रिया, मुलं—सगळीं सामील झालीं होतीं त्या मिरवणुकींत. बोर्ड्स् दिले होते मी त्यांच्या हातांत निरनिराळा मजकूर लिहिलेले. एका सातआठ वर्षांच्या मुलाजवळ एक बोर्ड दिला होता—जन्मापासून माझ्या अंगावर कपडा नाहीं—असं लिहिलेला. फारच परिणाम झाला लोकांच्या मनांवर त्या मिरवणुकीचा!'

'छान!—' आकाश आदर व्यक्त करीत म्हणाला.

'चल जाऊंया आतां.'—आकाशचं मत तिच्याविषयीं आणखी चांगलं होऊं नये म्हणून चंचला वनितेला उद्देशून मध्येंच म्हणाली.

आकाशनं तें ओळखलं. तो मग तिला थोडं खूष करण्याकरतां म्हणाला,—

‘ तुम्ही अभ्यासाला सुरवात करा. तुमचा आम्हांला चांगला उपयोग होईल. ’

चंचलेला त्याचा केवढा आनंद वाटला.‘ मग मी काय करूं ’ या तिच्या प्रश्नाला—‘ तुम्हाला योग्य वाटेल तें ’—असं जेव्हां आकाशनं उत्तर दिलं तेव्हां त्याचा तिला किती राग आला होता.—तो कुठल्या कुठं नाहींसा झाला.

घरीं परत आल्यावर चंचलेच्या मनात सारखे आकाशविषयीं विचार घोळूं लागले,—

‘ खरंच, किती विचित्र माणूस आहे हा आकाश म्हणजे ! पण तो तसाच असामान्यहि आहे आणि म्हणून मला तो आवडतो. प्रमोद-सारखा तो मूर्ख नाहीं. प्रभाकरसारखा तो ध्येयहीन-पुळचट नाहीं.— तो एक आदर्श तरुण आहे. पण मला त्याला आपलासा करता येईल कां ? वनितेविषयीं त्याला आदर वाटतो तसा नव्हे त्याहिपेक्षां अधिक तो आप-ल्याविषयीं वाटायला काय करावं ? तिच्याविषयीं त्याला आदर वाटतो तो ती या चळवळी करते म्हणूनच ना ? मग आपण तिच्यासारखंच नव्हे तिच्यापेक्षांहि अधिक या चळवळींना वाहून घेतलं तर—?-खात्रीनं आपल्याविषयींहि त्याला आदर वाटूं लागेल. शिवाय वनितेपेक्षां आपला त्याग अधिक होईल.—कारण आपण जर या चळवळींत पडलों तर आपल्या बाबांची एवढी मोठी ही हुद्याची नोकरी जाईल शिवाय बाबांची आपण एकुलती एक मुलगी आहों. याचा खात्रीनं आकाशच्या मनावर परिणाम झाल्यावाचून राहाणार नाहीं. आपल्याविषयीं तो जो तिरस्कार व्यक्त करीत होता, तो आपण श्रीमंत नी सत्ताधारी बापाची मुलगी असल्यामुळं आपल्याहातून दलितवर्गाच्या उद्धाराचं कांहीं कार्य होणं शक्य नाहीं, अशी त्याची कल्पना झाली असावी म्हणूनच होय ! कारण सकाळीं तो आपल्याला म्हणाला होता,—तुमच्याहातून हें कार्य घडलं तर मला आनंद वाटेल—म्हणून, अन् मघाशी पुन्हां तो म्हणाला,—

तुमचा आम्हाला चांगला उपयोग होईल पण मग मी काय करूं,—असं जेव्हां आपण त्याला विचारलं तेव्हां तुम्हाला योग्य वाटेल तें,—असं चमत्कारिक नी तुसडेपणाचं का उत्तर दिलं त्यानं?— आपलंच चुकलं. काय करूं असं विचारण्याऐवजीं आपण प्रत्यक्ष कांहीं तरी करून दाखवायला हवं होतं. कारण असा प्रश्न विचारणं म्हणजे आपल्याला त्या कार्याविषयीं जिव्हाळा वाटत नाहीं असं व्यक्त करण्यासारखंच नाहीं काय? चुकलं आपलंच. त्याला शेतकरी, मजूर, कामगार—या दलितवर्गाविषयीं अत्यंत जिव्हाळा वाटतो. त्यांच्या उद्धाराकरतां झटणं हें त्याचं ध्येय आहे. त्याला आपल्या विषयीं प्रेम वाटायला आपल्यालाहि या वर्गाविषयीं तसाच जिव्हाळा वाटायला हवा नी आपण जास्तींत जास्त तशा प्रकारचं कार्यहि करायला हवं.—तसचं आता आपण करायचं. बाबांना स्पष्ट सांगून टाकायचं तसं—'

× × ×

आकाशवर खटला भरला गेला अन् तो रीतसर चालून त्यांत त्याला तीन महिन्याची शिक्षा झाली.

त्याला शिक्षा सांगण्यांत आली त्याच दिवशीं सकाळीं विराग तिथं आला होता. निकाल ऐकण्याकरतां तो, चंचला नी वनिता तिघंहि कोर्टांत गेलीं होतीं. सारंगपूरचे कांहीं हमाल—गाडिवान, यशवंता, तिथले चंदापूरचे कांहीं हमाल—असे बरेचजण कोर्टाबाहेर घोळका करून निकाल ऐकण्याकरितां अधीरतेनें उभे होते.

निकाल ऐकून त्या सगळयानांच खेद वाटला. यशवंताच्या तर डोळयांना पाणी आलं.

'आकाशदादा कीं जय! नोकरशाहीचा— भांडवलशाहीचा धिःकार असो!'—

—अशा तिथंच उभा राहून त्यांनीं घोषणा केल्या.

आकाशला शिक्षा झाली, पण त्यामुळं व्यापाऱ्याचा हेतु मात्र साध्य झाला नाहीं, कारण हमालगाडीवानांत—त्यांना फूट पाडतां आली नाहीं. तें एकजुटीनं वागत होते. संघटनेचं महत्व त्यांना पटलं होतं.

'आकाशदादा कीं जय!'—

—कितीतरी वेळां मनांतल्या मनांत ती घोषणा उच्चारत चंचला आपल्या बंगल्यावर परत आली.

'कुठं गेली होतीस?'

—तिच्या वडिलांनीं तिला विचारलं.

'कोर्टांत.'

'कशाला?'

'निकाल ऐकायला.'

'कसला निकाल?'

'आकाशवर भरलेल्या खटल्याचा.'

'आकाशवर खटला भरला होता?—'

'हो.'

'कसला?'

'भारतसंरक्षण कायद्याखालीं!'

'मग तूं कशाला गेली होतीस उगीच. त्याचा परिणाम चांगला व्हायचा नाहीं. आपला हुद्दा नी आपल्यावरची जबाबदारी तूं जाणायला हवी होतीस. कुठला तो आकाश! चळवळी कसल्या करत असतो लेकाचा! माझ्या कानावर आल्या होत्या या त्याच्या लीला बऱ्याच वेळा! अन् तूं त्याच्या खटल्याचा निकाल ऐकायला गेली होतीस?—राजकीय चळवळी करणारा माणूस तो. अशा लोकांवर सरकारचा रोष असतो.—'

'पण आकाशवर माझं प्रेम आहे. मीहि लवकरच या चळवळी-करतां वाहून घेणार आहे.'

'म्हणजे!'—आश्चर्यानं आ पसरून तिच्याकडं पाहात राव-बहादूर उद्गारले नी मग म्हणाले,—

'पण याचा परिणाम काय होईल?'

'आपल्याला नोकरीला मुकावं लागेल हाचना? माझ्यापेक्षां नोक-रीचं तुम्हाला अधिक महत्त्व वाटत असेल तर मी तुमची मुलगी नाहीं असं समजा-सांगा म्हणजे झालं.—'

'तूं माझी मुलगी नाहींस असं समजूं?—चंचले, काय बोलते आहेस हें?—मला तूं इतका कृतघ्न समजतेस? तुझ्यापेक्षां मी नोकरी अधिक मानेन असं तुला वाटतं? माझं—आनंद, सुख, समाधान—सर्व कांहीं आतां तूं आहेस.—किती कठोर बोललीस तूं चंचले.—'

—रावबहादुर गहिंवरून म्हणाले नी मग एखाद्या लहान मुलासारखं स्फुंदून रडत त्यांनीं तिला विचारलं,—

'—पुन्हां नाहींना म्हणणार तूं मला असं?—सांग—बोल की—'

चंचलेच्याहि डोळयांत पाणी आलं. त्यांच्या गळयाला मिठी मारून ती म्हणाली,—'नाहीं.—पण तुम्हाला माझ्याकरतां मग नोकरी सोडावी लागेल.'

'मी आनंदानं सोडीन; पण तूं सुखी व्हावंस अशी माझी इच्छा आहे. ऐवढी मोठी हुद्याची नोकरी नी इतका पैसा असतांहि आयुष्यांत मला सुख लाभलं नाहीं. तसं तुझं होऊं नये. तुला जास्तींत जास्त सुख उपभोगायला मिळालेलं पाहून मला आनंद वाटेल—सुख होईल. या असल्या चळवळींना वाहून घेऊन तुला सुख लाभायचं नाहीं.'

'असं तुम्हाला वाटतं.—पण मला आकाशवर प्रेम करण्यांत नी असल्या चळवळी करण्यांतच सुख वाटत असेल तर?'

+ + +

दुसरे दिवशीं विरागनं चंदापुरच्या हमालांचं नेतृत्व पतकरलं. नी त्यांच्या मागण्याचा मसुदा तयार करून तो तिथल्या व्यापाऱ्याकडं तो घेऊन गेला. त्याच्याबरोबर बरेचसे हमालहि गेले होते.

'आमच्यापैकीं बरेचजण इथं नाहींत. परगांवला गेले आहेत. ते आल्यावर विचार करून चार—पांच दिवसानंतर तुम्हाला आम्ही काय तें सांगूं.'—असं व्यापाऱ्यांनीं त्यांना सांगितलं.

त्यांनीं चार—पांच दिवस वाट पाहिली. नंतर ते पुन्हां व्यापाऱ्यांकडं गेले. व्यापाऱ्यांनीं टाळाटाळ करण्याचा प्रयत्न केला पण विरागनं त्यांना स्पष्ट बजावलं,—'आम्ही आतां मुळींच ऐकणार नाहीं कांहीं तुमचं. आज आम्हांला निर्णय हवा; नाहींतर आम्ही संप पुकारणार उद्यांपासून.'

'पुकारा !'—त्यापाऱ्यांनीं एक-मुखानं सांगितलं.

दुसरे दिवशीं संप पुकारण्यांत आला.

\+ \+ \+

वनिता सारंगपूरला दररोज जाऊन येत होती. चंचलाहि तिच्याबरोबर जात होती. तिथली ती हमाल गाडीवानांची संघटना कांहीं केल्या विस्कळीत होणार नाहीं नी त्यांच्यांत मुळींच फूट पडणार नाहीं,—अशी वनितेची खात्री झाल्यावर तिनं खेड्यापाड्यांतून हिंडून आकाशनं आरंभलेल्या शेतकऱ्यांच्या संघटनेच्या कार्याला सुरवात केली. दररोज एका खेड्याला ती जाऊं लागली. चंचलाहि प्रत्येक ठिकाणीं तिच्याबरोबर जायला चुकत नव्हती.

प्रथम प्रथम चंचलेला वनितेचा हेवा वाटत होता. ती गोरगरिबांशीं फारच प्रेमानं वागायची. कोंबडीच्या खुराड्यासारख्या त्यांच्या घरांत जाऊन त्यांच्याशीं ती आस्थेनं-आपलेपणानं विचारपूस करत तासतास बोलत बसायची. त्यांच्या लहानमुलांशीं तर ती आपल्या भावंडासारखी वागायची. चंचलेला ते जमत नव्हतं. वनितेच्या त्या एकंदर वागण्यावरून ती त्या लोकांशीं प्रेमानें वागते, ते आकाशचं प्रेम संपादन करण्याकरतां नसून त्यांच्याविषयीं तिला...... जिव्हाळा वाटतो म्हणूनच होय, अशी तिची खात्री पटत गेल्यानंतर मात्र तिला तिच्याविषयीं आदर वाटूं लागला.

एक दिवस सकाळीं वनिता चंचलेला घेऊन एका खेड्यांतल्या मांगवाड्यात गेली. तिथली घरं अगदींच ठेंगणीं नी गलिच्छ होतीं. दोन म्हातारे मांग वाकाच्या बटा एकाला एक जोडून चऱ्या तयार करत होते त्यांना दोन मुली फिरक्या फिरवून पीळ घालत होत्या—एक म्हातारी एका मुलीच्या डोक्यांतील उवा पाहात बसली होती. कांहीं लहान लहान उघडीं —नागडीं मुलं हातांत शिळ्या भाकरीचे तुकडे घेऊन ते मिर्चीच्या नुसत्या पुडीबरोबर 'हा ऽऽय—हा ऽऽऽय करत मिटक्या मारत खात होती. पुरुषांपैकीं एकाच्याहि अंगावर धड वस्त्र नव्हतं—घामट—मळके नी फाटके कपडे होते त्या सगळयांच्याच अंगावरचे. त्यांच्या दाढ्या वाढलेल्या

होत्या. चेहरे खिन्न होते. नी डोळ्यांत कारुण्य होतं. बायकांच्या अंगावरचे कपडेहि तसलेच होते. त्यांचीं लुगडीं जागोजाग फाटलेलीं नी शिवलेलीं होती. तेलाच्या अभावीं त्यांच्या डोक्यावरचे केस वाखासारखे चरबट नी राठ दिसत होते.

'पाहिलंस किती हलाखीची स्थिति आहे ती या लोकांची?'

—वनिता चंचलेला उद्देशून म्हणाली.

चंचला ते सगळें दृष्टी स्थिरावून पाहात होती. तिला वनितेनं विचारलं,—

'ही स्थिति यांना कां प्राप्त झाली, असं तुला वाटतं?'

चंचला कांहींच बोलली नाहीं. वनिताच मग म्हणाली,—

'—याचं कारण आपल्या देशाचं पारतंत्र्य नी आर्थिक विषमता होय. पारतंत्र्यामुळं आपल्या देशाचं आत्यंतिक अर्थ-रक्तशोषण होत आहे, त्यांत आणि कांहीं जणाना श्रमाच्या मानानं अधिक मोबदला लाटतां येऊन, कांहींजणांना तर कांहींहि श्रम न करतां भरपूर पैसा लुबाडतां येतो आहे.'

चंचलेला तें पटलं.

त्यानंतर तिच्या चंचलेच्या वृत्तींत बदल होत गेला. वनितेसारखी तीहि दलित वर्गांतल्या लोकांशीं मिळूनमिसळून प्रेमानं वागूं लागली नी त्यांच्या जीवनाची तिला जसजशी खरी कल्पना येत गेली तसतशी तिला त्यांच्याविषयीं सहानुभूति वाटूं लागली. आकाशच्या प्रेमाकरतां त्यांच्याविषयीं जिव्हाळा वाटण्याऐवजीं त्यांच्या त्या दुःसह परिस्थितिमुळं तिला त्यांच्याविषयीं जिव्हाळा वाटूं लागला नी आकाशविषयीं वैषयिक प्रेम वाटण्याऐवजीं अशा लोकांच्या कल्याल्याणाकरतां झटणारा एक त्यागी तरुण— म्हणून तिला त्याच्याविषयीं आदर वाटूं लागला.

वनितेचं सहाय्य घेऊन तिनं समाजसत्तावादाचा अभ्यास करायला सुरवात केली.

× × ×

चंदापूरच्या त्या हमालांचा संप पंधरा दिवस चालू होता. तो संप मोडला जाऊं नये म्हणून विरागनं शिकस्तीचे प्रयत्न केले. प्रथम प्रथम

व्यापारी भलतेच हट्टाला पेटले होते. आम्ही यांच्या मागणीपेक्षांहि जास्त हमाली इतरांना देऊन आमचीं कामं करून घेऊं पण संपांत सामील असलेल्या या लोकांना पुन्हां काम देणार नाहीं—असं ते म्हणत होते नी त्या प्रमाणं त्यांनीं कांहीं लोक मिळवून त्यांना जास्त हमाली देऊन काम करून घ्यायला सुरवातहि केली होती. पण पैसे जास्त खर्चूनहि काम नीट होईनासं झालं. मापं व्हायला वेळ लागूं लागला. मोजतां मोजतां मध्येंच आकडा चुकायचा अन् पुन्हां मग मोजावं लागायचं. पोत्यांचीं तोंडंहि नीट लावलीं जात नव्हती. त्यामुळं ती गाड्यांत भरलीं म्हणजे त्यांतून धान्य गळूं लागायचं. पैशापरी पैसे जास्त जाऊन कामाची ही अशी रड होऊं लागली. त्यामुळं व्यापारी चिडले अन् मग नरम आले. शेवटीं त्यांनीं त्यांच्या मागण्या मान्य केल्या. हमाली दीडपट करण्यांत यावी अशी पहिलीच मागणी होती.

हमालांना दीडपट हमाली मिळूं लागली. विराग त्या कामगारांच्या वस्तींत एक खोली करून राहिला होता. तो संप यशस्वी झाल्यावर त्यानं आपल्या कार्याला वाहून घ्यायचं ठरवलं. तसं त्यानं लतेला कळविलं. लतेचं लागलीच त्याला उत्तर आलं,—

—विराग तुझं पत्र पोचलं. तूं आपल्या तत्वांच्या प्रचाराला वाहून घ्यायचं ठरविलेलं ऐकून आनंद वाटला. कार्याला कशी सुरवात करणार आहेस तें कळव. माझं ठीक चाललं आहे. पगार होतांच घराकडं थोडेसें तरी पैसे पाठवीन. आमच्या या संस्थेंत मुली नी स्त्रिया मिळून दोन—आडीचशें आहेत. त्यांना इथं निरनिराळं शिक्षण दिलं जातं. या संस्थेमुळंच हे इतके जीव जगले आहेत. जगत आहेत. अर्थात या दृष्टीनं या संस्थांचं महत्त्व कमी नाहीं. पण अशा तऱ्हेनं गांजलेल्या पिडलेल्या, स्त्रियांच्या जीवनाचा नुसता प्रश्न सोडवून खरं कार्य होणार नाहीं. स्त्रियांना आपल्या हक्काची जाणीव करून देऊन ज्यामुळं त्यांना ही स्थिति प्राप्त होते, त्याचं निर्मूलन होईल असं क्रान्तिकार्य त्यांच्याहातून घडेल असं शिक्षण या संस्थांतून दिलं जायला हवं. मी तसा प्रयत्न करणार आहे.

इथं हिंदुमुसलमानांचे दंगे वरचेवर होत असतात. कालपासून पुन्हां दंगा सुरू झालाय. काल संध्याकाळीं फिरून परत येतांना सडकेवर भोकसून पडलेलं एक प्रेत माझ्या पहाण्यांत आलं. त्याचा माझ्या मनावर फार परिणाम झाला. हिंदुमुसलमानांत होणारे हे दंगे—हिंदुमुसलमानांतले दंगे नव्हत. मुसलमान आईबापाच्या पोटीं जन्माला आलेला तो मुसलमान किंवा हिंदु आईबापाच्या पोटीं जन्माला आलेला तो हिंदु—ह्या कल्पनाच मला चुकीच्या वाटतात. महंमद पैगंबरानीं सांगितलेल्या धर्मतत्त्वाप्रमाणं आचरण करणारा तो मुसलमान नी वैदिकधर्मानें सांगितलेल्या धर्मतत्त्वाप्रमाणें आचरण करणारा तोच हिंदू—होय. हे हिंदुमुसलमान आपआपसांत भांडणार नाहींत. कारण दोघांचींहि धर्मतत्त्वं जवळ जवळ सारखीच आहेत. महंमद पैगंबरानीं जें सांगितलं तेंच वेदांनीं सांगितलेलं आहे. म्हणून खरे हिंदुमुसलमान आपआपसांत भांडणार नाहींत. ते एकमेकांशी बंधुभावानं वागतील. जे मग अशा तऱ्हेनं भाडतात ते खरे हिंदु अगर खरे मुसलमानच नसले पाहिजेत. धर्माचा—माणुसकीचा विसर पडलेले हे दानव होत. त्यांच्या आज्ञानामुळंच हे दंगे होतात. इथला हा दंगा मिटला जाईल असं कांहीं तरी कार्य करावं, असं मला सारखं वाटूं लागलं आहे.

आकाशला शिक्षा झाल्याचें वाचून खेद वाटला. आघाडीवरच्या सेनानींना—सैनिकांना—या अशा जखमा व्हायच्याच !— या जखमांतून पाझणाऱ्या रक्तानेंच मानवी जीवनाच्या विकासास सहाय्य करणाऱ्या उदात्त तत्त्वांचें प्राण पोसले जातात.

आतां पगार झाल्यावर पत्र लिहीन.

तुझी,
लता

× × ×

वनितेच्या कार्याचा व्याप वाढत होता तसतशी केशवरावांची तिच्याविषयींची काळजी वाढत होती. त्यांच्या इच्छेप्रमाणं आकाशचा

नव्हतं. उलट वाढतच गेलं होतं. आकाशप्रमाणं विरागचाहि बंदोबस्त झाला तर कांहीं तरी उपयोग होईल !—असा विचार केशवरावांच्या मनांत वरचेवर घोळत होता. एक दिवस रावबहादुर सरदेसाई यांची गांठ घेऊन, त्यांना तशी विनंती करायचं त्यांनीं ठरविलं नी त्याप्रमाणं त्यांच्याकडं जाऊन त्यांनीं त्यांना विनंति केलीहि.

—पण रावबहाद्दुर सरदेसाई त्यांना म्हणाले,—" हें मी सहज करूं शकलों असतो पण माझा नाइलाज आहे. कालच मी माझ्या नोकरीचा राजिनामा दिला आहे. "

× × ×

' तूं असल्या या चळवळी करूं नयेस '–अशी रावबहाद्दुर सरदेसाई यांनीं चंचलेची खूप समजूत घालून पाहिली पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

काय करावं हें त्याना सुचेनासं झालं. ' आकाशवर प्रेम करण्यांत ती असल्या चळवळी करण्यांत मला सुख वाटत असेल तर ? '—या चंचलेच्या वाक्याची त्यांना सारखी आठवण होई नी ते मग मनाशीं म्हणत,–' तिला यांतच सुख वाटत असेल तर मग तिला आपण विरोध कां करावा ? आपल्या सुखाच्या कल्पना आपण तिच्यावर कां लादाव्यांत ?...तिला यांत सुख लाभायचं नाहीं अशी आपल्याला तळमळ मात्र वाटणार. आपली एवढी इच्छासुद्धां सफल होणार नाहीं. जन्मभर आपल्याला समाधान लाभलं नाहीं अन् आतां पुढंहि तें लाभायचं नाहीं.... नशीब आपलं ! '

चंचलेच्या सुखाआड यायला नको म्हणून शेवटीं त्यांनीं आपल्या नोकरीचा राजिनामा दिला. राजिनामा दिला तरी ते विचार त्यांच्या मनांत सारखे घोळत होते. त्यांना मुळींच चैन पडत नव्हतं. त्यांना वाटे,–असं कां होत असेल हें ? आपल्या उभ्या आयुष्यांत आपल्याला कसलंच समाधान कां बरं लाभलं नाहीं ?—भोग–विलास हें आपण आपल्या आयुष्याचं ध्येय ठरविलं होतं—म्हणून तर हें असं झालं नसेल ?—तसंच असलं पाहिजे. आपण आपल्याकरतां जगलोंत. ते इतरांकरतां जगलों

असतो नी त्याग हें आपण आपल्या आयुष्याचं ध्येय ठरविलं असतं तर—?

बरेच दिवसांत ते हरिभाऊकडं गेले नव्हते नी हरिभाऊहि त्यांच्याकडं आले नव्हते. एक दिवस ते या असल्या विचारांनीं त्रासले होते. त्यांना एकाएकी हरिभाऊंची आठवण झाली. त्यांना भेटायला जायचं त्यांनीं ठरविलं नी ते लागलीच गेलेहि. पण त्यांच्या बंगल्याला कुलूप होतं. बाहेर गेटवर एक पाटी लावलेली होती. तिच्यावर लिहिलेलं होतं,—

" बंगला विकणेचा आहे–खालील पत्त्यावर चौकशी करावी. "

खालीं मुंबईचा पत्ता होता. स्तंभित होऊन रावबहादूर सरदेसाई तिकडं पाहात राहिले.

—नंतर त्यानीं तो पत्ता लिहून घेतला.

## प्रकरण १० वें

‘ परमेश्वरा, आमच्या लतेचं कल्याण कर. तिला दीर्घायुष्य दे ! ,–’ असं मनांत म्हणत माधवरावनीं मनिऑर्डरच्या फॉर्मवर सही केली. लतेकडून दहा रुपये आले होते.

––पैसे घरांत घेऊन जात ते शांताबाईला म्हणाले,—

“ लतेकडून पैसे आलेत आज. ”

“ खरंच ? ”

“ हें बघ कीं. दहा रुपये आले आहेत. ”

—माधवराव कौतुकानं म्हणाले.

“ आले असतील. मुलीनं नोकरी करून तुमच्याकरतां पैसे पाठवावें याचं भूषण वाटतं तुम्हाला ?......नशिब. दुसरं काय ! ”

—शाताबाई खिन्नतेनं उद्गारल्या.

“ तें असू दे. आतां सत्यनारायण एकदां उरकून टाकूं या.—केव्हांचा बेत करूं या मग ? ”

“ आतां उगीच पैसे नासू नका आणि देवदेव करून. अन्नान्न दशा चालली आहे तरी अजून डोळे उघडत नाहींत तुमचे !—पोराबाळांच्या तोंडांतून काढून–भटाभिक्षुकांची धन करूं नका उगीच. ”

“ या तुमच्या गुणामुळंच तुम्हाला हे दिवस दिसले आहेत. देवाचं

कांहीं करायचं म्हटलं कीं तुमचं खवळलंच पित्त. मी कांहीं ऐकणार नाहीं तुझं या बाबतींत तरी. करायचं असलं सरळपणानं सगळं तर कर; नाहीं तर आम्ही करतो. बापूभटजीला सांगतों. त्याच्या बायकोला बोलावतों स्वैपाकाला. सगळं करतों आमचं आम्ही. अन् खर्चहि कांहीं फार करणार नाहीं. कांहीं नाहीं मीं. पांच-सात रूपायाच्या आंत बाहेर. शेजारच्या दहापांच माणसांना प्रसादाला सांगायचं. जेवायला एक चार दोन माणसं सांगायचीं. बस्सं.. असा किती खर्च करावा लागणार आहे याला—? देव जर आपलं सगळं हें चालवतों आहे तर त्याला आपण विसरून कसं चालेल? त्याला विसरलात म्हणून तर तुम्हाला हे दिवस दिसले !......

—माधवराव गंभीरपणें म्हणाले. त्यावर—' कसला देव आलाय नशिबाचा खेळ आहे सगळा हा—' असं शांताबाई म्हणणार होत्या—पण त्या कांहींच बोलल्या नाहींत. कारण अलिकडं नशिब-बिशिब सगळं झूट आहे अशी त्यांची खात्री पटत चालली होती. शेजारच्या कुणब्याच्या वगैरे बायका त्यांच्याकडं बसायला येत. त्यांची अत्यंत हलाखीची परिस्थिति होती, पण त्या नशिबाला दोष देत नव्हत्या. सावकाराच्या घराकडं बोट करून त्या म्हणायच्या--या दोन गुजरांनीं अन् सरकारनं पिळून काडलंय आम्हासनीं. दोन डुया झाल्या असत्याल ह्या गुजरास्नी हातं येऊनशान्. येतांना जिन्यामिन्याच्या पिशव्या घेऊनशान् आली हुती ही गुजरं. आता समद्याच्या टाळूवरनं हात फिरवूनशान् अन् शेलक्या शेलक्या जिमीनी कमरंला लावूनशान् बसल्यात लोडाला टेकूनशान्. त्यासनीं खऱ्याचं खोटं अन् खोट्याचं खरं करूनशान् पैसा मिळतो म्हणून आम्हास्नी असं मरावं लागतंय !

शांताबाईंना मग वाटायचं—' अशीच आमचीहि पिळवणूक होत असेल कां कुणाकडून तरी ? ' अन् त्या मग मनाशीं म्हणायच्या, ' असंच असलं पाहिजे कांहीं तरीं. पण ही पिळवणूक थांबवतां नाहीं कां येणार ?—तसा कायदा झाला तर— ? शारदा कायद्यानं नाहीं कां आता चबदा वर्षांच्या आंतल्या मुलीचं लग्न करतां येत नाहीं. कुठलं आलंय

नशिब अन् असलं तरी कायदा उल्लंघू शकायचं नाहीं तें. लहान मुलीची कुठं लग्नं होतायत् आता ?–असा कांहींतरी कायदाच व्हायला हवा !'

× × ×

वनिता नी चंचला यांनीं खेड्यापाड्यांतून हिंडून जें प्रचाराचं नी संघटनेचं कार्य केलं त्याचा फार उपयोग झाला. सरकारतर्फे दुष्काळीं कामं सुरू झालीं. शेतकऱ्यांना सारासूट मिळाली. त्याहिपेक्षां विशेष महत्त्वाचं म्हणजे लोकांत क्रान्तीचं नवचैतन्य निर्माण होत गेलं. याच प्रचाराच्या कार्याकरतां त्या एक दिवस रोहिणीला गेल्या होत्या. सभा नी प्रचारकार्य उरकल्यावर त्या विरागच्या आईला भेटण्याकरतां म्हणून त्याच्या घरीं गेल्या.

शांताबाईनीं त्यांचं स्वागत करून त्यांना '–आल्यासारखं आता आजच्या दिवस राहा !' म्हणून ठेऊन घेतलं.

पूजेला सुरवात झाली.––

श्रीगणेशायनमः । श्रीसरस्वत्यै नमः ।......

आमंत्रण अगदीं थोड्या लोकांना दिलं होतं पण देशपांड्यांच्या घरीं सत्यनारायण आहे ही बातमी गांवांत पसरायला फार उशीर लागला नाहीं अन् मग सगळ्या गांवांतले भाविक ( ? ) लोक तिथं जमा होऊं लागले. माणसांची संख्या वाढूं लागलेली पाहून माधवराव नी शांताबाई यांचा जीव खालीवर होऊं लागला. प्रसाद अगदीं थोडा केला होता. लोकांची अगदी रीघ लागायला सुरवात झालेली पाहून माधवराव दार लावायला उठले. पण बाबूभटजी त्यांना म्हणाले'—' येऊं देत कीं, लोक आले म्हणून काय बिघडलं ?—'

लोकामुळं बाबूभटजीची दक्षिणा वाढणार होती. पातेल्यांतला प्रसाद माधवरावांच्या डोळ्यापुढं होता. ' माणसं येईनात कां पण मुलं येऊन उगीच दंगा करतात हो ! ' असं म्हणत त्यांनीं दार लावून आतनं कडी घातली.

पुजेचा थाट करण्यांत आला होता.

चौरंगाच्या चारी बाजूला चार लहान लहान केळीचे खुंट उभा केले होते. समोर दोन्हीकडं दोन घासून लखलखित केलेल्या समया तेवत

ठेवल्या होत्या उदबत्त्यांचा एक पुंजका पेटवून तो तांदळानं भरलेल्या एका फुलपात्रांत खोऊन ठेवला होता. गंध, फुलं–तुळशी, अक्षता, खारका, बदाम, सुपाऱ्या, खोबऱ्याच्या वाट्या, विड्याची पानें सर्व कांहीं यथासांग करण्यांत आलं होतं. पूजा उरकली.

फुलं–तुळशी वाहत असतांना माधवरावांच्या मनांत एक विचार आला. या सगळ्या वस्तु यापूर्वी निरनिराळ्या ठिकाणीं होत्या त्या एकत्र आल्याबरोबर हा देव कसा निर्माण झाला? इतका सहज देव निर्माण होऊं शकतो अन् माणूसच त्याला निर्माण करतो—हा देव जगाचा पालनकर्ता?—आपण हें काय करतों आहोंत!' पण तो विचार त्यांनीं आपल्या मनांत फार वेळ टिकूं दिला नाहीं. देवाचा मध्यंतरी आपल्याला विसर पडला होता, म्हणूनच हें असलें नास्तीकपणाचे विचार आपल्या मनांत येत आहेत अशी त्यांनीं आपल्या समजूत घातली. नी ते मग भाविकपणें फुलें–तुळशी वाहूं लागले.

नंतर कथेला सुरवात झाली.

बाबूभटजी आधी संस्कृत श्लोक नी नंतर त्याचा अर्थ वाचूं लागले,—

"—त्या कालीं मृत्युलोकीं अनेक प्राणी अनेक प्रकारचीं दुःखें भोगत आहेत, कोणास अन्न नाहीं, कोणास वस्त्र नाहीं, कोणास संतति नाहीं, तर कोणी अनेक दुर्धर रोगांनीं जर्जर होऊन गेले आहेत, असे अनेक योनीचे—"

"—स्त्रियांचें सौभाग्य, पुरुषांचें वैभव स्थिर राहून धंदा रोजगारांत यश मिळतें. याला वेळा काळाचे मुळींच अगत्य नाहीं. आपल्या मनाला वाटेल त्या दिवशीं मोठ्या भक्तिभावानें..... ..."

बाबूभटजी एकामागून एक संस्कृत श्लोक वाचून त्याचा मराठी अर्थहि वाचून दाखवत होते. शक्य तितक्या लवकर तें संपावं म्हणून त्यानीं 'पंजाब मेल' सोडली होती.

श्रोत्यांपैकीं कांहींजण तल्लीनतेचा आव आणून ऐकत होते. खांबाचा-भिंतीचा आधार टेकायला मिळालेले कांहींजण पेंगत होते. मुलं मधून

मधून एकमेकांना चिमटे काढ,-टोप्या उडव, असला प्राव्यपणा कर होती. माधवराव तल्लीनतेनं सत्यनारायणाकडं पाहात होते.

बाबूभटजीनीं शेवटचा श्लोक वाचून पहिला अध्याय संपवला त्या श्लोकाचा मराठी अर्थ त्यानीं वाचला,—

" ह्याप्रमाणे एकनिष्ठेनें यथासांग नारायणाचें व्रत आचरण केले असतां मनुष्यांच्या इच्छा तत्काळ पूर्ण होतात. ह्या कलियुगांत मानवांस आपल्या दुःखांतून दूर होण्यास अत्यंत सुलभ असा हाच उपाय ह्या पृथ्वीचेठायीं आहे. " नंतर हातांतली पानें कपाळाला लावीत.—

—इति श्री स्कंदपुराणे रेवाखंडे सत्यनारायणकथायां प्रथमोऽध्यायः- असें बाबूभटजी पुटपुटले.

श्रोत्यापैकीं कांहीजणांनीं आपले हात जोडले त्याचवेळीं,-" माधव-राव, अहो देशपांडेऽ— " अशा बाहेर दारांत कोणतरी मोठमोठ्यानं हाका मारत होतं.

माधवरावनीं उठून दार उघडलं.

पोस्टमन आला होता. त्यानं एक पत्र त्यांच्या हातांत टाकलं. पत्र अर्धंच होतं म्हणून घाबरून माधवराव तें वाचूं लागले,—

महिलाश्रम,

कुंजवन,—

कळविण्यास अत्यंत वाईट वाटते कीं,-आपली मुलगी लता येथील हिंदू-मुसलमानांचा दंगा मिटावा म्हणून प्रचाराकरतां गेली असतां गुंडा-कडून भोसकली जाऊन तिला देवाज्ञा झाली आहे. परमेश्वराच्या इच्छेपुढं उपाय नाहीं. व्यवस्थापिका.

तें पत्र वाचून माधवरावांना विलक्षण धक्का बसला.

' लतेऽऽऽ—काय झालं हें—! '—असा त्यानीं मोठ्यानें हंबरडा फोडून आक्रोश करायला सुरवात केली.

' काय झालं ? '-असं म्हणत तिथलीं सगळीं माणसं त्यांच्याभोवतीं जमली.

बाबूभटजींनीं त्यांच्या हातांतलं तें पत्र घेऊन वाचलं नी मग त्यांतला मजकूर सांगितला.

शांताबाईवर त्याचा केवढा परिणाम झाला असेल-! त्यानीं एकदम मोठमोठ्यानें ओक्साबोक्सी रडायला सुरवात केली.

तिथले सगळे लोकहि हळूहळू लागले.

'श्रीसत्यनारायणाची' ती कथा तशीच राहिली. सगळे लोक आपआपल्या घराकडं निघून गेले.

मानवांच्या सर्व इच्छा सफल करणाऱ्या 'श्री सत्यनारायणाची' कथा चालली असतांनाच आपल्या मुलीच्या अंताची दुःखद वार्ता यावी, या घटनेचा माधवरावांच्या मनावर परिणाम होऊन देवाविषयींच्या त्यांच्या मतांत क्रान्ति घडून आली. कितीतरी दिवस एकच एक विचार त्यांच्या मनांत घोळत होता. आणि तो म्हणजे,— आपण ज्यांना देव समजत होतो ते खरे देवच नसले पाहिजेत अन् वरचेवर त्यांना वाटत होतं,—

'देव म्हणजे तरी काय मग ? का देवच नसेल ? मग हें सारं कसं घडून येतं ? देवाविषयींच्या आपल्या सगळ्या कल्पनाच चुकीच्या असल्या पाहिजेत !'

एक दिवस विरागच्या बॅगमधील कागदपत्र चाळत असतांना लतेनं त्याला दोन वर्षांपूर्वी लिहिलेलं एक पत्र त्यांच्या हातीं लागलं. लतेचं अक्षर पाहातांच त्यांना गहिंवरून आलं. त्यानीं मोठ्या उत्सुकतेनं तें पत्र वाचलं.

—तें असं होतं,—

नंदगड

विराग, ता.....

बरेच दिवसांत तुझं पत्र नाहीं. एवढ्या कसल्या उद्योगांत मग्न झाला आहेस ?

वक्तृत्त्व-चढाओढींत तुझा पहिला नंबर लागून तुला सुवर्णपदक बक्षिस मिळाल्याचं वृत्त वृत्तपत्रांत वाचावयास मिळालं. आनंद वाटला. या तुझ्या यशाबद्दल मी तुझं अभिनंदन करतें.

माझा अभ्यास चांगला चालला आहे. विशेष म्हणजे मी चंदा-पूरहून आल्यापासून म्हणजेच तुझी गांठ पडल्यापासून मी तूं सांगितलेल्या सर्व गोष्टींसंबंधीं खूप विचार केला. तुझे सगळे विचार मला पटले. विशेषत: माणसानं नीट विचार करून आपल्या बुद्धीला पटल्याशिवाय कोणतीहि गोष्ट करूं नये. ही तुझी विचारसरणी मला स्तुत्य नी स्पृहणीय वाटली. त्याप्रमाणें वागायचा मी निश्चय केला आहे. वागणुकींत बराच बदल झाला असल्याचं तुला दिसून येईल. तुला ठाऊक आहे इथं राहा-यला येतांना मी माझ्या आवडत्या देवाचा—गणपतीचा फ्रेम केलेला फोटो पूजेकरता बरोबर आणला होता. त्या फ्रेममध्यें तो फोटो आता तुला दिसायचा नाहीं.—स्वतंत्र भारत—असं मध्यें लिहिलेला हिंदुस्था-नचा—आपल्या देशाचा-नकाशा त्या फ्रेममध्यें मी घालून ठेवला आहे.

खरंच विराग, देवाविषयींच्या आपल्या कल्पना किती चुकीच्या आहेत रे! देव म्हणून आपण ज्या मूर्तींची पूजा करतों किंवा ज्यांना ज्यांना म्हणून आपण देव मानतों त्याना ते देवपण कशामुळं प्राप्त झालं, याचा आपण नीट विचार केला, तर निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या दु:खांनीं ग्रासलेल्या समाजाची त्या त्या दु:खांतून मुक्तता करून त्यांच्या जीवनाच्या विकासाला साहाय्य करण्याचं कार्य त्यानीं केलं आहे, असंच आपल्याला इतिहासावरून दिसून येतं. अग्नीला आपण देव मानतों आणि इतर धर्मांतहि त्याला देव मानलं आहे, याचं कारण अगदीं रानटी अव-स्थेंत मानव असतांना अग्नीमुळं प्रकाश नी उष्णता त्याला उपलब्ध होऊनं त्याच्या दोन मोठया गरजा भागविल्या गेल्या. म्हणजेच थंडी नी अंध:-कार—यामुळं भोगाव्या लागणाऱ्या दु:खांतून त्याची मुक्तता होऊन त्यांच्या जीवनाच्या विकासाला त्यामुळं साहाय्य झालं आहे.—म्हणून त्याला अग्नी अत्यंत पूज्य वाटला. त्याची देवांत गणना झाली. असंच आपले राम, कृष्ण, मारुती, गणपति नी इतर सर्व देवांच्या अगर देवविषयक कल्पनांच्या बाबतींत घडून आलेलं असलं पाहिजे.

—असं जर आहे तर मग मानवांची निरनिराळ्या दु:खांतून मुक्तता करून त्यांच्या जीवनाच्या विकासाला साहाय्य करणारीं तत्त्वं नी

व्यक्ति हेच खरे देव होत; नी प्रत्येक समाजांत निरनिराळ्या वेळीं नव्या नव्या गरजा नी दु:खं निर्माण होत असतात. त्या गरजा शमल्या जातील, नी त्या त्या दु:खांचं निर्मूलन होईल, अशा तत्त्वांचा प्रचार करणं, अगर अशा प्रकारच्या कार्य–करणाऱ्यांना मदत करणं–हीच खरी देवांची सेवा, भक्ति–ठरेल. इतिहासजमा झालेल्या, नुसत्या स्मृतींत उरलेल्या देवविषयक कल्पनांची,—मूर्तींची–पूजा,–सेवा,–भक्ति,—निरर्थकच ठरेल.

—स्वतंत्र भारत—आमच्या सामाजिक विविध दु:खांचं निर्मूलन करील. म्हणून मी तो माझा देव ठरविला आहे.

—आपल्या दादांना पटेल कां रे ही विचारसरणी? किती देव-ध्यानीं आहेत ते! त्यांना जर हे विचार पटले अन् खऱ्या देवांची सेवा त्यांच्याहातून घडूं लागली तर खात्रीनं त्यांना अधिक समाधान वाटेल.'

—माधवरावांनीं कितीतरी वेळां तें पत्र वाचलं.

—त्यानंतर आयुष्यभर एकच रुखरुख त्याना लागून राहिली,–

" आपलं चुकलं. खऱ्या देवांची सेवा आपल्याहातून घडली नाहीं अन् म्हणूनच आपल्याला सुखी होतां आलं नाहीं. या सेवेकरतां कसला तरी त्याग करावा लागला असता पण या त्यागामुळंच समाधान,–शांतता आपल्याला लाभली असती.

× × ×

त्या दिवशीं लतेच्या निधनाची ती तार आल्यानंतर थोड्याच वेळांत माधवरावांच्या घरासमोर एक टूरिंग येऊन उभी राहिली.

प्रभाकर ती घेऊन आला होता. वनितेची चौकशी करीत तो तिथं आला होता.

—वनितेनं त्याला विचारलं,—

" कां रे, कां आलास?"

" अण्णांना पॅरिलिसिस्‌चा अ‍ॅटॅक आलाय ताबडतोब चल!"

" म्हणजे! काय सांगतोयस् तूं हें?"

" काल मुंबईसनं तार आली. कापसाचा भाव आणखी खालीं उतरत जाणार असं स्पष्ट दिसतंय. आत्तांच सौदा संपवून टाका—म्हणून.

आज सौदा तोडायचा म्हणजे पंचविस हजार रुपयांचा तोटा आहे कमींत कमी. आपलं आहे नाहीं तें भरतीस घालावं लागेल त्याच्या. याचा त्यांच्या मनावर विलक्षण परिणाम होऊन त्यांना हा ॲटॅक आलेला असावा. त्यांचं डावीकडचं अर्ध अंग जवळजवळ गेलं आहे.

प्रभाकर–वनिता नी चंचला चन्दापूरला परत आली.

× × ×

वनितेच्या घरून आपल्या बंगल्यावर चंचलेनं गड्याला विचारलं,–

" बाबा कुठं आहेत ? "

" काय की, परवाच्या दिवसापासून पत्ता नाहीं त्यांचा. " त्या गड्यानं उत्तर दिलं,

" तुला सांगून गेले नाहींत का ? "

" नाहीं ! "

" म्हणजे— ! "

× × ×

रावबहाद्दुर सरदेसाई हरीभाऊंना भेटण्याकरतां मुंबईला गेले होते.

हरीभाऊंच्या त्या पत्त्यावर त्यानीं त्यांची चौकशी केली. तिथं ते नव्हते. त्यानीं तिथल्या शेजारच्या एकाला विचारलं,—

" इथं हरीभाऊ पटवर्धन म्हणून कोणी राहात होते का ? "

" हो ! "—चष्मा खालीं ओढून त्यावरून बारकाईनं त्यांच्याकडे पाहात ते गृहस्थ म्हणाले.

" मग कुठं गेले आहेत ते ? "

" काय की ! "—कानावर हात ठेवीत ते गृहस्थ उद्गारले.

" त्यांचा मुलगा कुठं असतो. "

" तेंहि माहित नाहीं. त्यांचा तो मुलगा तर आम्ही पाहिलाहि नाहीं काळा कीं गोरा. तेच सांगत होते, कुठल्या मिस् जंब्रिया नांवाच्या एका नटीच्या नादाला तो लागला आहे म्हणून. वीस–पंचवीस हजारांची त्याच्या नांवची कॅश सरटीफिकीटस् हरीभाऊनीं घेतलेलीं होती. तीं सगळीं त्यांना न विचारतां विकून त्यानं ते पैसे तिच्या बोलपट कंप-

नीला दिलं म्हणे. अन् त्या मिस् जंबियेनं त्याच्याकडून ते पैसे तेवढे घेऊन त्याला शेवटीं हाकलून दिलं, असं म्हणतात.

" असं ?—अरेरे ! वाईट झालं मग एकंदरींत. "

× × ×

मुंबईला रावबहाद्दुरांच्या ओळखीची बरीचशी माणसं होतीं. त्या सगळ्याकडं जाऊन त्यानीं चौकशी केली. त्यांच्यापैकीं बहुतेकांनीं त्यांना कांहीं माहीत नसल्याचं सांगितलं नी एक दोघांनीं जं सांगितलं तें अगदीं त्या गृहस्थानीं सांगितलं तसं—!'

रावबहाद्दुरांची निराशा झाली. ते तिथं एक दिवस राहून पुन्हां चंदापुरला परत आले.

रात्रीं जेवण वगैरे उरकल्यावर त्यानीं आपल्या गैरहजेरींत आलेलं टपाल घेऊन यायला आपल्या गड्याला सांगितलं. गड्यानं तें आणून त्यांच्या समोरच्या टेबलावर ठेवलं. त्यांत हरिभाऊंच्या हस्ताक्षरांत पत्ता असलेलं एक पाकीट होतं. तें प्रथम फोडून औत्सुक्यपूर्ण अधीरतेनें तें त्यांनीं वाचायला सुरवात केली,—

प्रिय चिंतामणी,

तुला न भेटतां न कळवतां मी चंदापूर सोडलं. हें तुला समजलं असेल तर तुला आश्चर्य नी खेदहि वाटला असेल. तुझ्यावर चिडूनच मी चंदापूर सोडलं पण आता माझी मलाच चीड आली आहे. खरंच मी अविचार केला. तूं अलिकडं माझ्याशीं तुसडेपणानं वागत होतास, माझा तिरस्कार करत होतास, हें खरं पण तो तिरस्कार तुझ्या मनांत कां उत्पन्न झाला असावा, याविषयीं जेव्हां मी विचार केला तेव्हां त्याला कारण मीच होतों अशी माझी खात्री पटली. तुझ्या चंचलेशीं प्रमोदचं लग्न व्हावं, असं मला वाटत होतं. हा स्वार्थ माझ्या मनांत डोकावलाच नव्हता तर माझा तूं तिरस्कार केला नसतास अन् मला तुला असं अंतरावं लागलं नसतं. या स्वार्थामुळंच आपल्या प्रेमांत वीष कालवलं गेलं.

चिंतामणी, आपण एकमेकांशीं किती प्रेमानं वागत होतों!—माफ कर!' आमच्या दिवट्या चिरंजीवानीं—तो तसा व्हायलाहि कारण मीच आहे म्हणा—मी जन्मभर राबून मिळविलेला पैसा कुठल्या एका मिस् जंबिया नांवाच्या नटीच्या नादी लागून सगळा मातीला मिळविला. त्याच्या नांवची पंचवीस हजारांची कॅशसर्टिफिकीटस् मी घेतलेलीं होतीं. तीं मला न विचारतां सगळीं विकून त्यानं तो पैसा तिच्या स्वाधीन केला. तो तेवढा घेऊन तिनं त्याला हाकलून दिलं आहे असं ऐकतों. त्याचा पत्ता नाहीं. मी इथं आल्यापासून त्याची माझी गांठ नाहीं. संपला आतां आमच्या आयुष्याचा खेळ. कुणाकरतां नीं कशाकरतां जगायचं आतां?—

चिंतामणी, मला माझ्या आयुष्यांत सुखी होतां आलं नाहीं.—अन् आता आयुष्याच्या शेवटीं तर हें असलं भयंकर दुःख मला सहन करावं लागणार आहे. बहुतेकांच्या बाबतींत असंच होतं. मला वाटतं, याचं कारण मनुष्यानं जगायचं कशासाठीं—हेंच त्याला बरोबर आकलन करतां येत नसावं. म्हणचे तो ज्यासाठीं जगतो-जगत असतो—तो माणसाचा खरा जीवित हेतु नसावा. माझी वृत्ति स्वार्थी,–भोगी होती; ती त्यागी असायला हवी होती… ….

अजून वरचेवर मनांत येतंय, पाखरासारखं भुरकन् तुझ्याकडं उडून जावं. तुला एकदां कडकडून भेटावं. अन् म्हणावं,–पूर्वीसारखं निस्वार्थी मनानं मला 'हरी—'—म्हणून एकदां म्हण, पण नको, तुला माझा विटाळ होईल. माझं मन—अंतःकरण त्यागी नाहीं. त्यांत स्वार्थाचं वीष कालवलं गेलं होतं.

आतांमात्र मी सर्वस्वाचा त्याग करायचं ठरवलं आहे. त्यामुळं मी सुखी होईन. मला समाधान लाभेल.

पृथ्वीच्या पाठीवर कुठंतरी असलेला तुझा,

जीवस्य कंठस्य,

तें पत्र कितीतरी वेळां वाचूनहि रावबहाद्दुरांचं समाधान झालं नाहीं. बाकीचं टपाल फोडून पाहायचं सुद्धां ते विसरले. त्यांना वाटलं,–'आपण त्याच्याशीं तुसडेपणानं वागलोंत ही मोठी चूक केली. प्रमोदशी चंचलेचं लग्न व्हावं असं त्याला जें वाटत होतं त्याला कारण आपणच आहोत, कारण त्यांचं लग्न व्हावं असा भाव आपल्या वागण्यांतून आपण कितीतरी वेळां व्यक्त केला होता, अन् तो बऱ्याच वेळां त्याच्या निदर्शनासहि आला होता; पण आता काय उपयोग ! ”

त्याचा मग त्यांना अत्यंत खेद वाटला अन्, शेवटीं त्यांच्या मनांत एक विचार आला,—' आपली सारी शक्ति एकवटून तो कुठं असेल तिथं त्याला ऐकायला जाईल अशी अत्यंत प्रेमभरानं त्याला एक हाक मारावी,—' ह री ऽ ऽ ऽ ऽ —'

× × ×

केशवरावना पॅरिलिसिस झालेलं समजतांच रावबहाद्दुर त्यांना भेटायला गेले. त्यांची ती स्थिति पाहून त्यांना अंत्यत वाईट वाटलें. केशवरावना स्पष्ट बोलतां येत नव्हतं नी या अंगावरचं त्या अंगावर होतां येत नव्हतं. त्यांची दोन्हीं मुलं प्रभाकर नी वनिता त्यांच्याजवळ बसलीं होतीं. त्यांच्याकडं मधून मधून ते कारुण्यपूर्ण असहाय्यतेनं पाहात होते. रावबद्दूर तिथं थोडा वेळ बसले होते. इतक्यांत दादासाहेब चारोळे तिथं आले. त्यांची दृष्टी कांहीं चमत्कारिकच दिसत होती. खिशातून घोड्यांच्या नांवाचं एक लीस्ट नी कागद पेन्शील काढून ती रावबहाद्दुर सरदेसाई यांचे—पुढें करीत ते म्हणाले,—

'एवढी टिप् काढून देतां कां ?–'

प्रभाकरनं जवळ तिथं उभा असलेल्या आपल्या एका गड्याला त्यांना तेथून घेऊन जाण्याबद्दल खुणेनं सांगितलं.

'चला साहेब मी तुम्हाला काढून देतों टिप्'—असें म्हणत त्यांच्या–चारोळयांच्या दंडाला धरून तो गडी त्यांना खालीं घेऊन गेला. जातांना चारोळे बडबडत गेले.

‘ बुलबुल वुईन् होणार. ट्रिबलिंग खेळतों. मग काय साला पैसा-पाऊस पडेल पाऊस. फेकून टाकीन म्हणावं मग तोंडावर त्याला. दावा करतोय. कोण समजलास मला तूं ? इनामदाराचा बचा आहे म्हणावं मी. ’

‘ कोण हे ? ’-चारोळ तेथून गेल्यावर रावबहाद्दुरनीं प्रभाकरला उद्देशून विचारलं.

‘ हे एक इनामदार आहेत इथले. कर्ज भयंकर झालं होतं त्यांना. रेसेसचा त्यांना नाद होता. परवा त्यांच्यावर एक दहा हजारांचा दावा दाखल झालाय्. तो होऊं नये म्हणून त्यानीं खूप खटपट केली पण पैसे कुठें मिळाले नाहींत त्यांना. मग घरांतलं सगळं आहे नाहीं तें बिकून चारपांचशें रुपये जमवून मुंबईला गेले आणि खूप पैसा मिळवावा म्हणजे दावा दाखल व्हायचा नाहीं म्हणून रेस खेळले. रेसमध्यें त्यांना कांहीं लागलं नाहीं. आता वेड लागलंय त्यांना.

रावबहाद्दुर गेल्यावर केशवरावनीं वनितेला आपलं डोकं तिच्या मांडीवर उचलून घ्यायला सांगितलं. तिनं तें घेतलं. ते मग स्नेहार्द्रतेनं तिच्याकडं पाहात गहिंवरून तिला अडखळत म्हणाले,—

‘ वन, चुकलों ऽ मी. क्षमा ऽ कर. तूं ने ऽऽ मी म्हणा ऽ यचीस ’— सामा ऽ जिक दारिद्य हा ए ऽ क संसर्ग ऽ जन्य-भयंक ऽ र रो ऽ ग आहे. तो कोणा ऽ ला केव्हांन् कसा ग्रासेल—याचा नेम नाहीं ऽ. मला ऽ तें पटायचं; पण तरीहि माणसानं जास्तीं ऽ त जा ऽ स्त पै ऽ सा मिळवणं हें ऽ आप ऽ लं ध्येय ठेवा ऽ वं, असं ऽ मला वाटा ऽ यचं. त्या रोगा ऽ ची छा ऽ या आता ऽ माझ्यावरच ऽ पडून म ऽ ला तें अनुभवानं ऽ-प-ट-लं आहे ऽ. आ ऽ काश आणि विरा ऽ ग यांचा मी निष्का ऽ रण ऽ द्वेष केला ऽ. मी ऽ मूर्ख ऽ, अज्ञानी होतों ऽ—. त्यां ऽ ना म ऽ ला क्षमा ऽ करा ऽ यला ऽ सांग ऽ. या रोगाचं निर्मू ऽ लन करण्या ऽ करतां ऽ—आघाडीवर तुम्ही ऽ-त्या-गा-नं—तळमळीनं—लढतां ऽ- आ ऽ हां, तुम्हा ऽ ला य ऽ श मिळो ऽ .’

—नंतर प्रभाकरला उद्देशून ते म्हणाले,

‘ प्रभा ऽ तूंहि ऽ या लढ्यां ऽ त सामी ऽ ल हो. नव्हे ऽ आघा ऽ डी ऽ वर

जा ऽ. नुसता ऽ पैऽसा हें ध्येऽय ठेवून कोणाऽलाहि सुखीऽ होतांऽ याऽयचं नाऽहीं...पैसा हें मी माझ्या आयुष्याचं ध्येय ठरविलं होतं. पण तो मिळवत असतांना मला सुख लाभलं नाहीं—अन् आतां तर...!

× × ×

त्याच वेळीं विराग नुकताच शिकवण्या संपवून येऊन आपल्या खोलींत बसला होता अन् त्यांच्या मनांत विचार घोळत होते,—' आपण लवकरच आपल्या तत्वांच्या प्रचाराला वाहून घेणार आहोंत, असं आपण लतेला कळवलं पण त्या कार्याला कशी सुरवात करावी हें अद्यापीहि आपल्याला निश्चित ठरवितां आलं नाहीं. खरंच कशी सुरवात करावी या कार्याला ? पण हा अविचार तर होणार नाहीं ना ? अखिल मानवजातीचं कल्याण हें ध्येय आपल्या आवाक्याबाहेरचं तर ठरणार नाहीं ना ? समता, स्वातंत्र्य, आणि विश्वबंधुत्व या त्रयींचं आधीराज्य जगभर प्रस्थापित झाल्याशिवाय अखिल मानवजात सुखी होणार नाहीं. अन् तशी झाली नाहीं तर जगांत चिर-शांतता नांदणार नाहीं.—मानवजातीला भोगाव्या लागणाऱ्या सगळया दुःखांचं जगांतून निर्मूलन झालं पाहिजे. नाहींतर कांहीं दुःखं उरलीं तर पुन्हां रोगासारखा त्या दुःखाचा प्रादुर्भाव सुरूं होऊन मानवीजीवनाच्या विकासाला अडथळे येतील.—हीं तत्वं उदात्त आहेत पण त्यांचा जगभर प्रचार करून तीं जगाकडून आचरलीं जायला आपला देश अगोदर स्वतंत्र असायला हवा. देश आधीं स्वतंत्र झाल्याशिवाय मला नाहीं वाटत आपल्याला हें कार्य यशस्वी रीतीनं पार पाडतां येईल असं. म्हणून हें ध्येय ठेऊन देशाचं स्वातंत्र्य प्रथम मिळवलं पाहिजे.—देश आधीं स्वतंत्र झाला पाहिजे. पण तो अशाप्रकारें स्वतंत्र करण्याकरतां तरी कोणत्या कार्याला वाहून घ्यावं ?—

देशाच्या स्वातंत्र्याकरितां झटणारी—कॉंग्रेस ही एकच प्रभावी अशी राजकीय संस्था आहे. तिचे अनुयायित्व पत्करून शक्य तितक्या लवकर देश स्वतंत्र होण्यास मदत होईल, अशा तऱ्हेचं कार्य आपल्या हातून घडेल ?—मला नाहीं वाटत—! देशाच्या स्वातंत्र्याकरतां कॉंग्रेसनं सत्य-

अहिंसा तत्त्वांचा पुरस्कार केला आहे. हें तत्त्वज्ञान प्रभावी आहे खास पण तें व्यवहार्य म्हणजेच बहुजनसमाजाला पचण्यासारखं–पटण्यासारखं मुळींच नाहीं. तसं असतं तर तीं तत्त्वं आमच्या बहुजनसमाजानं आत्मसात केली असतीं ; पण तसं झालेलं नाहीं.—या तत्त्वांचा प्रामाणिकपणें पुरस्कार करणारीं माणसं अगदीं थोडीं आहेत. याचं कारण या तत्त्वज्ञानांतील ध्येयवाद स्वप्नाळू आहे—व्यवहार्य नाहीं हेंच होय. आता हें खरें कीं हा ध्येयवाद स्वप्नाळू असला तरी कालांतरानें तो कदाचित् व्यवहार्य होईलहि.—रानटी अवस्थेंतील मानवांना पक्षासारखा आकाशांत आपल्याला स्वैरसंचार करतां येईल, नी शेकडों मैल लांबीचे समुद्र आपण तरून जाऊं शकूं, हें कदापिहि शक्य वाटलं नसेल, मात्र तसं झालं तर फार बरं होईल असं त्यांना खात्रीनं वाटलं असावं—हा त्यांचा ध्येयवाद स्वप्नाळूच नव्हता काय ? पण आज तो व्यवहारांत उतरलेला आपण पाहातों आहोंत. पण त्याकरितां कितीतरी काल जावा लागला नी त्याचबरोबर आधिभौतिकशास्त्रांतहि प्रगति घडून यावी लागली.

तसंच सत्य अहिंसाविषयक हा ध्येयवाद बहुअंशीं आधिभौतिक शास्त्रावर आधारलेल्या या सध्याच्या जगांत–प्रत्यक्ष व्यवहारांत उतरायला बराच कालावधि लागेल नी हीं तत्वें अध्यात्मशास्त्रावर अधिष्ठित झालेलीं असल्यानें अध्यात्मशास्त्र अगोदर प्रगत व्हायला हवं—म्हणजेच जनतेची –बहुजन समाजाचा त्याच्यावर विश्वास बसून तो वाढायला हवा. वस्तुस्थिति मात्र त्याच्या अगदीं उलट आहे. कारण अध्यात्मशास्त्रावरचा बहुजन समाजाचा विश्वास दिवसेंदिवस नाहींसा होत चालला आहे. आमची सामाजिक......मनोरचना आता अशा प्रकारची बनली आहे—कीं त्यांत ही अध्यात्मिक तत्वें रुजलीं जाणार नाहींत. सत्य–अहिंसेचं हें तत्वज्ञान नवीन नाहीं. आमचे धर्मग्रंथ नी गौतमबुद्ध, तुकाराम, ज्ञानेश्वर- इत्यादि अनेक थोर विभूतींनीं या तत्वांचा पुरस्कार आजवर केलेला आहेच पण अद्यापीहि तीं आम्हाला पचवतां आलीं नाहींत. उलट त्यांचं आतां आम्हाला अजीर्ण होऊं लागलं आहे नी आमची सामाजिक मनोरचना फार विचित्र बनत चालली आहे. दूध हें फार पौष्टिक आहे हें

खरं, पण तें अजीर्ण झालेल्याला देऊन काय उपयोग ?—तसंच सत्य-अहिंसेचं हें तत्वज्ञान प्रभावी आहे, पण तें या स्थितींत आमच्या समाजाच्या पचनीं पडायचं नाहीं. उलट त्यामुळं समाजांत दैववाद नी निष्क्रियत्व अधिक बोकाळत जाऊन आमची दिवसेदिवस अधोगति होत जाईल.

निरनिराळ्या रोगांनीं ग्रासलेल्या माणसासारखी आमच्या समाजाची स्थिति जाहली आहे. तिचं नीट आकलन करून आमच्या बहुजन समाजाची विशिष्ट मनोरचना नीट अभ्यासून-त्याच्या आटोक्यातलीं ध्येयं त्याच्यापुढं ठेऊन आम्ही त्याला क्रान्तिकार्याला उद्युक्त केलं पाहिजे. बहुजन समाजाच्या हातीं सत्ता राहून, आपला देश स्वतंत्र झाल्याशिवाय आपली या आपल्याला भोगाव्या लागणाऱ्या निरनिराळ्या दुःखांतून मुक्तता होणार नाहीं, हें आपण प्रथम आपल्या बहुजनसमाजाच्या प्रत्ययाला आणून दिलं पाहिजे; नी त्याचबरोबर त्याला आपल्या हक्काची जाणीव करून देऊन, प्रत्येक अन्यायाचा तीव्र प्रतिकार करून त्याकरतां प्रसंगीं तो आपल्या प्राणाचा मोबदला द्यायलाहि सिद्ध होईल-अशी बहुजन समाजाची मनोवृत्ति निर्माण होईल असं प्रभावी कार्य आपण केलं पाहिजे. बस्स देशाचं स्वातंत्र्य हेच आता माझं ध्येय. या स्वातंत्र्याच्या आड येणारे— मग ते स्वकीय असोत वा परकीय असोत—ते सगळे आमचे शत्रू ! सत्य नी अहिंसा यापेक्षां आम्ही आमच्या हिताला अधिक महत्त्व देऊं.—या प्रचाराकरतांच आतां आपण आपले प्राण वेचायचे. या तत्वांच्या संस्था सर्व देशभर स्थापन करावयाच्या. प्रथम देश स्वतंत्र करायचा ! देश स्वतंत्र झाल्यानंतर मग आमच्या उदात्त तत्वज्ञानाचा प्रचार करून नी सत्तेचा सद्उपयोग करून आम्ही—जागतिक-शातता प्रस्थापित करूं.—जगांतलीं सगळीं पापं-दुःखं जाळून काढूं. कुठल्याहि राष्ट्राच्या-धर्माच्या तत्त्वज्ञानापेक्षां आमचं तत्त्वज्ञान श्रेष्ठप्रतीचं आहे. तेंच जागतिक शांततेचा प्रश्न चांगल्या प्रकारें सोडवील—मानवजातीच्या सगळ्या दुःखांचं निर्मूलन करून तिला सुखी करील.-म्हणून त्या तत्त्वांचा प्रचार करून जागतिक शांतता-प्रस्थापित करण्याकरतां अगोदर आमचा देश स्वतंत्र झाला पाहिजे.

—अशा तऱ्हेचे विचार विरागच्या मनांत घोळत होते इतक्यांत,–कुंजवनला ' हिंदु-मुसलमानांचा भयंकर दंगा. सहा ठार. वीस जखमी. दंगा शमावा म्हणून प्रचार करण्याकरतां गेलेल्या स्वयं-सेविकेला भोसकण्यांत आले—'—असें वृत्तपत्रें विकणारा एक पोऱ्या रस्त्यानें मोठमोठ्यानें ओरडत चालला होता. तिकडं त्याचं लक्ष वेधलं. ती बातमी ऐकून त्याच्या अंगावर भीतीनें रोमांच उभे राहिले. त्यानें त्या पोराला बोलावून त्या वृत्तपत्राचा एक अंक विकत घेतला. कुंजवनच्या दंग्याची हकिकत त्यानें अगोदर वाचली. ती भोसकली गेलेली स्वयंसेविका आपली बहिण–लता–होती हें वाचून त्याला अत्यंत दुःख वाटलं.

त्या दिवसापासून लतेची आठवण झाली कीं कितीतरी वेळां त्याला वाटलं होतं,—' आमचा देश स्वतंत्र असता तर असे दंगे झाले नसते अन् त्यांत आपल्या लतेची अशी आहुतिहि पडली नसती. '

# प्रकरण ११ वें

" चल ना ग, गाडीची वेळ होत आली ! "

— चंचला घाईघाईनें वनितेच्या खोलींत प्रवेशून तिला म्हणाली.

" चल; माझी तयारी आहे. तुझीच वाट पाहात होतें मी. तुला वेळ कां लागला एवढा पण ? "

—वनिता निघण्याच्या तयारीनें उठत तिला म्हणाली.

" विरागकडे जाऊन आलें मी. "

" तो आला नाहीं का मग ? "

" घरींच नव्हता तो. "

" आतांशा तो फारसा घरीं नसतोच. सारखा आपल्या संस्थेच्या तत्त्वांचा प्रचार करीत हिंडत असतो. चल ना जाऊं या. "

—वनिता आपल्या खोलीचें दार डाव्या हातानें धरून उजवा पाय चपलमध्यें अडकवित म्हणाली.

त्यानंतर त्या दोघीहि स्टेशनवर जाण्यासाठीं बाहेर पडल्या.

आकाशची त्या दिवशीं सुटका होणार होती. तो बहुतेक त्या सायंकाळच्या गाडीनें येईल म्हणून त्याच्या स्वागताकरतां त्या स्टेशनवर जायला निघाल्या होत्या त्या स्टेशनवर पोंचल्या. इतक्यांत गाडी सुटल्याची घंटा झाली. पलीकडच्या प्लॅटफार्मवर एक गाडी येऊन

उभी होती. उतारूंची तिथं घाई सुरू होती. ' हमाल पाहिजे हमाल,— असं म्हणून प्रत्येक डब्यांत आशेनं डोकावून पाहात, पितळी बिल्ले लावलेले, निळे डगले अंगांत घातलेले, नी डोकीला तांबड्या अलबणाचे पटके बांधलेले कांहीं हमाल इकडून तिकडे हिंडत होते. च्येई–गरम– पुरीभाजी गरम—, असं हेल काढून म्हणत स्टेशनवरील हॉटेल–मधील पोरांची धांवपळ सुरूं होती. पांढरा ड्रेस केलेला एक गार्ड तांबड्या- हिरव्या निशाणाच्या गुंडाळया डाव्या काखेंत दाबून धरून, नी उजव्या हातांत शिट्टी घेऊन, तेथन थोडयाच अंतरावर मोठ्या कुऱ्यांत उभा होता.

—त्या कशाकडंच त्या दोघींचंहि लक्ष नव्हतं. मोठ्या आतुरतेनं आकाशच्या गाडीची वाट पाहात त्या उभ्या होत्या. थोडयाच वेळांत ' घर्र्र्–धड्–धड्–धड्–धड्–'—असा आवाज करीत गाडी स्टेशनांत आली. आकाश त्या गाडीनें आला होता. तो आपल्या डब्याच्या दाराच्या खिडकींतून डोकावून पाहात उभा होता. वनिता नी चंचला यांना पाहतांच त्यानें स्मित करीत आपला उजवा हात बाहेर काढून खालींवर केला. आकाशला त्यानीं पाहिलं. गाडी उभा राहातांच त्या त्याच्या- जवळ गेल्या. ' नमस्ते ! '—डब्यांतून खालीं उतरत आकाश म्हणाला. त्याबर त्या दोघीनींहि ' नमस्ते ' असं म्हणून त्याला अभिवादन केलं. घराकडे येतांना आकाशनें वाटेत त्यांना विचारलें,—

" विराग कां आला नाहीं ? "

" घरींच नव्हता तो. आतांशा तो आपल्या संस्थेच्या प्रचारांत मग्न असतो." वनिता म्हणाली.

" कसली संस्था ? "

—आकाशनें उत्सुकतेनें विचारलें.

त्यावर विरागनें स्थापन केलेल्या संस्थची नी तिच्या तत्त्वांची थोडक्यांत कल्पना देऊन वनिता त्याला म्हणाली,—' या संस्थेच्या प्रचाराकरतां त्यानं आतां वाहून घेतलं आहे. बऱ्याच लोकांची मदत त्यानें मिळवली आहे. आसपास निरनिराळ्या ठिकाणीं त्यानं या संस्था

थापन केल्या आहेत. हें त्याचं प्रचारकार्य चालू आहे. आतां आपण आमच्याकडं चहा घेऊन लागलींच त्याच्याकडं जाऊं या.'

'तुम्ही पुस्तकें वगैरे वाचलीत कां कांहीं?'—आकाशनें मध्येंच चंचलेला उद्देशून विचारलें.

त्यावर चंचला म्हणाली,—'अभ्यासापेक्षांहि वनितेच्या सहवासामुळं मला अधिक ज्ञान मिळवतां आलं–मिळालं, असं मला वाटतं... नी आतां स्पष्टच सांगतें, तुमचं प्रेम संपादन करण्याकरतां—मी या दलितवर्गांच्या उद्धाराच्या चळवळींना वाहून घ्यायचं ठरविलं होतं. पण त्यांच्याशीं मी मिळून मिसळून वागूं लागल्यानंतर त्यांच्या जीवनाची मला यथार्थ कल्पना येत गेली नी मग तुमच्याकरतां त्यांच्याविषयीं जिव्हाळा दाखविण्याऐवजीं, मला तो त्यांच्याविषयीं त्यांच्या परिस्थितिमुळं वाटूं लागला नी त्यांच्या जीवनाशीं मी जसजशी अधिकाधिक समरस होत गेलें, तसतसा तो अधिक वाढत गेला. आतां मी सर्वस्वी त्यांच्या उद्धाराकरतां स्वत:ला वाहून घेणार आहे नी आपल्याविषयीं मला आतां प्रेम वाटूं लागलं आहे तें पूर्वीसारखं वैषयिक नसून आपण अशा लोकांच्या उत्कर्षाकरतां झटतां म्हणून.—'

नंतर वनितेच्या वडिलांना पॅरिलिसिस झाला असून, विरागची बहीण–लता हिंदु–मुसलमानांच्या दंग्यांत भोसकली जाऊन ती ठार झाली असल्याचें चंचलेनं त्याला सांगितलें. तें ऐकून आकाशला खेद वाटला.

वनितेच्या घरीं चहा घेतल्यानंतर तीं तिघंहि विरागकडं जायला निघालीं.

"कुठं राहातो विराग?"—

—कामगारांच्या वस्तींत आल्यावर आकाशनं त्या दोघींना उद्देशून विचारलं. विरागची खोली तेथून जवळच होती; तिकडं बोट करीत वनिता म्हणाली,—'ती पाहा, तो पांढरा झेंडा लावलेला दिसतोय ना तीच ती खोली.'

तीं तिघंहि खोलीजवळ गेलीं. विराग आंत होता. त्यांना पाहातांच......दाराशीं येऊन त्यानें त्यांचें आदरानें स्वागत केलें.

नंतर औपचारिक प्रश्नोत्तरें झाल्यावर आकाशनें विरागला विचारलें,—

"तो पांढरा झेंडा कसला लावला आहेस बाहेर खोलीवर?"

त्यावर विराग म्हणाला,—

"माझ्या संस्थेचा झेंडा आहे तो. आकाश, मी हें काय आरंभलं आहे, असं तुला वाटेल. नी कदाचित् हसायलाहि आलं असेल तुला. अखिल मानवजातीचं कल्याण साधण्याकरतां झटायचं हें मी माझं ध्येय म्हणून तुला सांगत होतों. पण हें ध्येय तूर्त देश स्वतंत्र होण्यापूर्वी आपल्या आवाक्या—बाहेरचं आहे, हें त्यानंतर माझ्या प्रत्ययाला येत गेलं, नी अगोदर देश स्वतंत्र झाला पाहिजे अशी माझी खात्री पटली. आमचा देश स्वतंत्र होण्याकरतां देशांतल्या निरनिराळ्या जाती आधीं एकत्र आणल्या पाहिजेत. त्याकरतां राष्ट्रीय झेंडा असा हवा कीं, ज्यांत सर्वांचा समावेश झालेला असेल. एकाच झेंड्यावर निरनिराळ्या जातींचें निरनिराळ्या रंगांनीं दिग्दर्शन करून केलेली राष्ट्रीय झेंड्याची योजना योग्य होणार नाहीं. कारण तो झेंडा देशांतले जातीभेद सूचित करून जातीजातीं-मधील वेगळेपणा दाखवतो.—म्हणून सर्व जातीकरतां हा सर्व मूळ रंगांचा मिळून बनलेला पांढरा रंग मी माझ्या संस्थेच्या झेंड्याचा रंग नियोजिला आहे. आपला देश स्वतंत्र झाल्यानंतर जागतिक शांततेसाठीं सर्व राष्ट्रांचं एकीकरण घडवून आणण्याकरतांहि हाच झेंडा योजतां येईल. तुला माहीत असेल, पांढरा रंग हा सात्त्विकता नी प्रेम यांचं प्रतीक मानलं जातं.

देश स्वतंत्र करण्याकरता आपला हिंदी—समाज संघटित करून त्याची कार्यक्षमता वाढवण्याचं केवढं मोठं कार्य आपल्याला करावयाचं आहे. देवधर्म, रुढी—विषयक कल्पनांनीं आमचं सामाजिक जीवन खुर-टल्यासारखं झालं आहे. त्यांत आम्हाला नवचैतन्य निर्माण करावयाचं आहे. आमचीं मनं आम्हाला बलवान करावयाचीं आहेत. चांगल्या हितकारक गोष्टींचं अनुकरण आमच्या बहुजन समाजाच्या हातून लवकर घडावं; अशा गोष्टी त्यानं लागलीच आत्मसात कराव्यात; व्यक्तिहित हेंच हितसर्वस्व मानण्याऐवजीं त्यांच्यांत त्यागीवृत्ति निर्माण व्हावी;—अशा-प्रकारची सामाजिक मनोरचना निर्माण करण्याकरितां आपण झटलं पाहिजे.

स्पर्धा, द्वेष, स्वार्थपरायणता, पोकळ मोठेपणाच्या कल्पना, इत्यादींचे अजस्र तट आमच्या हिंदी–समाजांतील व्यक्ति–व्यक्तींत उभे आहेत; ते पार ढासळून सहकार्य, प्रेम नी त्यागीवृत्ति—या भावना बळावण्याचं कार्य आपल्याला करावयाचं आहे. आमचीं मनं आम्हाला अत्यंत बलवान् नी शुद्ध करावयाचीं आहेत—म्हणजेच त्यांत सत्याचं प्रतिबिंब पडूं शकेल, आम्ही असत्याकडं वाहवलों जाणार नाहीं. विलासाऐवजीं आमची त्यागीवृत्ति वाढली पाहिजे. मी आणि माझं घर याऐवजीं मी आणि माझा समाज,–मी आणि माझा देश ही, विचारसरणी समाजांत रुजली पाहिजे. आपल्याला आपल्या राष्ट्राची सर्वांगीण प्रगति करावयाची आहे. त्याकरतां काय करायला हवं ?—आपला राजकीय दृष्टीकोन कसा असावा ? इत्यादि विषयक ज्ञान आपण अभ्यासानं मिळवलं पाहिजे आणि प्रत्येक गोष्ट पूर्ण विचारानं केली पाहिजे.

आपला देश स्वतंत्र करण्याकरतां आपण जे प्रयत्न करणार, ते खरोखरीच देश स्वतंत्र होण्यास उपयुक्त ठरतील असेच करायला हवेत. आपला उज्ज्वल इतिहास समाजापुढं ठेवून, त्या इतिहासाची पुनरावृत्ति करण्याचा चंग बांधण्यापेक्षां, आज आपल्या गरजा काय आहेत, नी त्या चांगल्या रीतीनं कशा भागविल्या जातील, म्हणजेच त्याकरतां काय करायला हवं, हें आपण नीट समजून घेतलं पाहिजे. आपले स्वतंत्र होण्याचे मार्ग खऱ्या स्वातंत्र्याकडं नेणारे असावेत, नाहींतर एक बेडी काढत असतांना दुसऱ्या दोन बेड्या आपल्या पायांत पडायच्या. जातीय भूमिकेवरून राजकीय प्रश्न सोडविण्याचे आततायीपणाचे नी अविचाराचे जे प्रयत्न चालले आहेत, त्या योगें राष्ट्राचं कल्याण, हित होण्याऐवजीं त्याचा अंतिम परिणाम राष्ट्रविघातक झाल्याशिवाय राहाणार नाहीं. राष्ट्राचं हित साधावयाचं झाल्यास त्याकरतां राष्ट्रांतील निरनिराळ्या जातींची संघटना व्हायला हवी. कोणत्याहि एका विशिष्ठ जातीनं आपल्या सामर्थ्याची फुशारकी मारून, सर्व राजकीय सत्ता मिळविण्याकरतां धडपडणं, हें केव्हाहि शहाणपणाचं ठरणार नाहीं. बहुसंख्य जमातीला ही सत्ता काबिज करणं अवघड नाहीं; मात्र अशा प्रकारची सत्ता यापुढं या जगांत मुळी टिकणंच शक्य नाही.

त्यामुळं बाकीच्या जाती कायमच्या नष्ट होणं शक्य नाही व्हार्साईलच्या तहानें मारलेला जर्मनी मेला नाहीं. संख्येवर सत्ता नसते. तसं असतं तर आज आपण परतंत्रच राहिलों नसतो."

"बरोबर आहे तुझं! पण मजूर–कामगार—नी शेतकरी वर्गांना त्यांच्या हक्काची जाणीवकरून देऊन नी त्यांना क्रान्तिकार्याला प्रवृत्त करून, देशाच्या स्वातंत्र्याचा प्रश्न आपल्याला अधिक सुलभतेनं नाहीं का सोडवतां येणार?"

—आकाशनें मध्येंच विचारलें.

"जरूर येईल, पण देशाचं स्वातंत्र्य हें ध्येय या चळवळीच्या बुडाशीं आहे का? या चळवळींना आमचा मुळींच विरोध नाहीं; मात्र याहिपेक्षां आमच्या संस्थेचीं तत्त्वं व्यापक नी प्रभावी आहेत. बहुजन समाजाच्या हातीं सत्ता राहून देश स्वतंत्र होण्यास मदत होईल, अशा तऱ्हेचं कार्य करणं, हें आमचं ध्येय आहे. त्याकरतां निरनिराळ्या जातींचं एकीकरण करून नी बहुजन समाजाला त्याच्या हक्काची जाणीव करून देऊन, प्रत्येक अन्यायाचा तीव्र प्रतिकार करायला तो सिद्ध होईल, अशा तऱ्हेचं कार्य आम्ही करणार आहोंत. देशाचं स्वातंत्र्य हेंच आमचं ध्येय आहे. या स्वातंत्र्याच्या आड येतील ते सगळे मग ते स्वकीय असोत वा परकीय असोत आम्ही आमचे शत्रू मानणार. स्वातंत्र्याच्या मार्गांतील अडथळे दूर करण्याकरतां आपले सर्वस्व वेचणारे तरूण निर्माण झाले पाहिजेत.—अशा प्रकारची मनोवृत्ति समाजांत उत्पन्न करण्याकरतां आपण शिकस्तीचा प्रयत्न केला पाहिजे. बहुजन समाजाच्या हातीं सत्ता राहून देश स्वतंत्र झाल्यानंच, आम्हाला आमच्या शेतकरी, मजूर-कामगार–दलित वर्गाचं खरं हित साधतां येईल."

—असें म्हणत विराग उठला नी मग तो त्या सर्वांना उद्देशून म्हणाला,—

"चला, सहा वाजायला आले असतील. आपण इथल्या आपल्या संस्थेवर जाऊं या."

तीं सगळीं जायला निघालीं.

वाटेनें जातांना,—आपण आजवर अशा संस्था किती ठिकाणीं स्थापन केल्या आहेत, त्यांचं कार्य शिस्तीनं कसं चालू आहे, संस्थेंत प्रत्येकाला आपला विकास करतां येऊन राष्ट्राच्या स्वातंत्र्याकरतां त्यांच्या हातून प्रभावी कार्य घडेल अशी दक्षता कशी घेतली जाते,—इत्यादि माहिती विरागनें आकाशला सांगितलीं.

थोड्याच वेळांत ते संस्थेवर पोचले.

बारा ते वीस वर्षांपर्यंतचे दोन–आडीचशे तरुण तिथं एका प्रशस्त पटांगणांत जमले होते. ते एक वर्तुळ करून उभे होते. त्या वर्तुलाच्या मध्यभागीं रोवलेला पांढरा झेंडा डौलानें फडफडत होता. त्यांची प्रार्थना चालली होती,—

‘ वंदे मातरम्–सुजलाम्–सुफलाम्...
मलयजशीतलाम् मातरम्......
वंदे मातरम्—’

प्रार्थना संपल्यावर विराग आकाशला म्हणाला,—

‘ देशाच्या स्वातंत्र्याकरतां आमच्या या संस्था आतां आघाडीवर कार्य करणार; नी देश स्वतंत्र झाल्यावर मग जागतिक शांतता प्रस्थापित करून मानवजात सुखी करण्यासाठीं आम्ही आमचा देश आघाडीवर नेणार !’

नी मग त्यानं त्या तिघांना उद्देशून विचारलं,—

‘ तुम्ही **या आघाडीवर** याल ?’

त्यावर—‘ जरूर. ’

—असं म्हणून त्या तिघांनीहि त्याला आपली संमति दिली.

त्या वेळीं तो पांढरा झेंडा वाऱ्याबरोबर जोमानें फडफडत होता.

लेखनकाल—

२९।८।४१ ते २२।१०।४१